# इनामदारीण

(कादंबरी)

लेखक : अरुण कुळकर्णी

kulkarni@technique-baroda.com

07359212211

या पुस्तकातील लेखनाचे सर्व हक्क लेखकाकडे सुरक्षित असून पुस्तकाचे किंवा त्यातील अंशाचे पुनर्मुद्रण वा नाट्य, चित्रपट किंवा इतर रुपांतर करण्यासाठी लेखकाची लेखी परवानगी घेणे आवश्यक आहे.  तसे न केल्यास कायदेशीर कारवाई होऊ शकते.

या कादंबरीचे सर्व अधिकार ©

श्री. अरुण गणेश कुळकर्णी किंवा त्यांचे वारस श्री रविंद्र अरुण कुळकर्णी

८, ग्रीनपार्क सोसायटी,

मकरपुरा रोड बडोदा ३९० ०१० यांच्या कडे आहेत.

मो. ०७३५९२१२२११, ०९४२६५१०७६१ किंवा ०९८२४०१५२६२

Email- kulkarni@technique-baroda.com

प्रकाशक- सुहास खोपकर

सुहास्यरेखा प्रकाशन,

नंदीधाम

व्रजधाम मंदीर शेजारी,

मांजलपूर, बडोदा.३९० ०११

मो. ०९०९९९२५९६८

Email- suhasyarekhaprakashan@gmail.com

पहिली आवृत्ती- डिसेंबर २०१३ -१०००

दुसरी आवृत्ती- नोव्हेंबर २०१५ -१०००

किंमत- ₹ १९०/-

ISBN-978-81-928195-1-8

अरुण कुळकर्णी

बावीस वर्षे माझी अत्यंत
काळजी घेणाऱ्या व मधेच निघून
गेलेल्या माझ्या प्रिय पत्नी,
मिलन कुळकर्णींच्या स्मृतीस अर्पण.

अरुण कुळकर्णी

# प्रास्ताविक

लहानपणी त्या घरी बाळगोपाळांचा एक कळप घरातच होता. एकत्र कुटुंब पद्धतीचे ते दिवस, सगळेच भाऊ आणि बहिणी. सख्खे, चुलत, आते, मावस असले नात्याचे फरक समजायला पंधरा सोळा वर्षे जात. मोठया काकाना व काकीला बाबा व आई म्हणत व आपल्या आई बाबाना काकी काका म्हणत. सगळ्यांचे मनसोक्त प्रेम, माया, लाड व प्रसंगी मारही त्या मुलांना मिळे.

आपपर भाव कुणालाच शिवत नव्हता. सकाळी सर्व मुलांना गोल बसवून खाऊ दिला जायचा. मुठ मुठ पोहे व गुळाचा खडा प्रत्येकाला मिळे. कधी मधी फोडणीचे पोहे किंवा दिवाळीत लाडू मिळत. तेव्हा त्यांना माहीत पडे की सण आहे.

मुलेच एवढी की हुंदडण्यातच जास्त लक्ष असे. भावंडांची वये देखील वीस वर्षा पासून ते काही महिन्यांपर्यंतची. मग ते वयाप्रमाणे गृप करून खेळत.

अशी ही एकत्र कुटुंबं गेल्या साठ वर्षात हळू हळू विभक्त होत गेली. आता तर अगदीच आम्ही व आमची मुले एवढी छोटी झाली.

एका बाजूला अशी माया ममतेने भरलेली कुटुंबे तर काही वतनदार इनामदारांची पराकोटीच्या भाऊबंदकीने एकमेकांच्या जीवावर उठलेली कुटुंबे कोकणात पहायला मिळाली. वतनदारीचे प्रस्थ कोकणात फार. अशाच एका कोकणातल्या वतनदार इनामदारांच्या घरात एकत्र कुटुंबातून गेलेल्या एका कर्तव्यनिष्ठ, प्रेमळ बाईची ही कथा.

कित्येकांच्या आयुष्यात आवड व व्यावसायिक जीवन यात खूप फरक असतो. तसाच तो मलाही अनुभवावा लागला. लहानपण डोंगरातल्या कडेकपारीत वसलेल्या एका सुंदर पण शाळा नसलेल्या कोकणातल्या गावी अनुभवले. तर मग शिक्षणासाठी वेगवेगळ्या शहरांत फिरताना अनेक लोकांचा, त्यांच्या मानसाचा, जीवनशैलीचा अनुभव येत गेला.

लेखन करण्याची लहानपणीची आवड कित्येक वेळी मनात उसळी घेई पण व्यवसायात गुरफटल्यामुळे वेळ मिळणे कठीण होई. निवृत्तीच्या वयात पोचलो आणि चंग बांधला की लिखाण करायचे. काही गोष्टी लिहिल्या. मासिकात प्रसिद्ध झाल्या व चांगलाच प्रतिसाद मिळाला. असेच लिहीताना कोकणातले इनामदारी वैमनस्य आठवले. एक गोष्ट मनात तयार होत गेली. कागदावर उतरत गेली आणि त्यातून 'इनामदारीण' या कादंबरीचा जन्म झाला.

आज प्रेम, माया कुटुंब यांच्या व्याख्या बदलल्या, अगदीच सीमित झाल्या. कोता स्वार्थ नसलेली ती कुटुंबे, आपपर भावाशिवाय प्रेम करणारी ती माणसे काळाच्या ओघात नाहीशी झाली. कदाचित नव्या पिढीला ही सुरस कथा वाटावी एवढी परिस्थिती बदलली आहे. आम्ही आणि आमची मुले यावर आधारलेली कुटुंबे सगळीकडे दिसतात. मग वयस्क मातापित्यांनाही त्यांत स्थान मिळत नाही. वृद्धाश्रम बोकाळू लागलेत. अशा पार्श्वभूमीवर ही कादंबरी जुन्या प्रेमळ, कर्तव्यदक्ष एकत्र कुटुंबाचे दर्शन घडवील एवढेच दर्शवायचे आहे.

कादंबरीत निखळ प्रेमही आहे तर पराकोटीचे वैमनस्यही आहे. पण दोन्हीतही प्रामाणिकपणा आहे. तोंड देखले गोड बोलून गळा कापण्याची वृत्ती दिसत नाही.

आजच्या गोडबोल्या जगाचा अनुभव घेताना ह्या गोष्टीतला प्रामाणिकपणा भावला व तो तुमच्या समोर ठेवावा वाटला.

आपणासही आवडला का ते कळवावे.

अरुण कुळकर्णी.
बडोदे
kulkarni@technique-baroda.com
मो-07359212211

अरुण कुळकर्णी

# १

## रुक्मिणी-

माझे लग्न झाले तेव्हा मी सोळा वर्षांची होते. मला चांगले इनामदारांचे घर मिळाले म्हणून मधला काका खूष झाला होता. खरं तर लग्न म्हणजे मजा एवढेच माहीत होते. लग्न ठरले तेव्हा मधला काका सगळ्याना सांगे. "सोयरीक बरी झाली, जास्त काही मागीतले नाही. ५१ नारळ नी मंगळसूत्र इतक्यावरच भागले. लग्न इथेच दणक्यात करणार बघा."

मोठी आते आली होती. ती म्हणायची "नको इतका उड्या मारू आता पासूनच. दृष्ट लावील कोणतरी."

आमचे एकत्र कुटुंब होते. दोन आजोबा, एक आजी, तीन काका, एक आई व दोन काकी आणि आम्ही नऊ बहिणी नी सात भाऊ. घर कसे गर्दी करून होते. आम्ही एवढी भावंडे पण त्यांच्या आया वेगळया वेगळया. मोठी, तिला सगळेच आई म्हणत, मग मधली काकी व छोटी काकी. केव्हा केव्हा कोणीतरी सांगे की मधली काकी ती माझी माय. मला समजत नसे असे का म्हणतात. हळू हळू मोठी होत गेली मग समजले. मोठे काका मोठ्या आजोबांचे, तर मधले आणि छोटे काका धाकल्या आजोबांचे. मग सगळी मुले वेगवेगळ्या काकांची. आम्ही सगळी मुले मात्र एकत्र खेळू, एकत्र जेवू खाऊ. आई आणि काकी सगळ्या सारख्याच वाटत. भावा भावात फरकच नाही. पण माझं लग्न ठरलं आणि मधल्या काकीला सगळे म्हणू लागले "तुमच्या मुलीचे लग्न ठरले. वरमाय मिरवणार ग तू."

तेव्हा मला ध्यानात आले. मधला काका माझा बाबा आणि मधली काकी माझी माय. माझ्या दोन बहिणींची लग्ने झाली होती. त्या मोठ्या काकांच्या. आई त्यांची माय. त्या सगळ्या खोतांच्या घरातच दिल्या होत्या. मीच पहिली इनामदारांच्या घरी जाणार

होते. आई थोडी हिरमुसली वाटली. धाकटी काकी मधलीला म्हणाली “तुझ्या पोरीला इनामदार मिळाला. मोठीला पोटात दुखते काय गे? तोंड बघ कसे केलेन ते.”

माझी माय म्हणाली “नाही गे, तिच्याकडे आपले-दुसऱ्याचे असा विचार नाय गे.”

तेवढ्यात आई आली माझी माय तिला म्हणाली “काय हो थोरली जाऊबाय रुक्मीच्या लग्नाचे तुम्हाला कसे वाटते?”

“काय नाय तसे बरे आहे गे, पण इनामदारांचे ढंग फार. म्हणून काळजी वाटते रुक्मीची.” आई.

“मला वाटले तुम्ही तोलतात की काय, तुमच्या खोतांकडे दिल्या, नी ही जातेय इनामदारांकडे.” धाकटी काकी.

“अगो बाय!  मला सगळ्या मुली सारख्याच गे. तुझी सुद्धा. अगो सगळ्या मुली माझ्याच. सगळ्या सुखात रहाव्यात असे वाटते. श्रीमंती काय करायची सुख नसेल तर? मोठी झाली असतीस तर समजले असते मोठे व्हायचे दुःख. सगळ्यांचा विचार करून वागावे लागते गे.” आई

“खरं गे बाई, तू खरी आहेस.” धाकटी काकी.

“आम्ही काय शिकलो नाही तुझ्या सारखे, पण व्यवहारात चुकत नाही.” आई.

असे तीघी पण सरळसरळ बोलत. मागचं पुढचं काही ठेवत नसत. म्हणून भांडणे नव्हती. दोन्ही आजोबा एकमेकांवर जीव ओवाळून टाकीत. पण मधला काका म्हणजे माझा बाबा जरा आडवा फाटे. आजोबांना घाबरे. पण मोठया काकाना समोर उत्तरे देई. पण तरीही बायकांत ते वाद पोचत नसत. आता माझे लग्न म्हणजे फक्त त्याचेच कार्य अशा टेचात बोलत होता. सगळे आपले घरचे कार्य समजून काम करणार होते. पण हा माझ्याच पोरीचे कार्य म्हणून सांगत फिरणार होता.

आई एकदा त्याला म्हणाली देखील “माझी मुलगी, माझी मुलगी काय लावलेत? मला आई म्हणते ती. सगळ्यांना माझ्याच मुलीं सारखे वाढवलेय मी.. परत आयकायला आले तर कन्यादान मीच करीन. घरात माझे तुझे करायचे सोडा.”

मधला काका गप्प बाहेर निघून गेला. हे बोलायची ताकद फक्त आईतच होती. आजोबा सुद्धा तिला मानत. तिनेच घर एकत्र ठेवले हे त्यांना समजत होते. मोठा काका व धाकटा काका कधी बोलतच नसत. आजोबा आहेत, आई आहेत घरचे व्यवहार, खोतीचे व्यवहार तेच चालवतात. मग त्यांत आपण ढवळा ढवळ नाही करायची हा समंजस भाव.

एकटा मधला काका, माझा बाबा, तेवढा आडवे शेरे मारी. कुळाने खंड कमी दिला, हे झाड का तोडले? गाय विकलीच का? नवी घेतलीच का? त्यापेक्षा म्हैस नाय घ्यायची? असले बडबडे. त्याच्याकडे मग सगळे दुर्लक्ष करीत.

असे होते आमचे कुटुंब. कोकणातल्या मधल्या पट्टीत आलेल्या मिठबांवचे खोत. कुटुंबातले सगळे खांब आणि वासे एकसंध व भक्कम असलेले कुटुंब. एकच खांब मधल्या काकाच्या रुपाने डळमळणारा.

घराचा खांब बदलता तरी येतो. हा कसा बदलणार. मला मात्र सगळे भाऊ बहिणी प्रिय होते. मोठी चित्रा लग्न होऊन मसुऱ्याला गेली होती. माहेरपणाला आली की मला अगदी लाडाने वागवायची. माझ्यावर जीव फार. मला वर्षाची होई पर्यंत तिनेच सांभाळले होते. आजही आली की मला गोंजारायची, वेणी फणी करायची, न्हायला पण घालायची.

“अग! मोठी झाली गो ती. काय ल्हान बाळा सारखी लाड करतेस?” आई ओरडायची.

“चूप रहा गे, मीच वाढवलय तिला. माझी पहिली मुलगी ग ती. दोन दिवस आलेय ते लाड करू दे ना.” चित्रा ओरडे.

अशा आम्ही बहिणी. मला पण लहान बहिणी खेळवायला सांभाळायला मिळाल्या होत्या. सगळ्यात धाकटी सुमी आता दोन वर्षांची होईल. धाकट्या काकीची, पण झोपते माझ्याच कुशीत. सारखी माझ्या मागे मागे करते. फणसाचे गरे मीच काढून द्यायचे. डोक्याला तेल मीच लावायचे. जेवताना भरवायला मीच. मलाही तिचा फार लळा. हे असंच चालायचं. मोठ्यांना कामं फार, मग लहान मुलांना सांभाळायला आम्ही.

आता माझे लग्न होईल. पण माहेरवासाला येईन तेव्हा मलाही वाटेल सुमीचे लाड करावे, जवळ घ्यावे, भरवावे. माया तर असणारच ना. किती गोंजारलंय मी तिला गेल्या दोन वर्षांत. माया काय अशीच कमी होणार?

पण धाकट्या काकीच्या मुली शाळेत जात. तिने हट्टच धरला होता. सगळी शाळेला कंटाळत पण धाकटीकाकी कोणाचे ऐकत नसे. बाकीचे भाऊ सगळे शाळेत जात. पण आम्ही मुली कधी गेलोच नव्हतो. मुलींनी काय शिकायचं! घरकाम, जेवण, पाहुण्यारावळ्यांची उठबस हे काय शाळेत शिकवतात? मुलींना संसार चांगला करता आला की झालं. असा समज असलेले दिवस ते.

मी शिकलीच नाही. शाळेत कधी गेलेच नाही. मोठे भाऊ बडबडत ते ऐके. ते वाचत तेव्हा मन लावून ऐके. पाढे म्हणत ते ऐके. हिशोब समजायला लागले. पण लिहीता येत

नसत. कधी पाटी पेन्सील पकडलीच नाही. भाऊ पाटी पेन्सालीला हातच लावू देत नसत. आजोबा मोठे काका कुळांबरोबर बोलत तेव्हा मी ऐकत असे. कुळांचे हिशोब समजत. त्यांना आजोबा कित्येकदा माफी देत त्याची कारणे समजत. पावसात खूपजण शेतीच्या कामाला बोलवीत. त्यांना पैरेकरी म्हणत. त्यांची हजेरी लावायचे काम शाम करी. ती पद्धत मला समजली पण लिहायचे कसे. कोण हजर कोण नाही हे दररोज लिहीले जाई. मग मी एक युक्ती केली. एक चिव्याची काडी घेतली. प्रत्येक पैऱ्याला एक ओळख म्हणून चित्र काढलं. एक जास्वंदीच फूल तर दुसऱ्याला गुलाब, मोगरा, बैलाची शिंगे, बैलाच्या घुंगरांची माळ, बैलगाडीचं चाक अशा कितीतरी चित्रांच्या खुणा तयार केल्या. मग सगळया फुलांच्या व वेण्यांच्या खुणा म्हणजे पैरेकरी बाया, व प्राणी, गाड्या वगैरे चित्रे म्हणजे पुरूष असे ठरवले. दररोज त्यांच्या नांवासमोर उभी रेघ मारायची म्हणजे ते हजर. भोपळया सारखा गोल काढला म्हणजे आलेला नाही. घराच्या भिंती गिलाव्याच्या. बांबूच्या काड्यानी छान चित्रे काढली आणि सगळयांची हजेरी लावू लागली. मला त्याचा नादच लागला. संध्याकाळी पैरेकरी घरी यायचे. पावसात भिजलेल्या, दमलेल्याना गरम गरम चहा देत असू. त्याच वेळी शाम हजेरी मांडी. मी घराच्या मागच्या भितींवर हजेरी लावून यायची. कोण नाही आले एवढेच बघितले की हजेरी लागून जायची.

दर रविवारी पैरेकऱ्यांना भात दिले जायचे. हजेरी प्रमाणे भात द्यायचो. त्यावेळी शाम सांगे हजेरी. मी मागे जाऊन पाही सर्व दिवस आले ते सात वाले. बाकी कोणाचे किती दिवस ते पटकन बघून घ्यायचे. तीन चर जणांचेच कमी दिवस असत. ते बरोबर लक्षात रहात.

एक दिवशी शाम दिवस सांगत होता व आमचा गडी भात मोजून घालत होता. शाम मधेच कुणाशी तरी बोलू लागला. गडी थांबला, पैरेकरी पण वाट पहात थांबल्या. मी पटकरून बोलले. यांचे सात दिवस. मग काय मी सांगे व गडी भात देई. सगळयाना देऊन झाले. आणि शामचे लक्ष गेले. मग तो गड्याला ओरडला “तिचं ऐकून कुठे भात घालतोस? तिला हिशोब येतो का?”

मी पटकन सांगीतले. मला येतो हिशोब. घे नाव, सांगते त्यांचे दिवस किती ते. मग त्याने भात न दिलेल्या पैरेकऱ्यांची नावे एक एक करून घेतली व मी त्यांचे दिवस बरोबर सांगीतले. तो बघतच बसला. मग मी त्याला माझी युक्ती दाखवली. भिंतीवरच्या रेघोट्या व चित्र बघून तो गुंग झाला. एकटक माझ्याकडे बघत बसला.

रात्री सगळी मुले जेवताना माझी युक्ती सगळ्याना सांगून म्हणाला “रुक्मी फार हुशार आहे.” वाढायला धाकटी काकी आली होती. ती पटकन म्हणाली “सांगते तर ऐकत नाहीत माझे. शाळेत पाठवीत नाहीत. बायकांना हुशारी असली तरी रांधा-वाढा हेच नशिबात.”

“अगो तुझ्या मुलीना धाडतेस ना शाळेत? मग झाले तर! आमचे खातील मला रुक्मीला शाळेत धाडले तर.” मधली काकी म्हणजे माझी माय बोलली.

असे एकत्र राहाणारे पण वेग वेगळे विचारवाले असे घर होते आमचे. धाकटी काकी शिकलेली म्हणून धाकटे काका तिला मान द्यायचे, तिचे ऐकायचे. पण दुसऱ्या कुणाला ते कधी खटकले नाही. गुण्यागोविंदाने सगळेच राहात.

हो पण मी माझी भावंडं, त्यांची नांवं, कोण कुणाचे हे काहीच सांगीतले नाही. आता सांगते. मोठे काका त्यांना खूप मुले. मोठी चित्रा मग शकुंतला दोघांचे लग्न झालेले. नंतर शाम, मधुकर, शारदा, गिरीजा व सर्वांत लहान तपन.

मधल्या काकांचे रुक्मिणी-म्हणजे मी, गुरुनाथ, सुधा, शालीनी, जयंत, गोपिका असे.

छोट्या काकांचे बाळकृष्ण, मोहन व माझी लाडकी सुमती.

असं हे सजलेलं गोकुळ होतं आमचं कुटुंब. कधी कोण कुणाचा हा भेदभाव झालाच नाही. सगळे भाऊ व सगळ्या बहिणी. वयाची अंतरे मग पडणारच. तशी मोठी मुलं लहान भावंडाना सांभाळीत. आया काम करायला मोकळ्या राहात.

मधला काका म्हणजे माझे बाबा तेवढे माझं तुझं करीत. ते ऐकून मोठे आजोबा त्रासत. धाकटया आजोबांना म्हणत “असा कसा रे हा? जरा देखील समंजसपणा नाही. कसं होईल रे आपल्यानंतर?”

धाकटे आजोबा म्हणत “काय काळजी करू नको. मोठी सून विचारी आहे नी खमकी आहे. ती घालील त्याला वेसण.”

खरंच घर नुसतं एकत्रच नव्हे पण एकोप्याने असण्याचं कारण आई. ती कधी भेदभाव करीत नसे की होऊ देत नसे. म्हणूनच आम्ही सगळे भाऊ बहीणच झालो होतो.

माझ्या लग्नाची तयारी हळू हळू चालू झाली. मधला काका सगळे आपल्या मनाप्रमाणे करायला लागला म्हणून कोणी मधे पडत नसे. मधला काका म्हणजे माझा बाबा. त्याच्या मुलांतले पहिलेच लग्न. जोरात आला होता. जरा मोठयाना मान देवून सगळे केले असतेन तर काय बिघडले असते? पण नाही, मनस्वीपणाने वागायला त्याला आवडे.

मांडवासाठी मेढी बनवायच्या म्हणून खूप झाडे तोडून आणलीन. धाकले आजोबा म्हणाले “अरे कशाला ही झाडे तोडलीस? दरवर्षी मांडव घालतोच ना त्याच मेढी नी वाशे वापरले असते.”

“आणि काय! मग इनामदार पाव्हण्यांना वाटेल खोत भिकारशेट आहेत. उगीच सोयरीक केली इथे.” मधला काका.

“मी ओळखतो तुझ्या इनामदारांना. अरे भाऊबंदकीनं भरलंय घर. समजेल तुला.. पोरगी सुखी झाली की मिळवली.” धाकले आजोबा सांगत होते. मग मधला काका तोंडातल्या तोंडात पुटपुटत काहीतरी बडबडू लागला. वैतागला वाटत होता. मग आई आली व म्हणाली “भाओजी, फराळाचे मी ठरवू की तुम्ही सांगणार? नाय, रुक्मी आमची कोणी नाय असे वागतात म्हणून विचारलं. काय मनात असेल ते सगळे स्वच्छ सांगा. आणि हो एकटेच लग्न करायला समर्थ असाल तर सांगते सगळयांना, बाबांनो त्यांना व त्यांच्या बायकोला करू दे लग्न. आपण कोणी मधे पडायचं नाही. भले मी रुक्मीला माझीच पोर म्हणून वाढवलंय, तरी सहन करीन मी.”

हा टोला एवढा जबरदस्त बसला की काका काळे ठिक्कर पडले. माझ्या पोटात गोळा आला. आईच सगळे व्यवहार बघते. मायला काय जमणार? मायने कधी केलेच नाही. मायला सगळे सांगीतले तर तिने पटकरून म्हटले “मोठीच सगळं करणार गो. तू नको काळजी करू. आणि मी बरी हो म्हणीन त्यांना. सरळ सांगीन माझ्यान नाय होणार, मोठी हवीच बरोबर. मग काय करतील? गप मान खाली करून मानावच लागेल ना?”

माझे बाबाच एकटे पडले होते. वाटले का करतात हे असे. सगळयांबरोबर राहून मान मिळवायचा सोडून अपमान पदरी घेत बसले होते. मला मात्र समजत होते, आई वागते ते बरोबर. कुणाला कसे शांतपणे उत्तर द्यायचे, प्रसंगात पकडायचे, प्रेम देखील द्यायचे, पण दराराही ठेवायचा. घर एकसंध ठेवायचा मार्ग ती सगळयांना दाखवत होती. मला त्या वयात तो समजत होता.

लग्नाची तयारी आता बाहेरून स्वयंपाकघरात शिरू लागली. तांदळाची पोती येवून पडली. खिरीच्या कण्यांची पोती पण आली. तालुक्याहून दोन मोठी पोती चण्याचं पीठ आलं. तेलाचे, तुपाचे डबे व मसाल्याचे पदार्थ आले, सुपाऱ्या, तंबाखू पण आले. मी बघतच बसले एवढे सगळे सामान दोन दिवसाच्या लग्नाला? मी विचारले तर आई गडगडाट हसत म्हणाली “खोतांच्या घरात जन्मलीस गो तू. आणि आता इनामदारीण होणार. दोघांचाय आब नको राखायला. सगळयात मोठा मान राखायचा तो मधल्यांचा.

काय कमी पडले तर म्हणतील, आपल्या मुलींना उजवलेन झळझळीत. माझ्या मुलीला नाय तसे केलेन. मग काय उत्तर देऊ?"

"काय बोलतील? गप झालेत. आपण आपले सगळयांचे सारखेच करुया. अगदी सुमीलाय अशीच उजवुया." माझी माय बोलली.

मगच्या दिवसांत एकच गोंधळ उडाला. भटजींकडची मंडळी येऊन बुंदी पाडून गेले. सगळया मुलांनी बुंदी एका मोठ्या पिंपात भरल्या. भटणी आल्या. पंधरावीस नारळ खवून त्याच्या वड्या करून गेल्या. वड्या नव्या कोऱ्या टोपलीत भरून वर पत्रावळी बांधून शिंकाळयाला लटकवली. कारण काय तर मुंग्या लागू नयेत. मग चिवडा, शंकरपाळया, बेसन लाडू, रव्याचे लाडू सगळे दिवाळीचे पदार्थ बनू लागले. दिवाळीत घरच्या पुरते बनत. आता दुप्पट तिप्पट बनत होते. सगळे पदार्थ झाले की देवाला प्रसाद दाखवायचा व सगळी पुरुष मंडळी बाहेर बसलेली असली की फराळाचे ताट वाढून द्यायचे.

एक एक पदार्थ चाखून, बाहेरून शेरा काय येतो तिकडे सगळया बायका कान लावून बसत. मग आम्हालाही मिळे.

धाकटे आजोबा मग मधल्या काकाला टोला हाणीत, "बघ रे बाबा, तुझ्या पसंतीला पहिला मान. बरे झालेय ना सगळे?"

मोठे आजोबा जरा सरळच. त्यांना गोम समजायची नाही. ते म्हणाले "त्याला काय विचारतोस? अरे मोठ्या सूनबाईचा फराळ, जरापण चव बदलणार नाय. सगळेच छान झालेय. पाव्हणे खूष होतील रे. पण रुक्मीलाय करायला यायला पहिजे रे. तर खरे."

एवढे मी ऐकले आणि वाटले अरेरे, मी पण काहीतरी केले पाहिजे होते. आईला तसे बोलले तर म्हणाली "रुक्मे, सगळे येणार गो तुला. सगळे मन लावून बघीतलेस तर खरे. करायला लागलीस की आठवेल सगळे. मला विश्वास आहे तुझा. तुझ्या हाताला माझीच चव येणार बघ."

मी आनंदले. आई किती चांगले बोलायची. सगळयाच मुलांना ती अशीच हुरुप द्यायची.

मांडव झाला. पतंगाच्या कागदानी सजवला. कंदीलासाठी व पेट्रोमॅक्ससाठी आकडे लावले. आंब्याची तोरणे बांधली. आणि मला पोटात कसेसेच होऊ लागले. आईला सोडून जायचे. माय दूर होणार. सुमीला गोंजारायला नाय मिळणार. शामला पैऱ्यांचा हिशोब दाखवायला नाय मिळणार. लग्न तर आठ दिवसावर आले. इनामदारांच्या घरी कोण कोण आहेत? लहान किती? मोठी किती? माझ्या जोडीचे असणार की नाहीत?

सासूसासरे आहेत की नाहीत? मनात प्रश्नांचे भुंगे भुणभुणत होते. मग पोटातही गुरगुर व्हायची. आई बसून काही करीत असली की मी हळूच तिच्या बाजूला आडवी व्हायची. डोकं तिच्या मांडीवर घुसवायची. काही बोलायची नाही. मग आई हातातले काम ठेवून थोपटून म्हणे “असेच होते गो बाय. काय सुधरत नाय शेवटच्या दिवसांत. डोक्यात फिरते नी पोटात गुरगुरते.” मी न सांगताच आईला सगळे समजे. जन्मदाती माय समोरच असे. मग दोघींचे डोळे भरून येत. माझ्या आठवणी सांगत त्या अश्रुंना वाट करून देत. एवढ्यात छोटी काकी येई. ती देखील बोलायला लागे “सुमीला सांभाळलन. ही गेली की सुमीय रडणार आठवण काढून. काय करायचं शेवटी पोरीची जात.” मग तिघींचेय मुसमुसणे व रडता रडता बोलणे चालू होई. हे दुःख नाही, विरहाची बोंच असे. मला मिळालेले मायेचे उजवे माप बघून मलाही हुंदका फुटे. मग आई घट्ट कवेत घेई. दोन मुके घेई. मग माय बोलवी म्हणे “माझ्याय कुशीत ये गो बाय!” मी तिच्याकडे जाई. मग धाकली काकी पण कुशीत घेई. आम्ही बहिणी खरंच भाग्यवान. तीन आयांच्या प्रेमाचे माप भरपूर मिळालेले भाग्यवान जीव.

आता मांडवात विधी सुरू झाले होते. धोतर, उपरणे, टोपी घालून मधला काका मिरवत होता. भटजी सांगतील ते करीत होता. माय मधेच काम सोडून जात होती. त्याच्याबरोबर पूजेला बसत होती. जरा वेळ झाला तर तो तिच्यावर चिडत होता. ती हंसऱ्या तोंडानी त्याला निवळत होती. मधेच आई बोलून काकाला टोला मारीत सरळ करीत होती. पण सगळे एक काळजी घेत होते. काकाला जास्त उखडवून तमाशा व्हायला द्यायचा नाही.

लग्न दोन दिवसावर आले. इनामदारांची वरात उद्या येणार. त्यांची व्यवस्था गावच्या स्वयंभू मंदीरात केली होती. मी जरा गोंधळले होते बधीर झाले होते. काही सुचत नव्हते. परवा लग्न होणार व मी या घरून जाणार हेच मनाला पटत नव्हते. मायेची सगळी माणसं इथेच राहाणार. मी मात्र एकटी पडणार. त्या घरात रुळेपर्यंत तरी.

*****

## २

### शामराव-

रुक्मिणीचं लग्न ठरलंय. इनामदारांच्या घरात देणार म्हणताहेत. सात गंवात जमीन आहे. गुळगुळे इनामदार म्हणजे बडे प्रस्थ. पण एक गालबोट आहे कुटुंबाला. उत्पन्नाचा पूर येतो घरात. पैसा अडका फार येतो. इंग्रजांच्या काळापासून सरकारात वजन. त्यामुळे सगळेच छानछोकीत राहातात. पण दोन भावांचे जमत नाही. इस्टेटीचे भाग झाले. होणारच.

रुक्मीचा होणारा नवरा दत्तक घेतलेला. त्यांचे वडील सर्वांत मोठे. मग तीन भाऊ. मोठ्या तिघानाही मूल नव्हते म्हणून मोठयानी दत्तक घेतला. नंतर सर्वांत छोट्याला मुलगा झाला.

आता पंचाईत झाली. धाकटयाचे म्हणणे, माझा मुलगा औरस गुळगुळे. म्हणून त्यालाच सगळी इनामदारी मिळावी. पण झाले उलटेच. मोठ्या भावाने सांगीतले की दत्तक असला तरी मुलाला सख्ख्या सारखे वाढवलेय. चार भाग होतील. मधल्या दोन भावानी ठरवावे त्यांचा भाग त्यांच्या नंतर कुणाला द्यायचा ते. आणि त्यानंतर कुटुंबाला भयंकर भाऊबंदकीचा श्राप सहन करावा लागतोय. मोठ्याच्या दत्तक मुलाचे नाव आबासाहेब. लहानाच्या मुलाचे नाव भाऊसाहेब.

मधल्या दोन काकानी तरी विचार करायचा. पण त्यांचे धाकल्या भावाबरोबर तेवढेसे बरे नव्हते. त्यांनी आपले हिस्से आबासाहेबाना दिले व दिवंगत झाले. दत्तक पुत्र आबासाहेबांचा हिस्सा तीन भाग व भाऊसाहेबांचा हिस्सा एक भाग झाला. भाऊबंदकी आणखी गडद झाली. भाऊसाहेबांच्या वडिलांनी बंदुका काढल्या, कुळाव्याला आपल्या बाजूला वळवले. आबासाहेबांचे वडील भाऊबंदकीला बळी पडले. कोणी म्हणते त्यांचा खून झाला, कोणी म्हणते ते नदीत वहात बुडून गेले. इनामदारांच्या चौसोपी वाड्याचे आधीच दोन सारखे भाग झाले होते.

भाऊसाहेबानी दंडेली करून पुढचा भाग आपण घेतला. आबासाहेब दत्तक त्यामुळे जरा मवाळ त्यांनी मागचा भाग मान्य ठेवला. मग जाण्या येण्याला रस्ता मिळेना. परत भांडणे सुरू. बंदुका बाहेर निघाल्या. चार भावातले एकटे छोटे इनामदार हयात होते. एक जागी दंडेली यशस्वी झाल्या बरोबर त्यांनी जमिनी बळकावायला सुरूवात केली. कुळाव्याची त्यांनाच साथ मिळाली. ते खूप अरेरावी करू लागले. आबासाहेब हैराण होत. कोर्ट कचेऱ्या हा एकच मार्ग त्यांच्यासमोर होता. वय देखील लहान. पण छोटे इनामदार एक दिवशी झोपले ते उठलेच नाहीत.

इनामदार वाड्यात पोरवडा झाला. अठरा वर्षाचे आबासाहेब व १७ वर्षांचे भाऊसाहेब. पण भाऊबंदकी काही मिटली नव्हती. जरा थंड पडली होती एवढेच.

आबासाहेबांशी रुक्मीची सोयरीक मधल्या काकाने जुळवली. पण मला पोटात कालवले. कुठल्या फुफाट्यांत ढकलतोय रुक्मीला काका? जरा विचार तरी करायचा.

मी शिकायला चांगला, हिशोबाला हुशार म्हणून आजोबानी मला खंड वसुली व हिशोब हवाली केला. मी त्या साठी फिरे. इनामदारांच्या सात गांवापैकी तीन गांवे आमच्या खोतीच्या गांवाला खेटून होती. म्हणून मला इनामदारांची इथ्थंभूत माहिती कळली होती.

केव्हा केव्हा वाटे आजोबाना सर्व सांगावे. इनामदारांच्या घरी रुक्मी कसे दिवस काढील? कधी वाटे सरळ धाकल्या काकालाच सगळे सांगावे, विचारावे रुक्मीचे सुख मोठे की इनामदारी मोठी. पण मी लहान, रुक्मीपेक्षा तीनच वर्षानी मोठा. मलाच बोल लागेल. पण आईला तरी सांगूया. तिची माया फार आहे रुक्मीवर. ती करेल काहीतरी.

आम्ही सगळी भावंडे एकत्र खेळत भांडत मोठे झालो. दोन बहीणींची लग्ने झाली मग बरोबरचे राहिले ते मधुकर, गुरूनाथ व रुक्मिणी. रुक्मी गोरीपान, उंच, नीळसर घारे डोळे आणि सर्वांत हुशार. सर्वांशी गोड वागे. कुणालाही मदतीला धांवे. लहान भावंडाना आईच्या मायेने पाही. म्हणूनच ती आमची लाडकी, सर्वांची आवडती बहीण होती. ती होरपळू नये ही इच्छा जोर धरत होती. पण बोलू शकत नव्हतो.

मधला काका एकटाच तोऱ्यांत वागे. उगीच वाद नकोत म्हणून कोणी त्याच्या वाटेला जात नसे. मला वाटे आजोबानी तरी दोन शब्द त्याला सुनवावेत. नाहीतर उद्या हाच कुटुंबाला घातक ठरेल. पण मी लहान. वाटलं तरी मोठ्यांबद्दल बोलायचं नाही. आई मात्र खरच हुशार. ती फार चांगल्या तऱ्हेने त्याला गप्प करी. सगळ्या कुटुंबाला एकत्र ठेवे.

दोन्ही आजोबा म्हणूनच तिला फार मान देत. तिची कोणतीच गोष्ट डावलीत नसत. म्हणूनच वाटे तिला सांगावे. ती काहीतरी मार्ग काढेल.

तसंच रुक्मीचही होतं. खेळताना भावंडांची भांडणे होत. आम्ही सगळे खेळताना थोडीफार लबाडी करूच. मग भांडण सुरू. रुक्मी मग निकाल देई. लबाडी बरोबर पकडे. मग न्याय देखील बरोबर मिळे. सगळे तिला मानत व खेळ पुढे सुरू होई.

एक दिवशी रुक्मीनी पैरेकऱ्यांचा हिशोब ठेवलेला पाहून तर मी आश्चर्यातच पडलो. तिने भिंतीवर काढलेली चित्रं, पुढे मारलेल्या रेघोट्या व शून्ये मला चकीत करून गेली. विचार आला ही शाळेत गेली असती, शिकली असती तर? तिने स्वतःच आपली हिशोब ठेवण्याची पद्धत शोधली होती. अजाणतेपणी शिकण्याची आवड तिने दाखवली होती.

त्यावेळी सुद्धा मी असाच तळमळलो होतो. आजोबाना सांगावे, आईला सांगावे हिला शिकवा, शाळेत घाला. पण धजलोच नाही. छोटी काकी शिकली होती सातवी पास होती. म्हणजे चांगलीच शिकली होती. तिलाच सांगूया ठरवले.

एक दिवस संधी बघून छोट्या काकीना गाठले. मागच्या भिंतीवरचा रुक्मीचा प्रताप दाखवला. सगळा प्रसंग वर्णन केला. व म्हणालो "काकी तुम्ही तरी सांगा मोठ्याना रुक्मीला शाळेत घालायला. हुशार आहे ती."

"बाबारे मीच चिंतेत आहे, माझ्या सुमतीला तरी शिकवायला येईल की नाय. मी सांगायला गेले तर म्हणतील, सगळ्यांनाच कुठे शिकवायला जातेस? तू आईलाच सांग ना, ती बघेल काय ते."

"तूच सांग. नायतर एक कर. तू शिकलीस ना. मग तिला शिकव तू घरातच." मी

"अरे घरचीच कामे काय कमी असतात. तर हे शिकवायचे झेंगाट लावून घेवू. वर सगळे डोळे काढून बघतील माझ्याकडे. त्याचं काय?" काकी

मला मनात वाटले, रुक्मी काय शिकणार नाय हे नक्की. काय करायचे हा विचार काय मनातून जाईना. आईला सांगून बघूया?

परत तसंच केलं. आईलाही रुक्मीची भिंतीवरची करामत दाखवली. रुक्मीला शिकवायची विनंती केली. तर आईने मलाच दम मारला. कुटुंबातला मी सर्वांत मोठा मुलगा हे खरे, पण अजून मोठे हयात आहेत. हा प्रयत्न मी केलाच, तर आपसांत वादाना तोंड फुटेल. ती कुटुंब एकत्र ठेवायचा प्रयत्न करतेय त्याला सुरुंग लागेल. तिच्या एका चुकीची वाट बघत मधला काका बसलाच आहे. तो ताबडतोप गजब करील. त्याचीच मुलगी आहे ना ती?

पहिल्यांदाच मला आईच्या बोलण्यातून कुटुंबाच्या एकत्रपणाचा तडा अंधूक दिसला. आम्ही तर सगळे छान गुण्यागोविंदानो राहातो. आई व दोन्ही काकी देखील बहिणींसारख्याच राहातात. मग आईला असं कां वाटलं? आपलं एकत्रपण एवढं कांचेसारखं आहे? केव्हाही तडा जाणारं? मोठ्यांच्या कित्येक गोष्टी आपल्याला माहीत नसतात हेच खरे.

रुक्मी शिकावी हा माझा प्रयत्न नक्की खुंटला हे मला समजले. आता तिच्या लग्नाबद्दल कसं कोणा कडे बोलणार. आई म्हणेल मी मोठा कर्ता व्हायला बघतोय. आजोबांकडे बोलायची हिम्मत नाही. बाबा किंवा मधला काका यांच्याकडे विषय काढायचा मार्ग सांपडत नव्हता.

नंतर रुक्मीला त्रास झाला असता तर कायम मनात खंत करीत बसलो असतो. काहीतरी करायला तर पाहिजेच. कमीत कमी मोठ्यांच्या कानावर जाईल एवढे तर पहायला पाहिजे. वेळ बघून बोलायचे ठरवले.

आम्ही म्हणजे दोन्ही आजोबा, बाबा, दोन्ही काका, मी, गुरुनाथ, मधुकर एवढे मोठे म्हणून एकाच पंक्तीत जेवायला बसू. बाकी सर्व लहान ती आंतल्या खोलीत दंगा करीत जेवीत. मुलगा दहा बारा वर्षांचा झाला की बाहेरच्या पंक्तीत यायचा व मुली त्या वयाच्या झाल्या की मोठ्या बायकां बरोबर बसत.

अशीच आमची रात्रीची पंगत बसली होती. व मधला काका म्हणाला "लग्नाची तयारी करायला लागलोय मी. त्यांनी काय मागीतले नाय. इनामदार आहेत. लग्न जरा बऱ्या पैकी करावं लागेल."

मोठे आजोबा म्हणाले "आधीची दोन्ही लग्ने खोतांना साजेशीच झाली. दोन दिवस गाव जेवणे झाली. इनामदारांना साजणारी ती आणखी काय वेगळी असणार?"

मग शांतता पसरली. बाबा बोलला "तू मुलाची चौकशी केलीस काय रे? नाही! इनामदार म्हणून विचारलं. पैशा बरोबर अवदसाय असते त्यांच्या संगतीला."

"बघितलंय तर! आता दोन भाग झाले इनामदारीचे. पण आबासायबाना तीन भाग मिळाले, नी चुलत भावाला एक भाग. दोन काकानी आपलाय भाग आबासायबाला दिलाय. म्हणजे मुलगा चांगला समजूतदार असणार." मधला काका सांगत होता. मला हीच वेळ बरी वाटली.

"मी फिरतो ना खंड गोळा करायला तेव्हा मला खूप गोष्टी ऐकायला मिळतात. मोठ्यांना चालेल तर सांगतो." हे ऐकताच आजोबा म्हणाले "सांग रे बाबा! सांग! तूही

मोठा झालायस. तू पण बघायचे कुटुंबाचे. काय बरे वाईट असेल ते सगळे सांग. पोरीला सुख हवे एवढेच."

मग मी सविस्तर सगळी माहिती सांगीतली, भांडणे सांगीतली, आबासाहेबांच्या मागे भाऊसाहेब कसे पडलेत, दंडेली करून कसे सतवतात सगळे वर्णन केले. पहिल्यांदा रागावलेला मधला काका हळू हळू थंड होत गेला. आबासाहेब थंड आहेत हे मी सांगताच तो बोलायला लागला

"बघा, म्हणजे होणारा जावई सभ्य आहे. भाऊ वांड म्हणून काय पोरगी नाय द्यायची? आणि पुढे मागे आपणही आहोत त्यांच्या पाठी. मग काय करील तो भाऊ? ल्हान वय आहे. सांभाळायला नको पाव्हणे म्हटल्यावर?"

"बघ बाबा काय ते. पोरगी फुफाट्यांत नको पडायला." धाकटे आजोबा बोलले.

"आणि आपण पाव्हण्यांच्या व्यवहारांत पडू नये. दोषच मिळतो. हे लक्षांत ठेव" मोठे आजोबा

मला सगळ्यांच्या कानावर गेले ते बरे वाटले. थोडा स्वतःचा अभिमान पण वाटला. पण तरी सुद्धा मधल्या काकाने लग्न पक्के केले.

आई आंतून सर्व ऐकत होती. मला परत सगळे विचारून घेतलेन. मग ती दररोज तास भर तरी रुक्मीला काही सांगत समजावत बसे. काय असेल याचा थोडा अंदाज मला यायचा. त्या घरी काय होईल, भांडण निघाले तर कसे हाताळायचे असलेच काहीतरी असणार. आई त्यांत बरीच तरबेज होती. म्हणूनच माझ्या बहिणी ज्या घरी दिल्या ते सगळे नांवाजत. सुगरण घरात आली म्हणत. सगळी आईची किमया.

दुसऱ्या दिवशी ओटीवर मी एकटाच हिशोब लिहीत बसलो होतो. तेवढ्यात मधला काका कुठून तरी आला. माझ्या जवळ बसत म्हणाला "हिशोब लिहिता लिहिता तू माहितीय बरी काढतोस रे! अजून एक माहिती येईल काय रे काढायला तुला? भाऊसायबानी जावयांची किती जमीन दंडेलीन हडप केलीन. मग करतो मी काय ते."

बघतो, म्हणून मी गप्प बसलो.

"पण काहीही म्हण हां. तुझ्या माहितीने मी स्वस्थ झालो. आता लग्न करून द्यायला कायच हरकत नाय." काका.

मिळकत, इस्टेट, पैसा हेच काकाचे सुखाबद्दलचे मत. मी मनात हसलो. हाच असा कसा झाला. रुक्मीला इस्टेट मिळेल, इनामदारीचा मान पण मिळेल, पण सुख मिळेल की नाही? काय भांडणे मिटवण्यात जन्म घालवायचा तिने? हा तिचे सुख बघेल की फक्त

इस्टेट व मानमरातब? मला असेच विचार का येत याचे कारण समजत नव्हते. कशावरून ती अशाच परिस्थितीत जाईल? कदाचित छान सुखात राज्य करेल. मी असा उलटाच विचार का करतो?

पण तिची काळजी काही कमी होत नव्हती. देवाकडे सांकडे घाली. रुक्मी सुखी होऊ दे रे.

मग एकदा ठरवले, आईलाच सांगायचे, विचारायचे. रागावली तरी हरकत नाही पण बोललेच पाहिजे. मन शांत तरी होईल.

मला सगळ्याच भावंडाची माया फार. गुरुनाथ अभ्यासात कच्चा म्हणून त्याला शिकव. बाहेर गावी गेलो की शारदा, सुधा वगैरे बहिणींसाठी रिबीनी, पीना, केसाचे आंकडे आणी. मोजून सगळ्याना सारखे. छोटी काकी लगेचच बोलून दाखवी "मोठ्या जाऊबाई शाम अगदी तुमचे गुण घेऊन आलाय." सगळ्यांवर सारखीच माया." मग मला बरे वाटे. सगळेच माझ्यावर माया करीत. सुमी सगळ्यात लहान, अडीच तीन वर्षाचीच. बोबडे बोलत मला विचारू लागली, "दादा रुमीतायचे लगीन होतले. मग ती नवऱ्याकडे जाणार ना? मी जाऊ तिच्या बरोबर? काकी सांगते मोठ्यांना विचार. सांग ना जाऊ?"

मोठ्यांना म्हणजे वडीलधाऱ्यांना हे तिला समजलेच नव्हते. माझी परवानगी मिळाली की आपण जायला मोकळे असे तिला वाटले. कसे तरी तिला समजावून पाठवली व विचारात पडलो. रुक्मी गेली की पहिली सुमी एकटी पडणार. तिला नाही करमणार तिच्या शिवाय. मग मी शारदा, सुधा व शालीनी याना बोलावून सांगीतले की त्यांनी सुमी बरोबर जास्तीत जास्त खेळायचे. रुक्मीपासून दूर ठेवायचे. उद्या रुक्मी लग्न होऊन गेली की सुमी खूप रडेल तसे होता नये तर तुम्ही तिला तुमची सवय लावली पाहिजे.

"पण सुमी तर सारखी रुक्मी बरोबरच राहाते. आमच्या बरोबर येतच नाय." सुधा

मी सुधाला समजावले. मायेने बोलवा, आपल्यातला खाऊ द्या, खेळात तिला जास्त खेळायला द्या. एवढं केलत तर दोन दिवसांत ती तुमच्यात मिसळेल बघा. मग हळू हळू रुक्मी करते ती कामे सुधाने करायची. म्हणजे सुमीचे केस विंचरणे, न्हाउ माखू घालणे. सुधा समजू होती. तिने दुसऱ्याच दिवसापासून सुमीला ताब्यात घेतले. आणि खरोखरच सुमी पण सुधाताय सुधाताय करत तिला बिलगू लागली.

मला परत एकदा आईचा अभिमान वाटला. सगळ्या मुलाना तिने जबाबदारी काय ते लहानपणीच शिकवले होते. एक मधला काका तेवढा जर वेगळा वाटायचा. हल्ली

गुरुनाथ पण मधूनच असे काही बोले की वाटे हा देखील बापाच्या वळणावर जाणार की काय?

रुक्मीला माझ्या समोर म्हणाला होता. "रुक्मी तू इनामदारीण, खूप गांवात जमीन. सांभाळशील कशी? त्या पेक्षा तू मला घेऊन चल तुझ्या बरोबर. लांबची गावे मी सांभाळीन."

"का रे बाबा! तुझे वडीलधारी काय तुला वाऱ्यावर सोडणार? मी इनामदारांच्या घरात जाणार, इनामदारी त्यांची, कोणाला ठेवायचे हे त्यांचे काम, माझे नही." रुक्मी भावाचे वाभाडे काढत उत्तरली. मी मात्र सुखावलो. पण गुरुनाथच्या विचारांची दिशा हळूच दिसू लागली त्याने धास्तावलो.

एके दिवशी मी आणि आई देवळात गेलो. आईचा पाय मुरगळला होता. बरोबर कोणी नव्हते. मग गाडी जुंपली व निघालो. देऊळ मैल दीड मैल लांब. जाऊन परत येईपर्यंत कमीत कमी दीड तास तरी लागला असता. आई बरोबर एकटेपणी बोलायला ही संधी होती. हळू हळू करीत मी सगळया गोष्टी आईला जशा घडल्या तशा सांगीतल्या. मग विचारले "अशा प्रसंगी कसे हाताळायचे अशा लोकांना आत्तापर्यंत तूच सांभाळेस व्यवस्थित. कसे जमवलेस सगळे?"

"अरे! मी काय केलं? कायच नाय. फक्त मोठ्यांचा मान राखला, कोणाला काय हवे नको ते व्यवस्थित बघितले, लहानांना माया दिली. जेव्हा केव्हा मोठ्यानं बोलले तेव्हा मागाहून प्रेमाने जवळंय घेतले. जावांची मुले, माझी मुले असे मनातही आणले नाय. कधी काय आवडले नाय तर गप राहिले. समोरच्याला समजते रे, बोलत नाय म्हणजे पटले नाय. मग तेच आपल्याला सुधारतात. एकदा किर्तनकार सांगताना ऐकलं, मौनं सर्वार्थ साधकम्, खरं आहे रे ते. खूप उपयोगी पडते. आता तूच बघ रुक्मीचे नी गुरूचे बोलणे मला सांगीतलेस, पण तू गप राहिलास ना? तसाच रहा. भांडणं नको रे कुटुंबात. आणि स्वतःही वागायला शीक कोणा बद्दल मनात काय पण ग्रह धरू नको. काका नी गुरू सारखेच हे आलंच ना तुझ्या मनात? असेलही नाहीतर नसेलही तसे. सगळेच काय असेच राहील अशी आशा धरू नको. जे प्रारब्धात लिहिलेय ते होणारच. मग नाही झालं मनासारखं तर त्रास होतो रे."

मी हे अमृत पीत होतो. किती मोलाची शिकवण होती. अजून ती बोलावी असे वाटत होते पण ती विचारात गुरफटली. कुटुंबाच्या प्रारब्धाचाच विचार करीत असणार. मी गप्प

राहिलो. कदाचित माझ्या बोलण्याने तिला भविष्य दिसत असेल व त्यावरचा तोडगा ती शोधत असेल असे वाटले.

घरी पोचलो तर मधलेकाका ओटीवरच बसले होते. पटकरून बोलले “अरे वा! शाम आज श्रावण बाळ झालास रे.” ते कुजके बोलणे मला लागले. मी बोलायच्या आधीच आई हसत  बोलली “नाही वो आज गुरूला आणि मधुला तुम्ही लाकडं भरायला पाठवलत ना मांगरात. नाहीतर मला तेच नेतात देवळात. गुरू नाय तर हाडे खिळखिळी झाली. शामला नाय तितकी गाडी हांकायला येत.” माझ्याकडे एक हसरी, विजयी नजर टाकत आई घरात शिरली. खजील, निरुत्तर झालेल्या काकांचा चेहेरा पहाताना मला आनंद झाला. आईची समयसूचकता आश्चर्यचकित करून गेली. माझ्या पेक्षाही तिने गुरूचे गुणगान केले पण अध्यारुतात तिने काकांना सर्व मुले तिला सारखीच हे दाखवले होते. ते देखील हसतमुख चेहरा ठेवून.

एका कोपऱ्यात मोठे आजोबा जप संपवून बसले होते. ते सर्व पहात होते, ऐकत होते. आई घरात गेली तसे म्हणाले “मजल्या! (मधलेकाका) तिच्या पदरात देवाने तीनच नाय, सात श्रावण बाळ घातलेत रे! दुस्वास करायचा सोड. देवी समज तिला. भले होईल तुझे. तिनेच घर बांधून ठेवलेय एकत्र. समाजलास?”

रुक्मी अशा आईची जरी मुलगी नव्हती तरी कुटुंबातली तिची वागणूक तंतोतंत आईशी जुळणारी होती. मनमिळावू, हसरी, प्रसंगी सडेतोड, हुशार, कामसू, गोरीपान, देखणी, लोभस, स्वतः होऊन मदतीला धांवणारी आणि कुटुंबातल्या सर्वांवर बेहद्द माया करणारी, आपपर भाव न जपणारी. म्हणूनच आईची लाडकी.

अशा रुक्मीचं लग्न होऊन ती सुखीच व्हावी ही इच्छा होणार नाहीतर काय.

*****

## ३
## आई (सविताबाई)-

मी सविताबाई, जामसंडूयांच्या खोतांच्या घरातून मिठबांवकर खोतांच्या घरात आले. मोठी सून म्हणून. लग्नाच्या वेळी वय असेल चौदा पंधरा वर्षे. आजही मला माझी आई आठवते. मी तिची तीसरी मुलगी. मला सख्खाभाऊ नव्हता. आम्ही सगळे एकत्र राहू. म्हणजे बाबा, दिगूकाका, विनूकाका हे तिघे व त्यांची मुले बायका. आम्ही सगळी दहा भावंडं. जमीन खूप सगळे भाऊ एकत्र रहात.

माझी आई सर्वांत मोठी सून. तिला मान सगळेच द्यायचे. दोन्ही काकू देखील फार मानाने वागवीत. तिच्या शब्दाला जबरे वजन होते. याचे कारण एकच. तिने सर्वांना आपलेपणाने वागवले. कोणी म्हटले की तुम्हाला मुलगा नाही तर काकांच्या मुलाना जवळ करून म्हणे “मग हे कोण माझे. देवान मला चार पोरगे दिलेत, दिसत नाय तुम्हाला!” खरंच आईने सगळ्या मुलाना आपल्या मुलांसारखेच वाढविले होते.

माझ्या आईची एक गोष्ट मला लग्नाच्या चार दिवस आधी समजली. आई माझ्या बहिणींचे लग्न झाले त्याच्या चार दिवस आधी, लग्न असेल तिला आपल्या बरोबर घेऊन झोपायची. मला वाटायचे असे का. त्याचा उलगडा माझे लग्न ठरले व चार दिवसावर आले त्यावेळी झाला.

हे चार दिवस मी आई बरोबर झोपायला गेले. पहिल्याच दिवशी तिने माझे लहानपण, माझ्या बहिणी, भाऊ, काका, काकी यांच्याबद्दल सविस्तर सांगीतलं. ती हे का सांगतेय ते मात्र मला पहिल्यांदा लक्षातच आलं नव्हतं. दुसऱ्या दिवशी तिने खरंच केवढं समजाऊन सांगीतलं. मी मोठी सून होणार होते. खोतांच्या घरी सगळे एकत्र राहातात. आपल्यामुळे कुटुंब तुटता नये एवढंच नाही तर ते एकत्र ठेवायसाठी झटायचं कसं. हसत मुख रहायचं. उद्या जावा येतील त्यांना आईची उणीव वाटू द्यायची नाही. सर्व मुलाना आपलीच समजायचे. आपपर भावाला मनात थाराच द्यायचा नाही. मोठ्यांचा शब्द प्राणपणाने जपायचा. काही आवडले नाही, तर त्यावर उहापोह, चर्चा काहीच करायचे नाही. गप्प

राहायचे. आपले स्वतंत्र मायेने भरलेले व्यक्तित्व तयार केले, की आपल्या शब्दाला मान मिळतो. मी मोठी सून होणार होते, म्हणून जास्त जबाबदारी होती. त्याचीच ती जाणीव करून देत होती.

जग वाईट तेव्हाच होतं, जेंव्हा आपण वाईट वागतो किंवा वाईटा समोर दोन हात करायला उभे ठाकतो. वाईट समोर आलेच तर त्याला वळसा घालून, चकवा द्यायला शिकलं म्हणजे झालं. त्याचा सुंदर मार्ग म्हणजे अबोल होऊन निषेध दाखवणं. केव्हा केव्हा आपल्याला काही समजलेच नाही असे वेड पांघरून पेडगावला जाणं.

आई कितीतरी सांगत होती मधेच कुरवाळीत होती. एक एक बोल मनावर कोरले जात होते. आमचेही कुटुंब एकत्रच होते. आईची वागणूक डोळ्यासमोर होती. आणि मी मिठबांवकर खोतांची सून व्हायला सज्ज होत होते.

लग्न होऊन आले. मिठबांवकरांच्या घरची पहिली सून आली. सासरे दोन, मोठे व छोटे व सासूबाई एक धाकटी. दोन दीर व लग्न झालेल्या दोन नणंदा. नणंदा दोन दिवसांत वश झाल्या. सासरे पण हळू हळू समजू लागले मोठे अगदी साधे. वेळच्या वेळी चहा मिळाला की खूष. मी आल्यानंतर कामे एक एक करून समजत गेले. सगळे घरातले संभाळू लागली व सासू बाईना आराम मिळू लागला. त्या खूष. धाकटे सासरे थोडे हुषार. माणसे चटकन ओळखत असावेत. मोठ्या भावाला म्हणताना ऐकले. ‘‘लक्ष्मी आणलीस रे बाबा! भले करील कुटुंबाचे. मला काळजी होती रे. कशी कोण येईल नी वेगळा संसार मागील. पण नाय रे गुणाची आहे सगळ्यांना सांभाळील.’’

महिन्याच्या आत तीन गड सर झाले. दोन्ही सासरे व सासूबाई. हळू हळू असाच जम बसत गेला. दोन्ही दीरांच्या सोयरीका करताना मुली पसंत करायला मलाच पुढाकार मिळाला. मी मधल्या दीराना जोखले होते. मनात नक्की केले. नात्यातली कोणीही जाऊ म्हणून आणायची नाही. आपल्याच माणसाना आणते हा दोष घ्यायचा नव्हता. एकदा माझ्या आईने विचारले, मामाच्या धाकट्या मुलीसाठी शब्द टाक मधल्या दीरांसाठी. मी कारण सांगीतल्यावर आई रागावली तर नाहीच, पण हंसून शाबास म्हणाली. सगळा उपदेश चांगलाच रुजवलास म्हणून जवळ पण घेतलेन. तिने आणखी काही विचारले नाही. पुढे बोलणार तोच आई म्हणाली, मी जाते कामे आहेत. मला आणखी सांगायची ओढ वाटत होती, हे तिने ओळखले असे वाटले व मला तोडले. आईला वाटले पुढचे पुराण मी सांगणार. माझ्या सासरच्या गोष्टी तिला अजिबात ऐकायच्या नव्हत्या. बरोबरच आहे, चांगल्या बरोबर कागाळया आल्या तर? म्हणूनच संभाषण तोडले तिने.

आता जाणीव होत होती आईने आपल्या वागणुकीने दुसऱ्यांच्या मनावर कसा ताबा केलाय. तिला हवे तेच तुम्ही बोलू शकत होता. दुसरे काही बोललात तर कानपिचक्याच बसल्या असत्या. मलासुद्धा हेच करावे लागणार याची खात्री पटली. त्यासाठी बोलणाऱ्याचे बोलणे खुंटवायची कला अवगत करायला पाहिजे. जशी आत्ता आईने केली.

मिठबांवकर खोतीण गावातल्या बायकांत प्रिय झाली, तशी घरच्या मंडळीतही. मी आईचा उपदेश तंतोतंत पाळीत होते. त्यामुळे दोन्ही सासरे, सासू पहिलेच वश झाले. मग धाकटे दीरही मान देऊन वागू लागले. दोघांच्या बायकांची पसंती करताना माझ्या मताला वजन दिले गेले. जावाना हे लग्ना अगोदरच समजले. त्यामुळे त्याही आल्या दिवसा पासूनच मान देऊन वागू लागल्या. मी एकच केले होते. मुली एकत्र कुटुंबात वाढलेल्या आहेत एवढेच पाहिले. माझ्या लग्नानंतर दोन वर्षांत मधले दीर व नंतरच्या दोन वर्षानी धाकले दीर लग्नबंधात बांधले गेले. मिठबांवकर खोतांचे घर गोकुळ व्हायला वेळ लागला नाही. एका मागोमाग बाळंतीणीची खोली अडू लागली. थोड्यांच दिवसांत चित्रा, शकुंतला, शाम, रुक्मीणी, गुरुनाथ, मधुकर, सुधा, बाळकृष्ण, शारदा, शालीनी, जयंत, वैशाली, मोहन, गीरीजा, गोपीका, तपन, सुमती अशी मुले आम्हा तीन्हीना होत गेली. एकत्र असल्यामुळे प्रत्येकीचे पहिले बाळंतपण सोडले तर बाकी सर्व घरीच होत गेली. कुणाची कसलीच आबाळ बाळंतपणांत झाली नाही की मुले मोठी करण्यांतही काही नडले नाही. माझ्या दोन मुलींची लग्ने झाली. आता नंबर होता रुक्मीणीचा मधल्या दीरांच्या मुलीचा. प्रत्येक निर्णयात आत्तापर्यंत माझा विचार घेतला जायचा. पण मधल्या दीरानी. परस्पर सोयरीक केली. सासरे व माझा विचार घेतला नाही. हे सर्वाना खटकले. आता सासूबाई जाऊन दोन वर्षे होत आली होती. दोन्ही सासरे एकमेकाना सांभाळत, बोलत वेळ काढीत. आम्ही तीन्ही सुना त्यांचा शब्द पडू देत नसू. त्यांना हवे नको ते पटकन दिले जाई. तशी संवयच सगळ्या सुनाना हळूवारपणे घालण्यात मला यश मिळाले होते. मुलींची मदत होतीच. पण उत्साहाने करणारी रुक्मी. फुलपाखरां सारखी घरभर भिरभीरत राही. कोणत्याही कामाला ना नसे.

रुक्मीणीचे लग्न ठरले आणि पहिल्यांदा मनात आले. कोणीतरी अट्टाहासाने सांगतेय ही मुलगी त्याची आहे, माझी नाही. खरेतर ती मला सर्वांत जास्त जवळची. अतिशय प्रेमळ, गोड बोलणारी, कुठलीही गोष्ट नाही पटली तर सडेतोड बोलणारी. सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे अतिशय निर्भय. तिच्या आजोबांशीही गप्पा मारणारी, त्यांना हवे नको ते

पहाणारी. वडील लोकांचा शब्द पडू न देणारी. वडीलधाऱ्यांची पाठ चेपून दे, पाय चेपून दे असली कामे आनंदाने करणारी. फिरताना सगळ्या गोष्टी अचूक टिपणारी. कोणाचीही चूक अचूक ओळखणारी व सडेतोडपणे दाखवून देणारी, सगळ्यांवर सारखीच माया करणारी. म्हणूनच सगळ्यांची लाडकी. मलाही माझीच मुलगी असल्यासारखी. पण आता का कोणी सांगतेय की ती माझी नाही. कुठेतरी हृदयात एक बारीक कळ, मनात चुकल्या चुकल्या सारखी हुरहुर लागलीय. पण ती कसली? रुक्मी माझी मुलगी नाही याची जाणीव दिल्याची? मी असा विचार आयुष्यात कधीच केला नाही.

मिठबांवकर खोतांचे कुटुंब एकत्र राहील, गुण्यागोविंदाने नांदेल यातच मला आनंद होता. मग एका छोट्या प्रसंगावरून मी एवढी का अस्वस्थ झाले? मग उत्तर मिळाले. काळजी! फक्त काळजी वाटत होती. घर बरे असेल ना? रुक्मी सुखी होईल ना? मला जरा घरच्या लोकाना भेटता आले असते तर जोखता आले तरी असते. आणि हीच रुखरुख मनात घर करून चेहेऱ्यावर उमटत होती असावी. बहुतेक माझ्या चेहेऱ्यावरच्या रेषा बदलल्या होत्या त्या पाहून मधली जाऊ बोलली “आई! नको फार विचार करूत. सगळ्यांचे प्रारब्ध काय तुम्ही लिहीणार? सटवीने ते पाचव्या दिवशीच लिहीलेन. रुक्मी स्वभावाने तुमच्याच सारखी आहे. जिथे जाईल तिथे चांगलाच संसार करील. ह्याना म्हणू देत माझी मुलगी. पण माझ्याहीपेक्षा तुमचीच मुलगी शोभते हो.” मग एक हुंदका देऊन जवळ बसली. माझ्या तोंडून पटकन निघाले. बघ सगळीच मुले आपलीच आहेत, मी माझीच कशी म्हणू? फक्त रुक्मीच्या नशीबात सुखच यावं, असा विचार करते. तो सगळ्याना का समजत नाही?

तेवढ्यात शाम आला. मला व जाऊबाईना त्या स्थितीत बघून तसाच माघारी परतला. मग मला त्याचे बोलणे आठवले. किती समजूतदार झाला होता. रुक्मीची काळजी केवढी करीत होता. मी त्याला कर्तव्य म्हणून दटावले होते. पण त्याने मला सुखावले होते. पुढच्या पीढीतला कर्ता तोच होता. आणि त्याला कुटुंबाची काळजीही होती. इनामदारांची माहिती देखील काढली होती. रुक्मीचा खरा रक्षक भाऊ असल्याचा पुरावा त्याने दिला होता. हे एक समाधान मिळत होते. खरं तर माझे संस्कार, माझ्या आईचा अमोल उपदेश यांचे दर्शन मला सुखावत होते. व रुक्मीची काळजी सतवीत होती.

लग्नाला आठ दिवस असतील. मी सगळ्याना सांगीतले. जाऊबाई शेवटचे चार दिवस रुक्मी माझ्याबरोबर झोपणार. तुम्ही पाहिजे तर आत्ताच कुशीत घ्या. जाऊबाईनी फक्त भरल्या डोळ्यानी मान हलवली. धाकटी जाऊ पटकन म्हणाली आजपासून दोन

दिवस रुक्मी माझ्याकडे. एका बाजूला सुमी नी दुसऱ्या बाजूला रुक्मी. रुक्मीला सुमीचा लळा फार आहे.

मी पहात होते आता सुधा सुमीला जवळ करू लागली होती. सांभाळू लागली होती. एवढ्याशा पोरीला कुठून जाण आली? रुक्मी जाणार तर सुमीला आपण सांभाळायचे? मला अप्रुपच वाटले. मनात आले हिला जाऊबाईनी तर नाहीना सांगीतले? मी तसे विचारताच त्या म्हणाल्या "अहो हे करतूत शामचे. दादा ना तो सगळयांचा. त्यांनी हेरलेन पुढचे नी सुधाला ही जबाबदारी सोपवली. खरा दादा शोभतो."

एक सुस्कारा समाधानाचा निघाला. शांतपणा, समाधान मिळालं की जो सुस्कारा निघतो तो किती सुखावून जातो त्याची प्रचिती येत होती. मनात आलं कष्टांचं चीज होत आहे.

लग्न घर दोन दिवसात भरू लागेल. दोन्ही नणंदा येणार त्यांची पिलावळ येणार. त्यांचे सर्व व्यवस्थित व्हायला पाहिजे असेल तर कामे आत्ताच वाटून टाकली पाहिजेत. बायकांची कामे पटकरून वाटली. पण पुरुषांचे हवे नको बघायला एकटा शाम पुरणार नव्हता. त्याला सारखे बाहेर जावे लागत होते. गाडी जुंपून सामान आणून टाकीत होता. मग मदतीला गुरू दिला तर? तो बापाचाच नमुना. बहिणीचे लग्न मनावर घेतलेलेच दिसत नव्हते. बाप निघाला की हा ही बरोबर निघे. मनात विश्वास वाटत नव्हता. मग गुरूला बोलवून विचारले. बाबा रे बहिणीचे लगीन आहे. पाहुण्याना हवे नको ते पहाणे, त्यांना पथारी लावून देणे, पान सुपारी चहा मिळतो पहाणे ही कामे तुला करायला लागतील. मला त्यात हलगर्जीपणा चालायचा नाही. तुझे बाबा तुला सारखा बरोबर घेऊन फिरतोय. आत्ताच सांग. मागून गडबड नको.

मग तो जे बोलला ते अजबच होते. म्हणाला "काकाने मला अगोदरच कामं सांगून ठेवलीत. इनामदारांचे व्हराड देवळात उतरणार. मी नी काका तिथेच त्यांच्या दिमतीला, काय हवे नको ते बघायला जाणार. मधूही मोठा आहे आता. इथली कामं त्याला द्या."

पहिल्यांदाच कोणीतरी माझ्या समोर बोलले. मला मिठबांवकर खोतांचे घर दुभंगण्याची लक्षणं दिसली या बोलण्यातून. मनात विचार आला रुक्मीची पावलं लक्ष्मीची, ती गेली की मिठबांवकरांचे सुख तर नाही हरपणार? थोडीशी थरथरले. विचार आला. मधुला दीरां बरोबर द्यावे. गुरूला इथेच थांबवावे. मग वाटले, दोघेही दुखावतील. रुक्मीच्या लग्नांत तोंडं उगीच वाकडी नको व्हायला. पण रात्री सगळयाना जमवले. कामे सांगीतली तेव्हा बोलले.

मधल्यांनी गुरूला घेऊन इनामदारांच्या दिमतीला राहायचे ठरवले आहे. मग आपल्याकडे उतरणाऱ्या पाहुण्यांना बघायला मधु असेल. बरोबर आहे ना? हा प्रश्न सरळ सरळ सर्वानाच टाकला. मला काय म्हणायचे आहे ते धाकल्या सासऱ्यानी लगेच ताडले. त्यांचे मत दोघांची गरज काय? असे. मग पुरुषांत थोडा वेळ चर्चा झाली. मी ऐकत होते. मला खरेतर बाप लेकाना जोखायचे होते. त्यांच्या मनात कुटुंब मोठे की त्यांचा स्वार्थ मोठा हे पहायचे होते.

मग धाकट्या सासऱ्यानी निर्णय दिला. गुरूने घरी रहायचं व मधूने मधल्या दीरां बरोबर जायचं. मधल्यांचा चेहरा पडला. मी बोलले तसे नको. गुरूलाच जाऊ दे बरोबर. मधु इकडे काही चुकला तरी आपलेच लोक आहेत. पाहुण्यांची उठबस व्यवस्थित व्हायला पाहिजे. आता त्यांचा चेहेरा खुलला. आमचे व धाकटे दीर कधीच कशात बोलत नसत. तसे ते गप्पच होते.

मी सुस्कारा टाकला. यात दडपण होते. मिठबांवकर खोतांचे कुटुंब मोडणार हे भविष्य ही परीस्थिती दाखवीत होती. उघड झाली नव्हती पण केव्हाही स्फोट होण्यासारखी नक्कीच झाली होती. मी तरी किती दिवस कसरत करणार होते?

कामाचे सर्व काही ठरले. सगळे झोपायला गेलो. आज शेवटचा दिवस. आज रुक्मी शेवटची माझ्या जवळ झोपणार. कालपर्यंत तिला सगळे मनाजोगते समजावता आले. तिनेही कित्येकदा मधेच थांबवून शंका विचारल्या. पोर खूपच समजूतदार होती, बुद्धीमान पण होती. आत्तापर्यंत तिला खेळता बागडताना, मुलाना सांभाळताना, लहानसहान कामं करताना पाहिलं होतं. पण ती किती हुषार, समजुतदार आहे हे मात्र गेल्या तीन दिवसांत समजले. मला खात्री पटली की इनामदारांच्या घरात गेली तरीही ती सगळे व्यवस्थित सांभाळेल.

आज मात्र मलाच अनावर होतंय. माझाच मनाचा बांध फुटेल असं वाटतंय. तिला कुरवाळताना हुंदका आवरावाच लागेल. नाहीतर तीच डळमळेल.

एवढ्यांत रुक्मी आलीच. मायेने जवळ घेत दोघी अंथरुणावर पडलो. आता चार दिवसानी ती इनामदारीण होणार याच विचारांत मी खूप वेळ तिला मायेने कुरवाळत बसले.

*****

## ४

## रुक्मिणी-

आई चार दिवस मायेने झोपवत होती. झोपायच्या अगोदर खूप काही सांगत होती. भांडण करायचे नाही, सगळ्याना माया लावायची, मोठ्यांचा मान ठेवायचा, त्यांना काय हवे नको ते छान बघायचे. जेवण छान करता यायला पाहिजे. कितीतरी गोष्टी सांगीतल्या. मी मनात ताडत होते. ती सांगत होती तशीच ती वागत असे. डोळ्यासमोर आईला आणायचे की आपले प्रश्न सुटणारच हे मनात पक्के गांठवले. पण शेवटच्या दिवशी आई गोंजारता गोंजारता बोलत होती. बोलण्या वरून समजत होते, आई रडतेय. मी बोलले नाही. तिची माया वाहात होती. रडतेस का म्हणून विचारून त्याला बांध घालणं माझ्या जीवावर आलं. हातांतून होणारा स्पर्श तिच्या अमाप मायेच दान देत होतं. मी किती साठवणार? डोक्यापासून पायापर्यंत आईच्या मायेने चिंब भिजून जात होते. मला ही माया आयुष्यभर पुरणारी होती.

आई काही माझी माय नव्हती. मी तिच्या पोटी जन्मले नव्हते. पण सर्वांत जास्त माया मला तिच्याच कडून मिळत होती.

मायकडेही दोन दिवस झोपले होते. पण तिचे सगळे प्रश्नच होते. माझी परीक्षा घेत होती. घरात जेवणाचे काम मायकडेच जास्त करून असे. मग मला निरनीराळे पदार्थ कसं करायचे ते सांगे तर कधी मला प्रश्न विचारून बरोबर येते की नाही ते पाही. मला वाटलं ती थोडी धास्तावली असावी. पोरीच्या हातून स्वयंपाक नीट नाही झाला तर तिला दोष येईल ही धास्ती. मग लहानपणच्या गोष्टी सांगून हंसवलेन. मायेन कुरवाळलेन. पण कुठलाच उपदेश नव्हता. मधेच साड्या बऱ्या वाटल्या का? दागीने आवडले का? असले काहीतरी विचारलेन. पण आई सारखी मायेने ओथंबली नाही. मी तिची मुलगी पण आईचा जीव माझ्यावर जास्त दिसला.

धाकल्या काकीकडे तेच झाले. दोन दिवस, एका बाजूला मी व दुसऱ्या बाजूला सुमी असे झोपायचो. काकी बोलू लागली की सुमी मधे मधे बोबडत बोलायची. हसू यायचे. मी जाणार असे कानी पडले की ओरडायची "नको जाव तू." मग केव्हा केव्हा म्हणायची "मी पण जाईन रुक्मीताय बलोबल." आम्ही दोघी हसायचो.

दोन दिवसावर लग्न आलं आणि दोन्ही आत्या, चित्राताई, शकुताई सगळे पाव्हणे गोतावळ्या सकट आले. गाव लांब. म्हणून शामदादा बैलगाडी घेऊन मिठबांवच्या बसवर सारख्या फेऱ्या करीत होता. इतर वेळी गुरूच बैलगाडी चालवी. अगदी जामसंड्या, देवगड पर्यंत जाई. पण आता तो मधल्याकाका बरोबर मिरवण्यात धन्य मानत होता. माझा बाबा म्हणून मधलाकाका एकदाही मायेचे दोन शब्द बोलला नाही, की मागचा भाऊ म्हणून गुरूने देखील हवे नको बघीतले नाही. पण शामदादा दररोज मोगऱ्याचे कळे नाहीतर सुरंगीची फुले घेऊन यायचा आणि सांगायचा "हार करून माळा गो सगळ्या सवाष्णीनी, आणि रुक्मी तू तर पयला हार घाल केसांत." तो सकाळीच जाऊन हे काम केव्हा करून यायचा ते समजायचेच नाही.

आता तर ह्या सगळ्या सवाष्णी जमा झाल्या होत्या. दोन आत्या, चित्राताई, शकुताई आणि घरातल्या व मी मिळून आठजणींसाठी फुले गोळा करायची. केवढा वेळ लागत असेल? पण शामदादाचे सकाळचे पहिले काम म्हणजे फुले आणायची. मग बाकीची कामे. केवढी माया होती पोटात त्याच्या. नाहीतर गुरू. नुसता बाबाबरोबर उंडरायला तयार. मला राग यायचा.

मांडव सजवताना देखील तेच. शामने मेढीना लावायला पतंगाचे रंगबीरंगी कागद आणले. गुरूला लावायला सांगीतले. तर गुरूने, देवळांत तयारी बघायला जायचे कारण दिले. मग दुपारी जेवणे झाल्यावर शामदादानेच सर्व लहानाना गोळा केले. म्हणाला "चलारे सगळे! मांडव सजवायला या. रुक्मीताईचा लग्न आहे ना, सगळे मिळून मांडव छान सजवूया." सगळी वानरसेना एकदम खुषीत आली. कागद कापायला मधु व शारदा बसली. कांजी लावायचे काम सुधाने घेतले. बाकी सगळी कापलेले, कांजी लावलेले कागद घेऊन शामदादाला द्यायला धांवत होते. एकच उत्सव, दंगा ओरडा चालला होता. मला फक्त पहायचीच परवानगी होती. लग्न माझं, मी काम नाही करायचं असं सगळेच म्हणत. मी ओटीवर बसून सगळे पहात होते. शामदादा किती कौतुकाने सगळे करीत होता.

एवढ्यात आई आली. बाहेरचा गोंधळ तिच्या कानी पडला होता. ती सगळे गप्प उभे राहून पाहू लागली. मी बाजूलाच बसले होते. तिचे लक्ष छोट्या सुमीवर गेले. कागद पकडून ती डुलूडुलू धावत होती. शामदादा कडे जाऊन तिचा पहिला घ्यायला सांगत होती. आई हंसली म्हणाली “खरं लगीन घर गे बाय. आणि ते दोघजण नाय ना यात? आनंद कसा घ्यावा, उत्सव कसा करावा कुठे माहीत याना. उंडारतायत बाहेर.” मला खरंच पटलं. किती खरी होती आई. चित्राताई, शकुताई आपल्या लहानग्याना सांभाळत मायला नी छोट्या काकीला स्वयंपाकात, फराळाचे डबे भरण्यात, सामान व्यवस्थित लावण्यात मदत करीत होत्या. मोठा काका खोपीत लाकडे शेणी भरायच्या कामावर देखरेख करीत होता. छोटा काका मांडवातच खाटा लावून पाहुण्यांची बैठक, झोपण्याची व्यवस्था करीत होता. तो सुद्धा हसऱ्या चेहेऱ्यानी मुलांचा मांडवातला दंगा पहात होता.

एका कोपऱ्यातल्या खाटवर दोन्ही आजोबा पान सुपारीचे डबे भरत होते. सगळेच काहीना काही काम करीत होते. हजर नव्हते ते दोघच माझे सख्खे बाबा आणि सख्खा भाऊ. गेले दोन दिवस ते देवळात तयारी करायला जात होते.

मांडव तयार झाला. संध्याकाळी भट येवून मांडव मुहूर्त करणार त्याची लगबग चालू झाली. फुले, अक्षता, हळद, कुंकवाची थाळी सारी तयारी छोटी काकी करीत होती. परसातलीच फुले तोडायला आता सगळ्या मुलाना पिटाळले होते. एकट्या सुमीला पकडून मी बसले होते. सुमी जायसाठी वळवळत होती. पण तिला मी घेतले आणि थोडी शांत झाली.

मातीच्या लिंपणाने होमाची जागा तयार केली व लग्नाची लक्षणे  मांडवात एक एक करून दिसायला लागली. आजोबा एका कोपऱ्यात बसून काहीतरी बोलत होते, माझ्याकडे पहात काही तरी बोलले की मला वाटे माझ्या बद्दलच असावे. एवढयात छोट्या आजोबांनी खूण करून मला बोलावले. म्हणाले “रुक्मे, तुझ्या बापाने इनामदार शोधलान पण भाऊबंदकी आहे गो घरात. तू काय भांडणात पडू नको हां. आणि काय जास्तच भांडण झाले तर आम्हाला कळव. जपून रहा गो पोरी.”

माया ओथंबत होती. दोन्ही आजोबा गप्प झाले, तरी ती मला समजत होती. “हो” म्हणत मी त्यांच्या शेजारी बसले. तसे म्हणाले, “इनामदार खरे पण घर भरलेले नाय आमच्या सारखे. एकाची दोन घरे झाली. नी दोनांत चिडीचूप राहातात असं ऐकलं. पोरीला करमणार नाय रे.” मी एक एक माहिती साठवीत होते.

भटजी आले. सगळी तयारी बघितली. आई दिमतीला उभी राहीली, त्यांना सगळे सामान  दाखवून काय हवे ते विचारत होती. एवढयात शामदादा आला. हळू हळू सगळे जमले, फक्त नव्हते ते मधले काका व गुरु आजोबांच्या लक्षात आले. त्यांनी विचारलेच "प्रसंग सुरू झालेत, हे दोघेजण केवा येणार " कोणीच काही बोलले नाही.

अर्ध्या तास झाला शामने मांडवाला आंब्याचे टाळ बांधून टाकले होते. होमाची लाकडे बारीक तुकडे करून दिली होती. सगळया मुलानी फुलांची रास बाजूलाच केली होती,

शेवटी भटजी म्हणालाच "पूजा चालू करूया, वेळ होतोय." आई बोलली यजमानीण आहे यजमान नाहीत. येतील एवढयात थोडे थांबा. तर भटजी म्हणाले "त्यांची जरुर नाही मांडव मुहूर्ताला." मग पूजा सुरू झाली. गुरु व मधल्या काका शिवाय.

आजोबानी विचारले "मधल्याला सांगीतलं होतं ना ह्या पूजेचं?"

"होय तर तीनदा सांगीतलंय." माय म्हणाली.

पूजा संपत आली तेवढ्यात मधला काका व गुरु आले. आल्या आल्या मधला काका ओरडला "काय रे भटा, माझ्या शिवाय पूजा कशी केलीस? थांबायचे नाही? माझ्या पोरीचं लग्न नी मीच नाही? "

"तुला फक्त दादागिरीच येते रे. लवकर यायला काय झालं तुला. तासभर वाट बघुनच पूजा केली आम्ही. रात्र पडलीय बघ.  काळोख झाला. भटजीला घरी जायला उशीर नाय होणार?" धाकटे आजोबा एकदम भडकून स्वतःच्या मुलाची खरडपट्टी काढू लागले.

आई बाहेर आली. तिने आजोबाना म्हटले. "बघा तुम्ही नको त्रास करून घेऊ. रुक्मीचं लग्न सगळ्या घरच्यांचेच आहे. अगदी मोठ्या पासून ते पोरां पर्यंत सगळे कामेच करीत होते घरात. ओजवत गाव नाही फिरत होते. पुढच्या पुजेला कोण हजर नसला तर पूजा थांबणार नाय. धाकल्या दीराना व शांतेला बसवीन पुजेला. लगीन पार पडणं महत्वाचं. घरातल्यांचेच मानपान काढायला वेळ नाय आमच्याकडे." .

मधला काका गप खळयाच्या पायरीवर बसला. माय गुरुला बाजूला घेऊन म्हणाली. "उद्यापासून तूंच ह्याना वेळच्या वेळी घेऊन ये. समजलं? नायतर मीच सांगीन मोठीला तुला वाटतं तसं लग्न कर, कोणासाठी थांबू नको, लाज येते रे मला तुमची." हे ती असे काही बोलत होती की मधल्या काकालाही ऐकायला जावे,

पुजा संपली भटजी गेला. मांडवात मुलांचा दंगा सुरु झाला व आलेल्या आत्यांनी मधल्या काकाला ताब्यांत घेतला. मोठी आत्या म्हणाली "सकाळ पासून बघतोय रे

आम्ही, तू नी गुरु गाव उंडरायला जाता. वेळेवर यायला नको ? काय चुकलं त्यांचं ? शाणा असशील तर सगळ्यांबरोबर रहा " मग छोटी आत्या बोलू लागली "देवळांत चार दिवसापासून तयारी करतोयस समाजलं. काय आरसे महाल बांधत होतास इनामदारांसाठी, गांवात उंडरून नी गावकरांच्या बरोबर फिरून लग्न नाय सांभाळलं जात."

मधला काका गप गप झाला, मग आत्यांनी गुरुला ताब्यांत घेतला. म्हणाल्या "उद्या पासून उगीचच बाहेर गेलास तर बघ. वऱ्हाड येईल तेवा जा. त्यांची व्यवस्था लावा. गुरवाला सांगा त्यांना काय हवे नको ते बघायला आणि घरी या सगळ्या बरोबर. समजलं ?"

दोघे जण अगदी गरीब चेहरा करून मांडवाच्या कोपऱ्यांत बसून राहिले. मग आईनी सांगीतले "उद्या सकाळी कांकणे भरायला कासार येणार गे. नी दुपार नंतर हळद लावूया. वऱ्हाड सकाळीच येणार. संध्याकाळी कांकणे भरून झाली, की घरशांती करायला भटजी येणार. सगळे जण हजर हवे दुपारी बारा वाजता." मला वाटले शेवटचे वाक्य गुरु व मधल्या काकासाठी होते की काय.

मग जेवणे झाली, जेवताना मुलं, बायका, आजोबा सगळ्यानीच हसत  बोलत जेवण केले. खरंच सगळे आनंदात सगळा प्रसंग करीत होते. फक्त दोनच माना खाली झाल्या होत्या. मला समजत होते असे वागू नये. असे वागल्यामुळे त्यांनाच बोलणी खावी लागली होती व आनंदातही सहभागी होता आले नव्हते.

दुसऱ्या दिवशी सकाळी दोन आजोबा सोडले तर सगळी पुरुष मंडळी, अगदी गुरू, मधु सकट सगळे तयार होऊन देवळाकडे चालत निघाले. शामने बैलगाडी जोडली. आई, माय आणि एकदोन छोट्या बहिणी फराळाचे डबे घेऊन निघाल्या. त्यांना शाम बैलगाडीतून नेणार होता. मी सगळी लगबग पहात होते. आत्या व धाकली काकी घरात होत्या. आता मात्र मला पोटांत कसेतरी होत होते. हुरहुर होती, की पोटांत गुरगुर व्हायचे, मग थांबायचे असे चालले होते. दिवस वेगळाच वाटत होता. हे गोकुळ सोडून जायचे, या माझ्या प्रेमळ नात्यांचा सहवास संपणार. जिथे जाणार त्या घरातल्या लोकांची काहीच माहिती नाही. कुणाला पाहिले किंवा भेटलेही नाही. घरात किती लोक आहेत तेही माहीत नाही. कसे होणार माझे? जमेल सगळ्याना सांभाळायला? हे विचार येतायत आणि पोटांत गुरगुरायला लागतं. कुणाला सांगू कां? लग्न तर उद्यावर आलेय. तब्येत, मन सगळं ठणठणीत ठेवायला हवं. मग हे असं कां होतय? छोटी काकीच आहे घरात सांगू का

तिला? नको बाबा, तिच भित्री आहे. उगीच आणि घाबरवून सोडेल. आता आई शिवाय सुटका नाही. आईचीच वाट पहायची. ती आली की तिलाच सांगायचं.

सुमी आली खेळायला. तरी मन रमत नाही. दिवसच वेगळा वाटतोय. हुरहुर लागून ऱ्हायलीय. सुमीला खेळवण्यांत पण मन रमत नाही. सुमी विचारतेय "रुक्मीताय तुला हळद लावणार?"

"हो"

"तू काय भाजी आहेस, हळद लावायला?"

"लग्नात लावतात गो सुमे." माझ्यातोंडून जरा त्रासलेलेच उत्तर गेले. मलाच नवल वाटले. सुमी बरोबर मी अशी कधीच बोलले नव्हते. सुमीलाही समजले. ती एकटक माझ्याकडे पहात होती. मग पटकन बोलली,

"रडतेस? वाईट वाटतं मला सोडून जाणार म्हणून? मग नको जाऊ. मी सांगते आयेला." एवढं बोलत तो एवढासा जीव तिच्या आईकडे धावत सुटला. आणि माझे डोळे नकळत ओलसर होऊ लागले. छातीत गलबलू लागले. गळयांत एक मोठा गोळा अडकल्या सारखा वाटू लागला. सहन होईना आणि मग एका हुंदक्या सरशी डोळयांतून धारा सुरू झाल्या. हुंदके वाढले. भिंतीला टेकून मुटकळी करून हमसून हमसून रडू फुटले. का रडत होते तेच समजत नव्हते पण रडत होते. सुमी छोट्या काकीला ओढतच घेऊन आली. छोटी काकी शेजारी बसली मला जवळ खेचून माझे डोके मांडीवर घेतले व काही न बोलता थोपटू लागली. हळू हळू मायेच्या स्पर्षाने माझे हुंदके कमी होत गेले. डोळे पण कोरडे होऊ लागले. कितीतरी वेळ मी छोट्या काकीच्या मांडीवरच डोके ठेवून पडली होती. झोपायची वेळ नसतानाही केव्हा झोप लागली समजलेच नाही.

जेव्हा जाग आली तेव्हा माझे डोके मांडीवरच होते. वळून पाहिलं तर ती छोटी काकी नव्हती, आई होती. आई परत आली. तिला सगळे समजले असणार. सुमी समोरच बसली होती. तिचा चेहेरा रडवेला झाला होता. मला उठलेले बघून आई बोलली.

"असेच होते गो बाय शेवटी शेवटी. काय सुधरत नाही, पोटांत गुरगुरतं, आणि रडू येतं. माया तुटते की काय म्हणून रडू येतं गो. पण एक ध्यानात ठेव. आम्ही लांब असलो तरी तुझ्यावरची माया जरा पण ओसरायची नाय. तुझी अडचण समजली की धावणार तुझ्यासाठी. एकटं वाटून घेवू नको गो पोरा." मग तिने मुसमुसत मला कवटाळले. मिठीतून माया झिरपत होती आणि मला ओलीचिंब करीत होती. तिच्या शब्दानी मला बराच धीर आला. बऱ्याच वेळाने बोलली "जाऊ ग सोने? कामे आहेत गो. नायतर कवटाळूनच

बसले असते तुला.” माय कामातच होती. छोटीने गोंजारून झोपवलेन. आईने उठले तर कवटाळून मायेने आंघोळ घातली. वर केवढं आधार वाटेल असं बोलली. मनातून सगळं निघून गेलं. पोट गुरगुरायचं थांबलं परत अगदी पूर्वीसारखी झाले.

आईची हीच जादू समजायला कठीण. किती सहज तिने सांगीतले. मायेने सांवरले. पहातच बसले. आईत केवढी मायेची ताकद भरलेली आहे. ती त्याचा किती सुंदर उपयोग करून सगळ्याना सावरते. मला हे लक्षात ठेवलेच पाहिजे. इनामदारांकडे उपयोगाला हेच जास्त पडेल.

दुपारी मला नऊवारी साडी नेसवली. नथ, गळ्यांतले दागीने, बांगड्या, पाटल्या सगळे घातले व पाटावर बसवले. गांवातून खूप बायका आल्या होत्या. त्यांनी लग्नाच्या ओव्या सुरू केल्या. मग मला सगळ्यानी हळद लावली. पिवळी पिवळी झाली होते. हळद देवळांत इनामदारांकडे पाठवायची गडबड सुरू झाली. आई मायला म्हणाली. “दोन कामे आहेत. एक हळद पोचवायची नी दुसरे रुक्मीला न्हायला घालायचे. तुला चांगले वाटेल ते तू कर. दुसरे मी करीन.”

माय म्हणाली “तुम्हीच ठरवा. सांगाल ते करीन”

“आता तू वरमाय गे. तू सांगायचे आणि आम्ही ऐकायचे.” आई बोलली.

तेवढ्यात मधला काका आंत आला म्हणाला “हळद द्यायला जायला लागेल. तयार आहे ना हळद. चल लवकर म्हणावं रुक्मीच्या आईला.” माय आईकडे बघू लागली. आईने हसून इशारा केला व माय निघाली. आईने ती परत येई पर्यंत मला आंघोळच घातली नाही. चांगली तासाभराने आली तेव्हा मला बघून म्हणाली “अजून तुला न्हायला नाय घातले गो?”

“तुझ्या मनात काय होते कुठे समजले? बरोबर घेऊन गेले ना. मग म्हटलं मुलीला न्हायला घालायचं मनात असलं तर? नको तुझी हौस मारायला. मी घातलीय दोघांना. घाल तूच आता.” आई दुसऱ्यांच्या मनाचा किती विचार करीत होती.

माय म्हणाली “तुम्हीय चला, दोघीय घालूया. नाहीतरी रुक्मी तुमचीच मुलगी शोभते. मी जन्म दिलाय इतकच.”

त्या मला आंघोळ घालत होत्या. आणि माय हळद घेऊन गेली, तिथली सगळी माहिती सांगत होती. इनामदारांचे व्हराड काही मोठे नव्हते. नवऱ्यामुलाच्या विधवा काकी व आई. दोन लग्न झालेल्या बहिणी, त्यांची चार पांच मुले, कोणाची कुठली ती काय माहीत नाही पडली. त्या दोघींचे यजमान व नवरदेवांचे मित्र की कुळाव्यांची पोरं ते

समजले नाही असे पांच सात जण. मग म्हणाली “इनामदार खरे पण माणसांचा दुष्काळ गे घरात.” यावर आई काहीच बोलली नाही. चेहेऱ्यावर एक सूक्ष्म विषण्णपणाची रेष आली व विरून गेली. मी न्याहाळतेय हे तिने ताडले व हसत म्हणाली “अग, रुक्मी जाईल तिथे गोकुळच होईल बघ. माणसे गोळा करील. गोड स्वभाव आहे गो रुक्मीचा.”

मग इकडचे तिकडचे बोलणे झाले. व आंघोळ आटपली. परत दुसरी नऊवारी साडी मी नेसले. सगळे दागीने घालून सजली. आईने सांगीतले आता लग्न होई पर्यंत बाहेर जायचे नाही. मांडवात गेलीस तर चालेल पण मांडवा बाहेर पाय ठेवायचा नाही. मी मान हलवली.

दुसऱ्या दिवशी लग्न. घरात रात्री उशीरा पर्यंत गडबड गोंधळ चालला होता. भटणी आल्या होत्या. जेवण त्याच करणार होत्या. त्यांना सांगतील तसे सर्व तयार करून द्यायचे काम बायका करीत होत्या. मध्यरात्रीनंतर सगळे आवरून बायका झोपायला गेल्या. मी देखील.

आज झोप येईचना. डोळे टकटकीत उघडे होते. सुमी वळवळली की थोपटत होते. पहाटे कधीतरी डोळा लागला तेवढ्यात माय हलवून जागे करून गेली. दिवसभर काहीना काही चालूच होते. लग्न संध्याकाळचे पण दुपारचे जेवण देवळात व्हराड्याना पाठवायचे होते. जेवून झोपले ती गाढ झोप लागली. कुणी उठवलेच नाही. चार वाजता जाग आली तर बाहेर लगबग चाललेली. सनई चौघडा वाजत होता. बहुतेक त्याच आवाजाने जाग आली असावी. आपले लग्न आणि अशी झोप कशी लागली? कुणी उठवले पण नाही. कसेतरीच ओशाळवाणे वाटले. तोंडावर पाणी मारून मी हळूच माजघरात शिरले. तिथे सगळयाजणी बसून हसत मजा करीत होत्या. आत्या, मोठ्या बहिणी, आई, माय, काकी सगळ्याच होत्या. आईचं लक्ष माझ्याकडे गेलं. म्हणाली “कशाला उठलीस इतक्यात? तासभर झोपायला हवे होते गो. नायतर रात्री वरातीत घोड्यावर झोपशील.”

सगळया हसत होत्या. मी त्यांच्यात जाऊन बसले. आई व मायच्या मधे जागा होती तिथे घुसले. मग ओव्याना, लग्नाच्या गाण्याना ऊत चढला. कोणी मला नाव घ्यायचे उखाणे शिकवू लागल्या. कोणीतरी हसत विचारले. “रुक्मे! इनामदारांचे, होणाऱ्या नवऱ्याचे नाव तरी ठावूक आहे काय गो?” मी मान हलवीत हो म्हटले तर छोट्या बहिणी सांग सांग म्हणून मागे लागल्या. मी हळूच पुटपुटले “आबासाहेब.” तेवढेच ऐकले होते. मोठे सगळे एकदम हसू लागले. का हसतात समजले नाही. आईने सगळयाना चूप केले. मग हळूच मला म्हणाली “आबासाहेब हे म्हणायचे नाव गो. खरं नाव शंकरराव. लक्षात

ठेव. देव शंकरावरून लक्षात ठेवायचे. नाव घेताना बरोबर आठवणार.” मी मान हलवली. असा वेळ चालला होता. संध्याकाळ होत आली. मला आई, माय, आत्या सगळ्यानी ताब्यात घेतले. परत आंघोळ घालून जरी काठाची हिरवी साडी नेसवली. केसाचा चक्री आंबाडा घातला. त्याच्यावर मोगरा, आबोली, ओवळी सगळ्या फुलांच्या वेण्या माळल्या. कितीतरी आंकडे केसांत घुसवले. मला डोके जड जड वाटू लागले. घट्ट बांधलेला आंबाडा, वर माळलेल्या वेण्या, आकड्यामुळे ताणले गेलेले केस यामुळे सगळे विचित्र जड वाटत होते. नाकात नथ, कानांत कुडी, दंडावर वाकी व दागीन्यानी गळा भरलेला. काही दागिने तर गळ्याला टोचत होते. मी आईला म्हटले दागिने टोचतायत, डोकं ताणल्यासारखं वाटतं. किती वेळ सहन करायचं हे?

आई हसत  म्हणाली “आयुष्यभर गो पोरा! दागीने उतरवशील उद्या परवा, केसही सोडशील पण संसार लागला ना पाठी तुझ्या, तो असाच टोचणार आयुष्यभर. सोन्याची हौस, फुलांची हौस पण बरोबर संसाराच्या कटकटी. मांडवापासूनच समजायला हव्यात. म्हणूनच सजवलं. सहन करायला शीक आत्तापासूनच.” आई सगळं असल्याच बोलण्यातून शिकवायची.

दिवस मावळायला झाला. मांडवात भटजींनी केव्हाच पूजा मंत्र चालू केले होते. माय व मधला काका पूजेला बसले होते. होमाचा धूर घरात शिरत होता. डोळ्या नाकांत शिरत होता. डोळे चमचमून पाणी यायचे. गुदमरल्यासारखे झाले की माजघराच्या मागच्या खिडकीत जाऊन श्वास घ्यायचा. असे चालले होते. बोलावले की मामा येवून बोहल्यावर नेणार तो पर्यंत मांडवाकडे डोकावायचे पण नाही, असे आई सांगत होती.

लांबून तासे, ढोल, सनईचा आवाज येवू लागला. तसे वरदेव आले करत सगळे बाहेर पळाले. अगदी करवली झालेली शालिनी पण पळून गेली. मला मात्र खोलीतच गौरीहाराची पूजा करीत बसवून ठेवले होते. सगळे मजा दंगा करीत होते. लग्न माझे पण मी घरात कैद होते.

चांगला अर्धा तास गेला व हळू हळू मोठ्या बायका तेवढ्या आत आल्या. माझा जामानिमा ठीक आहे तपासून मग माझ्या डोक्यावरून पांढरे उपरणे झाकले. खांद्यावरून ते ओघळत खाली आले. आईने दोन बाजू पुढे घेऊन पुढेही झांकून टाकले. गळयाकडे दोन्ही धारा घट्ट करून पीन लावली. हिरवीसाडी गुढग्यापर्यंत पांढऱ्या उपरण्याने पुरी बंद झाली होती. हात बाहेर काढताना तेवढी दिसू शकत होती. मी आता एकाद्या बाहुली सारखी दिसत होती.

तेवढ्यात मामा आला. मला घेऊन मांडवात जायचे होते. मला घेऊन निघाला. मागे करवली म्हणून शालिनी होती. मांडवात मंगलाष्टके सुरू झाली होती. मांडवात उतरताना शेवटची पायरी ओलांडली व एक शिरशिरी सर्वांग बधीर करीत गेली. हार घालून मंगलाष्टके संपली तरी ती बधीरता तशीच राहीली. डोळयांतून नकळत धारा केव्हाच सुरू झाल्या होत्या. पुढचे विधी ह्या बधीरतेतच चालले होते. कळसुत्री बाहुलीसारखी भटजी सांगेल ते करत होते. गळयात मंगळसूत्र घालायला सांगीतले व मी समजले मी या क्षणी इनामदारीण झालेय.

विधी चालूच होते. नाव बदलायचे आले. रुक्मीची पार्वती झाले. पुराणातल्या गोष्टी भक्तिभावाने पाळणारे लोक. शंकराची बायको पार्वतीच असली पाहिजे. रुक्मिणी कशी असेल! शेवटी सगळे विधी संपले पंक्ती बसल्या. नाव घेण्याचे, घांस भरवण्याचे विधी आटपले व वरात निघाली. घोडा सज्ज होताच. माझी पाठवणी करताना सगळयाच बायका रडत होत्या. सुमीने कहर केला."नको जाव" चा घोष काही थांबत नव्हता. मध्यरात्र उलटली तरी ती एवढीशी पोर तिच्या रुक्मीतायच्या पाठवणी साठी जागी होती. तिला आवरताना सुधाची तारांबळ उडत होती. डोळयातले पाणी पुसू, की सुमीला आवरू काहीच समजत नव्हते सुधाला.

मी एक एकाची मिठी सोडवत होते. सोबत मिठबांवकर खोतांची इनामदारीण होत जात होते.

*****

अक्षय कुलकर्णी

## ५

## आई (सविता बाई)-

रुक्मीचं लग्न पार पडलं. आज सकाळीच वऱ्हाड निघालं. इनामदाराना पाहिलं. एवढ्या लहान वयात राबटच वाटले. इनामदारीची श्रीमंती कसल्यातरी राबटपणाने झांकळली होती असे वाटले. असेल या वयात भावांबरोबर चाललेल्या भांडणांमुळे किंवा वादांमुळे राबटपणा आला असेल अशी मनाची समजुत काढली.

घरी आले पण जीव हुरहुरत होता. माझ्या मुलींच्या वेळेला एवढं नव्हतं वाटलं. रुक्मी केवढी जीवाची होती हे आज जाणवत होतं. मी जरा गप्पच झाले. मी गप्प झाले आणि सगळे घर गप्प झाले. एकटी सुमी तेवढी बडबडत होती. सुधाला रुक्मीतायकडे ने म्हणून सतवत होती. व्यवहार चालले होते. पण निर्जीव असल्यासारखे वाटत होते. दुसऱ्या दिवशी मधलीने भानावर आणले. बोलली "रुक्मीवर तुमचा फार जीव हो. पण म्हणून काय अशाच राहाणार. तुम्हाला बघून कोणाचय मन लागत नाय. पाच परतावनाला लवकर बोलवूया हवतर."

मी भानावर आले. पहिल्यांदाच मनातले सगळे चेहेऱ्यावर दिसून गेले. मग बोलू चालू लागली. आठदहा दिवस झाले असतील इनामदार, रुक्मी व शालू याना आणायला मधले गेले. संध्याकाळी घेऊन आले. त्यांची सगळी तयारी करण्यात दिवस भरभर गेला. संध्याकाळी सगळे आले.

शालूला मधलीने विचारले, कसं आहे रुक्मीचं घर. आणि शालूने एकदम टकळीच सुरू केली. "मोठ्ठा वाडा आहे. पुढच्या बाजूला गेला तर चुलीकडून काय पण समजत नाय इतके लांब. माडी आहे पण वर कोणी जायचं नाय. फक्त इनामदारच जातात वर झोपायला. रुक्मीताईन चहा, जेवण सगळं वर द्यायचं. झोपाळा होता, खेळायला हुंदडायला हे मोठ्ठं परसू परडं गे, पण माणसंच नाय त्यांची. फक्त तीनच माणसं. बहिणी

आलेल्या त्याय गेल्या तिसऱ्या दिवशी. मग कंटाळाच गे. लवकर का नाय पाठवलंस गे? मी कंटाळली तिथे."

मी शालूला दामटले असे बोलू नये सांगीतले खरे, पण मुलांमाणसांत वाढलेली माझी रुक्मी कशी निभावणार वाटू लागले. रुक्मीने मात्र काहीच सांगीतले नाही. मी तिचा चेहरा न्याहाळून काही थांगपत्ता लागतो का पहात होते. पण ती अगदी सहज वागत होती. अतीव आनंद नाही की कसली टोचही नाही. खरोखर किती तयार झाली होती ती. पण तिची माय आणि छोटी थोडीच गप्प बसणार. त्यांनी एक एक विचारायला सुरवात केली.

"काय गो कसं आहे तिथे. रुळलीस ना?"

"बरं आहे."

"माणसं फार नाहीत करमतं गो?"

"कामात खेळायला वेळ कुठे. माणसं थोडी मग काम नको उचलायला."

"आणि तुझे कसे आहेत? बोलतात की नाय तुझ्या बरोबर?"

"माय! तुझे किती बोलतात गे तुझ्या बरोबर? तितकेच बोलतात गे ते पण."

मला हसू फुटले. मधलीला म्हटले, रुक्मी तयार झाली. माहेरचे घरच्याना सांगणार नाय व घरचे माहेरला आणणार नाय. उगीच विचारत बसून भंडावू नकोस तिला. मग मन एकदम बिथरू लागले. ही काही सांगत नाही ते माझे संस्कार म्हणून की काही दडवतेय आम्हाला त्रास नको म्हणून? तशी मुलांबरोबर ती खेळायला पण बाहेर नव्हती पडली. आम्हालाच मदत करीत बसली. दिवसातून चार वेळा चहा घेऊन बाहेर इनामदाराना देऊन आली. दुपारीच पांचपरतावनाचा घाट होता. कोंबड्याची सागुती वडे ठरले होते. रुक्मीने सकाळीच एका सटात दही लावलेले मी पाहिले होते. पण मुद्दामच विचारले नाही. सगळे जेवायला बसणार तर मधलीला म्हणाली एक भाकरी थाप. हे तळलेले कमी खातात. मागीतली तर गरम वाढू. मला फार बरे वाटले. नवऱ्याच्या आवडी निवडी हेरल्या होत्या पोरीने. जेवताना पहिले वडे संपल्यावर इनामदार म्हणाले भात आणा. वाढायला रुक्मीनेच घेतले होते. कुणाचेही न ऐकता तिनेच वाढायचे कारण आम्हाला आता समजत होते. रुक्मीने त्यांना गरम भाकरी पण आहे हे सांगीतले व इनामदार खूष झाले. पहिली भाकरी वाढल्या बरोबर मधली चुली कडे धांवली. दुसरी पाहिजे म्हणायच्या अगोदर भाकरी तयार असली पाहिजे. पण एका भाकरी वरच भागले. मधले दीर मात्र त्यांना म्हणालेच,

"सागुती बरोबर वडे बरे लागतात, भाकरी काय रोजचीच."

ते फक्त हंसले. रुक्मीने मग दही वाढायला नेले. इनामदाराना द्रोणभर दही वाढून ती सगळ्यांसमोर विचारत गेली. शामने फक्त घाल म्हटले. रुक्मी शामकडे बघून मंद हसली. शामने शोभवून नेले होते. कोणीच दही घेतले नसते तर इनामदाराना कदाचित ओशाळे वाटले असते. शाम निभवतोय हे रुक्मीच्या व माझ्या दोघांच्या लक्षात आले.

एक नक्की झाले. रुक्मी नवऱ्याची पुरी काळजी घेत होती. आवड जपत होती. संसारशास्त्र छान उचलले होते तिने. काळजीचे कारण नव्हते. ती इनामदारीण होऊन सगळ्याना सांभाळणार याची मनोमन खात्री पटली. विचारा बरोबर एक सुस्कारा निघाला. गेल्या काही दिवसांचे दडपण त्या सुस्काऱ्या बरोबर निघून गेले. एकदम हलके वाटले. मनात आले मने जुळतात ती अशीच का? रुक्मी काही बोलली नाही की मी काही विचारले नाही. पण काळजी वाटणाऱ्या प्रश्नांची उत्तरे आपसुकच मिळाली. माझा चेहेरा हसरा झाला असावा.

“जावबाय! हसताय? काय झाले हो?” मायने विचारले. तशी माय धास्तावली होती. तिला मधल्यानी रात्रीच बोलवून सांगीतले होते. जावयांची बडदास्त तिनेच बघायची. जेवण छान झाले पाहिजे. मधल्याना सगळेच घाबरत. म्हणून ती धास्तीनेच मला विचारत होती. तिला वाटले काही चुकत तर नाही. मी तिच्या खांद्यावर थोपटून धीर दिला. डोळ्यानीच खुणावले, सर्व व्यवस्थित आहे. मागाहून बोलू. आणि तिचा चेहेरा निवळला. बाजूलाच रुक्मी सगळे ऐकत होती. नवऱ्याची तिने घेतलेली काळजी मला उमजलीय हे तिला समजले. आत गेलो तर म्हणाली “आई! त्यांना भाकरी लागते. म्हणून करायला सांगीतली. वडे नाय खाल्ले म्हणून हसता काय तुम्ही?”

“नाय ग बाई! तू त्यांना काय हवे नको ते पुढे पडून बघत होतीस ना, त्याची मजा वाटत होती. माझी मुलगी संसारी होताना बघून हसायला नाय येणार? समाधानाचं हसू होतं ते.” मी सांगत होते. तिची माय तृप्तीने संतोषत होती व रुक्मी लाजेने लाल होत, कौतुकाने अवघडत, खाली मान करून उभी होती.

दुसऱ्याच दिवशी जावई व रुक्मी निघून गेले. घरी सासू होती. रुक्मीची नणंद दोन दिवस त्यांना सांभाळायला आली होती. तिला परत जायचे. सगळ्याच अडचणी. केवळ मनुष्य बळ नाही तर केवढा व्याप वाढतो. आम्ही सगळे एकत्र आहोत म्हणून कोणीही गरज पडली तर कुठेही जाऊ शकत होतो. रुक्मीला ते सुख नव्हते. म्हणजे तिला माहेरवाशीण म्हणून येणं जमेल की नाही या बाबत शंकाच होती.

पण एक गोष्ट जाणवली. रुक्मी इनामदारांचे घर सांभाळायला सज्ज झाली होती.

दोन दिवस झाले नेहमीचीच कामे चालू होती. व मधले चार दिवसांसाठी बाहेरगावी जातो म्हणाले. कुठे जाणार हे कुणी विचारले देखील नाही. ते गेल्यानंतर समजले की ते रुक्मीकडे इनामदारांच्या घरी गेलेत. मला मनात खोटे वाटले. सासऱ्यांनी, मोठ्यांनी तरी विचारले पाहिजे होते. असं मुलीच्या घरी जाणं बरं नाही हे सुनवायला पाहिजे होतं. पण बोलणार कोण? चार दिवसानी आले ते सासऱ्याना सांगू लागले. इनामदारांना चुलत भावाचा फार त्रास आहे. वडील जायच्या आधी त्यांनी यांच्या कुळाव्यांना आपल्याकडे खेचले व यांची जमीन आपली म्हणून ठरवली. ती गोम सोडवायला म्हणे मधले गेले होते. मनात पाल चुकचुकली. याना कलागती वाढवायची काय जरूर. पण यात मला काय बोलण्यासारखे नव्हते.

मोठे सासरे म्हणालेच, असे पाव्हण्यांच्या फंदात पडू नये रे. ते काय ते निपटतील. भांडणं वाढली तर दोष येईल आपल्याला. पण मधले ऐकतील तर खरे. जावई लहान आहेत, आपण मागे नाही उभे राहिलो तर त्यांना कोण तारील, वगैरे बडबडायला लागले. मग उठून निघून गेले. मोठे सासरे गप्प होते. लहानगे पण विचारात होते. पडवीच्या धारेवर बसून त्यांचे संभाषण मला स्पष्ट ऐकू येत असे. लहान सासरे बऱ्याच वेळाने म्हणाले “मधल्याची लक्षणे ठीक दिसत नाहीत. हावरा आहे रे. जावयांचेय गिळायला बघतोय वाटते रे.” माझ्या पोटात गोळा आला. माझे सासरे, दोघेही सख्खे भाऊ. पण लहान भाऊ आपल्याच मोठ्या मुलाचे दोष अगदी स्पष्ट करून दाखवत होता. पण मला या गोष्टीत दखल देता येत नव्हती. ते माझे सख्खे दीर नव्हते. रुक्मी त्यांची मुलगी होती. लग्नपण त्यांनीच परस्पर ठरवलं होतं. कदाचित इनामदारांची एकंदर परीस्थिती यांना संधीच वाटली असावी. त्यांना मदत करायचे ढोंग करत आपले उखळ पांढरे करून घ्यायचे असावे. पण यात संबंध बिघडले तर, ते रुक्मीला भोगावे लागतील, याचाही यानी विचार केला नव्हता. खरेच असा विचार असेल तर केवढे स्वार्थी आहेत हे.

पुढे तर आमच्या घरचा विचार आला. दोन्ही सासरे गेले तर आमची खोती एकत्र रहाणं कठीण. आमचे काही बोलत नाहीत, छोटे दीरही तसेच. मग स्वतःच्या स्वार्थासाठी दोन कुटुंबांची परवड तर करणार नाहीत? आता वडीलधारे असताना कोणाला जुमानत नाहीत मग काय होईल? मला हे सुंदर कुटुंब दुभंगताना दिसत होते. इलाज नव्हता. वंशवेल वाढत गेली की दुभंगत जाते हेच खरे. पण यावर मला काहीच बोलता येणार नव्हते. जो पहिले बोलेल त्यालाच कुटुंब मोडल्याचा दोष आला असता.

सासऱ्याना अंदाज देणं जरुरी वाटत होतं. एकदम धक्का नको बसायला. दोन्ही सासरे म्हणजे प्रेमाच्या मूर्ती होत्या. दोघांत नजर लागेल असं सख्य होतं. एकाला चिमटा काढला तर दुसऱ्याच्या डोळ्यांत पाणी यावं एवढं एकमेकांवर प्रेम. त्यांना अचानक धक्का पचवता आला नसता. पण सुचवायचं तरी कसं? आमचे व छोटे दीर दोघेही कामाच्या बाबतीत वाघ. सगळ्या कामांचा फडशा पाडणारे पण कुटुंबाच्या बाबतीत कोणत्याही प्रश्नांत लक्ष न घालणारे. मोठे, वडील म्हणतील ती पूर्व. कदाचित त्यांना स्वार्थ म्हणजे काय हेच माहीत नव्हतं.

मग हे नाजुक काम कसं करायचं?, कोणी करायचं? हेच मला सुचत नव्हतं. पुढचे क्लेश, भांडणं थांबवायची असतील तर सासऱ्यांच्या हयातीतच काही मार्ग शोधावा लागेल. रुक्मीच्या लग्नात मधल्यांचे वागणे सगळ्यांनाच खटकले होते. कोणी उघड बोलत नव्हते पण मनात नक्कीच काहीतरी आलेच असणार. असे प्रश्न दाबून टाकल्याने सुटणार नव्हते, उलट चिघळलेच असते. पण बोलणे सुरू करायला कोणती तरी संधी मिळायला हवी होती.

महिनाभर झाला असेल, मधले सांगू लागले. गुरूला इनामदारांच्या मदतीला रुक्मीकडे पाठवायचे. ते ऐकून मोठे सासरे एकदम म्हणाले "पाव्हण्यांकडे ठेवणे बरे दिसते? इथे खायला प्यायला मिळते ना? कोणाचे उपकार कशाला घ्यायचे?"

"तसे नाही, ते एकटे आहेत, भाऊबंदकी फार, एकटे पुरे नाय पडत. रुक्मीलाय सोबत होईल." मधले.

"अरे पण त्यांनी बोलावलंय? त्यांचा काय निरोप नाय काय नाय मग आपणच कसं ठरवायचं? आणि हे बघ घरचे निर्णय तू परस्पर घ्यायला बघतोस ते काय बरोबर नाय. आम्ही मोठे लोक आहोत अजून." धाकटे सासरे आता आपल्या मुलावर घसरले होते.

"मी काय चांगलं सांगीतलं तर कोणालाच पटत नाय. सगळे त्यांच्या हातून गेले तर रुक्मीचे काय होईल? विचार करा. एवढे सगळे सांभाळायला व्हायला नको एकट्याला?" मधले बोलले.

"कोणालाय इथून पाठवायचे नाय. आणि तूंही सारखे सारखे जात जाऊ नको त्यांच्याकडे" धाकटया सासऱ्यानी निर्णय दिला.

"काय बोलून उपयोग नाय. सगळे घालवून बसले की माहीत पडेल. प्रत्येकाने आपल्या जमिनी आणि इस्टेटी बरोबर सांभाळायला नकोत? काय पण ऐकू नकोत माझे. समजेल मग" असा त्रागा करीत मधले तरातरा बाहेर निघून गेले.

थोडा वेळ शांततेत गेला. ओटीच्या पाळीवर मी तांदूळ निवडत बसले होते. त्याच वेळी धाकले सासरे म्हणाले "काय करायचं रे ह्याचं? उद्या कुटुंबात कली नाय आणलान म्हणजे मिळवली."

मोठ्या सासऱ्यानी हुंकार भरला व विचारात पडले. मी विचारले, मी बोलू का? लगेचच धाकले सासरे बोलले "अग तू बसलीस म्हणूनच बोललो मी. आजपर्यंत तू सगळं कुटुंब एकत्र धरून ठेवलंस. ह्याला कसा सांभाळशील, आयकेल तुझं आमच्यानंतर?"

मी मनाचा हिय्या करून बोलत गेले. बघा! शरीरांत रोग शिरला तर कडूजार औषध घ्यायलाच लागते. तसंच औषध आज तुम्हाला दोघांना घ्यावं लागेल. झाड वाढत जातं मग फांद्या फुटतात. त्यांच्या दिशा वेगवेगळ्या असतात. थड किती दिवस एकत्र करायला बघेल. त्याने फक्त फांद्यांना प्रेमच द्यायचं असतं. त्यांच्या दिशा ठरवता येत नाहीत. त्या फांद्याच ठरवतात. त्यांना जास्त प्रकाश कुठून मिळेल, वाढायला जागा कुठच्या बाजूला आहे, हे बघूनच त्या दिशा ठरवतात. थडाने मात्र सर्वांना सारखे पोसायला होईल हे पहायचे असते. ती जबाबदारी थडावरच असते. हा निसर्गाचा, देवाचा नियम आहे. त्याच्या विरुद्ध आपण वागलो तर दुःख आणि नाशाला कारण होतो. तुम्हाला तुमच्या हयातीतच सर्वांच्या सारख्या पोषणाची दिशा ठरवायला लागेल. मग नंतर भांडण, अरेरावी बळकावणे यांना जागा राहाणार नाही. पहा तुम्हाला पटते का?

"अगो! तू आम्हाला सगळ्या वाटण्या करायला सांगतेस! आम्ही हा विचार पण करू नाय शकत. पाप वाटतं गे." मोठे सासरे गदगदून बोलले. निर्मळ आत्मा तो, त्याला फार दुःख, वेदना होणार हे मला समजत होतं. पण कडू औषध पाजायला सुरवात करायलाच पाहिजे होती. मी म्हटलेच त्यांना की हे कडू औषध आहे. पहा आत्ताच प्यालात तर पुढची पीढी आनंदात व एकमेकाना आधार देत राहील. नाहीतर पुढे भांडण तंटे वाढतील व सगळेच दुःखी होतील. असे समजू नका मी घर मोडायला पहाते आहे. पण हेही खरे आहे की तुम्ही आहात म्हणून मी सांभाळू शकतेय. तुमच्या नंतर मला कोण किती ऐकेल सांगता येत नाही. रुक्मीच्या लग्नातले प्रसंग आठवा. आपसूक समजेल काय परिस्थिती होईल ते. आजनंतर परत यावर मी बोलणार नाही. एवढंच सांगेन सगळ्याना एकसारखेच वाढवलेय. प्रथा बाजूला ठेवून तुम्ही दोघानी सर्वांचा सारखाच विचार करा.

दोघे सासरे निःशब्द बसले होते. तांदूळ घेऊन मी घरात निघून गेले.

पंधरा दिवस झाले असतील. ह्या पंधरा दिवसांत मधले फार तुटक वागत होते. कामे करण्याचे सोडून दिले होते. इकडे तिकडे गावभर फिरण्यात वेळ घालवीत होते. या

सगळ्यामुळे माझ्या म्हणण्याला आणखी महत्व आले. सासऱ्याना माझे म्हणणे पटू लागलेले दिसले. दोघेच बोलत बसत. चिंताक्रांत दिसत. मग एक दिवशी मला बोलावले. धकटे सासरे म्हणाले “तू बोललीस ते पटते गो बाय! पण आम्हाला खूप पश्न पडलेत निकालच येत नाय. तेवा काय करायचे ते तुलाच विचारायचे ठरवलेय. तू कोणावरय अन्याय करणार नाहीस. ऐक आम्ही दोन भाऊ. दोन वाटे केले तर तुम्हाला अर्धा वांटा व त्या दोघांना पाव पाव वांटा होतो. मोठ्या भावाला वाटते आम्ही सगळ्यांना सारखेच राखले. सरळ तीन भाग करावे. पण मी म्हणतोय तू सगळे सांभाळलेस, मुले तुम्हाला जास्त तेव्हा तुम्हाला तुमचा अर्धा वाटाच द्यावा. फार तर दोन घरे बांधून लहान दोघांना द्यावी नी या मूळ घरात तुम्ही रहावं. तो मधला मग काय हवं ते करू दे. तुम्हाला दोन घरांना त्रास तर नाय. जमिनी वाटू आम्ही हिस्से ठरले काय. कसे?”

आम्ही सगळे सख्यांसारखेच राहिलोत. आम्हाला हांव नाही. माझे हे व मुले काही बोलणार नाहीत. तीन भाग व घरे बांधून द्यायची हे बरोबर. कुटुंब वेगळे झाले तरी गोडी राहील संबंध राहातील व कुळाव्यात आब राहील. पण तुम्ही हे सर्वांना बोलवून सांगा. मगच निर्णय घ्या. मी माझा निर्णय सांगीतला. ह्यांना विचारले पण नाही याची रुखरुख लागली. पण कुटुंबाची नाती मला जास्त महत्वाची वाटली.

आमचे बोलणे चाललेले मधलीच्या व छोट्या जाऊबाईंच्या लक्षात आलेले दिसले. त्यांनी विचारलेच. काय बोलणी चाललीत म्हणून. मी ‘समजेल’ एवढेच बोलून गप्प बसले.

चार आठ दिवस गेले असतील. मोठ्या आजोबांनी सर्वांना सांगीतले. संध्याकाळी लवकर या. संध्याकाळी सर्वांनाच त्यांनी बोलावले. त्यांचे मुलगेच नाहीत तर सुनांना पण बोलावले. सगळ्यानाच विचित्र वाटत होते. धाकटे आजोबाच बोलू लागले.

“तुमचे तिघांचेय भाग पाडायचे आम्ही ठरवलेय. आमच्या मागे सगळे गुण्या गोविंदाने रहावे म्हणून. कसं?”

“वडिलोपार्जित खोती तिचे भाग कशाला? आम्ही काय भांडणार? सगळे मायेने तर रहातोय” आमचे म्हणाले.

“मलाय तेच वाटतं.” छोट्यांनी दुजोरा दिला. मधले गप्पच होते.

“दोघजंण बोलले, तुझं काय म्हणणं?” धाकल्या सासऱ्यानी मधल्याला विचारले.

“मी काय म्हणू? हिश्शे कसे पाडणार, घर कसे वाटणार त्यावर सगळं आहे.” मधले बोलले आणि सगळे चपापले. आश्चर्यांत पडलो नाही ते आम्ही तिघेच.

"आम्हाला वाटलेलं नव्हतं रे वाटे करायचे आमच्या नशिबात येईल. आमच्या लक्षांत आले तुझे काय चाललेय ते. खर तर आमच्यामागे भांडण नको म्हणून करतोय." मोठे सासरे बोलले. त्यांना डोळे पुसताना सगळ्यांनी पाहिले.

"बघा वाटे केले तरी आत्ता कागदावरच राहातील. आमच्या नंतर तुम्ही वेगळे व्हाल आणि आपआपला वाटा घ्याल. तोपर्यंत एकत्रच राहायचे. घराचे भाग नाय पडणार. घर मोठ्याकडेच रहाणार." धाकले सासरे सांगतानाच मधल्यानी तोंड उघडले "आणि आम्ही काय भरडावर रहाणार बायका पोरांना घेऊन?"

"अरे पुरे ऐकून तर घे. दोन घरे बांधायची दोघांसाठी. खोतीचे तीन सारखे भाग करणार. कोणाचा भाग कुठला ते आम्हीच ठरवणार. त्याच्या भागाची जी जमीन असेल त्यातच त्याचे घर बांधणार. एकत्र राहिला असतास तर आनंद झाला असता. पण तसा होणं देवाच्या मनात नाय." आता मधल्याकडे रोखून बघत पुढे म्हणाले "आणि तुझा जीव शांत व्हावा म्हणून सांगतोय रे. कायद्याने खोतीचा खरोतर चौथाच भाग तुला येतो. मोठ्या वैनीचे आभार मान. तीनेच तीन हिश्शे करायला सांगीतलेन. मन मोठं ठेवायला शीक." एक उसासा टाकून ते गप्प झाले. आमच्या ह्यानी एकदा मंद हसत  माझ्या कडे पाहिले. बस्स! मला हवी ती पावती मिळाली होती.  पण दोन्ही जावा सैरभैर झाल्या होत्या. मधली तर अगदीच वैतागली होती. स्वतःशीच काहीतरी बडबडत होती. मी मुद्दामच लक्ष दिले नाही. दोन दिवसांनी दुपारी सगळे आवरून ती माजघराच्या कोपऱ्यात गप्प बसून होती. बहुदा रडत होती. मग मी जवळ गेले. विचारले काय झाले ते. गदगदून रडवेल्या आवाजात बोलली "आम्हाला बाजूला काढलंत! मी पण नकोशी झालेय? माझ्या तीन अजून लग्नाच्या आहेत. तुमच्या शिवाय मला जमणार कसे?"

तिची समजूत काढली. कधीच अंतर देणार नाही सांगीतले. बाजूला व्हायचे ते चांगले संबंध ठेवूनच हे समजावले. भांडणे करून नंतर सबंध बिघडवण्या पेक्षा वडील लोकांनी भाग करून दिलेले बरे. हे सगळे ऐकून एकच म्हणाली "आमच्यांच्यामुळे झाले. पण त्यांनी मला इकडे यायला नको म्हटले तर?" मग परत समजूत काढली. जबाबदारी पडली की सगळे तयार होतात तशी तू देखील होशील, असे बोलताच थोडी शांत झाली.

दोन दिवसांत फरक दिसला. तिसरा भाग मिळाला म्हणून मधले जरा खुशीत आले. खरेतर अजून जमिनींचे भाग करायचे बाकी होते. पण तिसरा भाग मिळणार एवढ्यावरच ते खूष झाले. त्यांच तारेत ते एक दिवशी जावयाकडे, इनामदारांकडे जायला निघाले. कोणीही त्यांना आडकाठी केली नाही. खुषीत आहेत, असूद्यात, तेवढेच चार दिवस

शांतीचे असा विचार मोठ्यानी केला. मला मात्र रुक्मीची खुशाली जाणायची होती. लाडू करून डबा दिला. गेले ते दोन दिवसांनी आले. रुक्मी चांगली आहे पण इनामदारांची आई अंथरूण पकडून असल्याचं समजलं. रुक्मीची फार धावपळ होते. मदतीला एक दोन बाया येतात बाहेरचे सांभाळतात. पण घरात सगळे जेवण सोवळयांत करावे लागते. त्यामुळे तिची फार गडबड होते. पण सगळे करते आहे. धाकट्या सासूबाई नावाजत होत्या.

मनात बरे वाटले. लहान असूनही जबाबदारी सांभाळत होती. मग रुक्मीच्या आठवणीत बुडून गेले. वाटले लग्नाला आठ महिने होत आले, एकादी चांगली बातमी येईल. मग परत कामाला लागावे लागेल. तिचे पहिले बाळंतपण आम्हालाच करायचे. परत तिचा सहवास मिळेल. मन हळुवार होत गेले.

*****

अरुणा कुळकर्णी

६

## रुक्मिणी-

लग्न होऊन इनामदारांच्या घरी आले. माय आणि बाबाच्या भाषेत मी इनामदारीण झाले. येत्या दिवसांत नवीन आयुष्याचा लेख समोर उलगडणार होता. रात्री घरी पोचलो होतो. सकाळी बघीतले तर हा मोठ्ठा वाडा होता. चौसोपी बनावट. पूर्वेला मोठा दिंडी दरवाजा होता पण तो बंदच होता. दक्षिण भाग सगळा चुलत दीराकडे व उत्तर भाग आमचा अशी वाटणी झाली होती. पश्चिमेला समाईकातल्या काही खोल्या होत्या. त्यांत देवघर, देवघरापुढची आरती, कीर्तन, गोंधळ असल्या उजवायच्या प्रसंगासाठीची खोली. आमच्या ऊत्तरेच्या भागातच जवळ जवळ दहा बारा खोल्या असतील. चारी बाजूला माडी काढलेली होती. माडीवर किती खोल्या होत्या माहीत पडले नाही. माडीवर फक्त आबासाहेब इनामदारच जात. त्यांच्याकडे कामासाठी येणारी माणसे, खंडकरी वगैरेच वर जात. आम्हा बायकांना वर जाणेच नसे. फक्त चहा, जेवण नेऊन द्यायचे व रात्री झोपायला जायचे.

एवढे मोठे घर पण माणसे मात्र मी धरून चारच. इनामदार त्यांची आई व एक काकी. लग्नासाठी म्हणून दोन नणंदा मुलाबाळांसह आलेल्या. त्या काय दोन दिवसांच्या पाहुण्या. स्वयंपाक घर एका टोकाला तर माडीवर जायचा जिना दुसऱ्या टोकाला. म्हणजे नको म्हणून कोणत्याही खोल्या बंद ठेवता येत नव्हत्या. सगळ्यांचे केर काढणे, सारवण करणे कसे होत असेल याचा विचार आला. एका बाईला हे शक्यच नव्हते.

तेवढयात तीन बायका आल्या. काकी सासूबाईनी त्यांना लग्नाचे लाडू, चिवडा दिले व त्या कामाला लागल्या. एकीने दुधाची चरवी उचलली व दूध काढायला गेली. दुसरीने घर झाडायला सुरवात केली. तिसरी स्वयंपाकासाठी लाकडे आणून टाकू लागली. मी एक एक काम कोण करते, कसे करते हे बारकाईने पहात होते. एक बाप्या आला केरसुणी घेऊन माडीवर गेला. म्हणजे माडीवरची साफसफाई गड्याने करायची. खालची कामे

बायानी करायची. ही रीत पहिल्याच दिवशी हेरली. मग काकी सासूबाईंबरोबर स्वयंपाक घरात जाऊ लागले तर त्यांनी थांबवले. प्रेमळपणे सांगीतले. स्वयंपाक घर सोवळ्याचे. देवाचे नैवेद्य करायचे असतात. तू मदतीला येणार असशील तर आंघोळ कर, सोवळे नेस व मगच आत ये. त्यांनी माझ्यासाठी सोवळे काढून दिले.

नणंदा मुलांना खाणे पिणे देण्यात गुंतल्या होत्या. एका बाजूच्याच खोलीत दुसरे स्वयंपाक घर बनवले होते. तिथे जेवण खाण बनवायची सोय होती. तिथे सोवळे पाळण्याची जरुर नव्हती. नणंदा मुलांसाठी तिथेच काही बनवून नेत होत्या.

मी आंघोळ आटोपून सोवळ्यातच स्वयंपाक घरात गेले. बापरे केवढे मोठे होते ते. चुलीच जवळ जवळ पांच सहा होत्या. काही ह्या भल्या मोठ्या तर काही लहान. पाण्याची मोठी मोठी घंगाळे, हांडे, घागरी सगळे व्यवस्थित रांगेत ठेवले होते. दुसऱ्या बाजूला घडवंचीवर खूप ताटे वाट्या, पेले लावून ठेवले होते. सगळे पितळेचे. चकचकीत करून लावलेली ही भांडी पाहून मी अचंब्यात पडले. घरात माणसे चारच पण भांडी गावजेवण करता येईल एवढी.

स्वयंपाक घरात खूप फडताळे होती. त्यांत रांगेने डबे लावलेले होते. तेही व्यवस्थित. पहिले फडताळ तांदूळ पिठाच्या डब्यांचे दुसऱ्यात डाळी कडधान्ये, तिसऱ्यांत मिरची मसाले, चौथ्यांत चिंच, आमसुल, आंबाडे, लोणची अशा आंबट वस्तुंचे. मी थक्क होऊन सगळे पहात होते. कोणत्याही गोष्टीची वानवा नसलेले इनामदारांचे स्वयंपाक घर थक्क करणारेच होते. मला वाटले, उद्या हे सगळे मला करायचे आले तर पुरा दिवस यातच जाईल. सोवळ्याचे काम, बाहेरची बाई चालणार नाही. मग एकट्या बाईला कसे जमणार हे?

१० वाजता एक बाई आल्या. हात पाय धुवून सरळ स्वयंपाक घरात घुसल्या व कामाला लागल्या. जेवणाचे त्यांनीच हाती घेतले. काकी सासूबाईनी चुली पेटवून, भात व डाळीचे आधण ठेवले होते. मी भाजी निवडायला घेतली होती. सासूबाई चिरून ठेवीत होत्या. बाई चटपटीत दिसल्या. सासूबाई म्हणाल्या ही रेवतीबाई. भटीण आहे. सोवळ्याचे जेवण हीच करते. तिचा कामाचा उरक फार दिसला. दीड तासांत जेवण तयार करून त्यांनी नैवेद्याची दोन ताटे तयार केली. सासूबाईंनी मला नैवेद्याची ताटे घेऊन देवघरात जायला सांगीतले. त्याच वेळी देवघरातून घंटा वाजायला सुरवात झाली. मागोमाग आरती म्हटल्याचे ऐकू आले. देवघरात आमचे हे सोवळे नेसून, पूजा आटपून, आरती करीत होते. दुपार नुकतीच टळत होती. मी ताटे ठेवून उभी झाले. आरती मीही

म्हणू लागले. माझ्या आवाजात आरती सुरू झाली. आणि इनामदार डोळे मिटून ऐकत राहिले. हातातली घंटा तेवढी हलवत होते. दोन आरत्या झाल्यावर मी थांबले तसे इनामदारनी घालीन लोटांगण सुरू केले. मग धूप दाखवून मंत्रपुष्प चालू झाले. तेही मी म्हणू लागले. आरती संपली तर देव घरात दोन्ही नणंदा, दोन्ही सासूबाई व जेवण करणाऱ्या बाई सगळेच माझी आरती ऐकायला आल्या होत्या.

मोठ्या सासूबाई म्हणाल्या "आबा! पहिलाच दिवस रे! छान साजरा केलान सुनेने. आरत्या कशा छान म्हणते. गोड आहे गळा."

चुलत इनामदारांच्या घरचे पण मी आरती म्हणताना येवून उभे राहिले होते. पहिलाच दिवस इनामदारांच्या घरी माझे स्थान तयार करीत होता. त्या बरोबरच एक समजले होते. इनामदारांच्या घरी सगळे वक्तशीर होते. आरती सुरू होता होताच नैवेद्याचे ताट तयार असणे जरुरी होते.

नैवेद्याचे एक ताट इनामदाराना जेवणासाठी दिले. त्यांना वाढायचे व हवे नको ते पहायचे काम सासूबाईनी मला दिले. मग आमची जेवणे झाली. थोडा वेळ उसंत मिळाला. सगळेच गप्पाना बसले. मोठ्या नणंदबाई म्हणाल्या त्या दुसऱ्या दिवशी निघणार. घरी अडचण आहे. मोठ्या सासूबाईंनी आग्रह केला. दोन दिवस रहा म्हणाल्या. पण त्यांनी जायचेच ठरवले. धाकल्या नणंदबाई मात्र हसत सांगू लागल्या त्या माहेरपण पुरं उपभोगणार, आठदिवस तरी जाणार नाहीत. तसे सांगूनच आल्यात म्हणे. मग गडगडाट हसल्या.

मोठ्या नणंद थोड्या रुबाब दाखवीत होत्या की आढ्यता होती समजले नाही. पण धाकल्या मन मोकळ्या असल्यासारख्या दिसत होत्या. पहिल्याच दिवशी बरेच काही माहीत पडत होते.

काही दिवसातच मला इनामदारांच्या घरची सर्व दिनचर्या पाठ झाली. मोठ्या सासूबाईना आई म्हणायचे व लहानाना काकी म्हणायचे हे मोठ्या सासूबाईनी प्रेमाने सांगीतलं. गळा गोड आहे म्हणाल्या. कीर्तन करतेस का विचारले तशा नणंदबाई हसत सुटल्या. म्हणाल्या "आई तुला कीर्तनकार बुवीण बनवणार गे. वैनी सावध रहा गे." मलाही हसू आले. धाकल्या नणंदाबईशी घट्ट मैत्री जमली. त्या मनमोकळ्या होत्या.

इनामदार जेवायला, चहाला खाली येत. बाकीचा वेळ माडीवरच असत. लग्न होऊन पंधरा दिवसावर झाले होते. इनामदार कसे आहेत, बोलतात कसे काहीच समजत नव्हते. आम्ही एकमेकांशी अजून बोललो नव्हतो. आईने नवरा बायको म्हणजे काय ते शेवटी

जवळ झोपवून समजावले होते. पण इथे तर भेट नव्हतीच. भात पाहिजे, भाजी पाहिजे एवढेच बोलणे जेवताना चाले तेच. मनात आता गोंधळ उडू लागला होता. धाकल्या नणंदबाईना एक मुलगा होता. मनात आले त्यांना विचारावे. मग गप्प राहिले पण त्या जेव्हा म्हणाल्या आठ दिवसा ऐवजी पंधरा दिवस झाले. आता जायला पाहिजे. तेव्हा मात्र गडबडले. या गेल्या तर विचारायचे कुणाला?

मग मनाचा हिय्या करून विचारलेच "आक्काबाई! हे काही बोलत नाहीत माझ्याशी. पहात देखील नाहीत माझ्याकडे. मनाविरूद्ध लग्न केलेत का?"

परत मोठ्याने हसत  त्या म्हणाल्या "एकदम बरोबर! मना विरुद्धच केलय त्याचं लगीन. तुझ्या बाबानी तुझा फोटो दिला त्याला पसंतीला. आम्हा दोन्ही बहिणींना येऊन विचारू लागला, करू लगीन हिच्याशी? मग आम्ही नापसंत केलं तुला आणि त्यांनीय नापसंत केलन. मग काय सगळी तयारी केली नी नापसंत मुलीशी लगीन लावून आलो." मग हस हस हसत  सुटली. थोडे हसून झाल्यावर म्हणाली "तसा तो बोलतो कमीच पण बोलवेल तुला माडीवर. गोंधळ राह्यलाय तो पुढल्या महिन्यात होईल मग बोलवील. इनामदार गो हे. ह्यांचे विधीच खूप. सांगते मी त्याला लवकर कर रे बाबा गोंधळ. तुझी बाईल उतावळी झालीय तुला भेटायला." परत हसणे सुरू मी मात्र धास्तावले ही खरंच असलं काय बोलली तर.

मग मात्र त्यांच्याशी बोलली ते ऐकून नणंदबाई किती हुशार आहेत ते समजले. त्या रात्री जेवताना यांना म्हणाल्या "आबा! गोंधळ केव्हा ठरवतोयस. ओटी घेऊन यायला लागेल ना. आठ एक दिवसांत ठरव. पुढचा मार्गशीर्ष म्हयना आहे. एकदा लागला तर म्हयनाभर  थांबावे लागेल." यांनी मान हलवलेली पाहिली. मग मला, कुणाचेही लक्ष नाही असे पाहून डोळे मिचकावत चिडवून दाखवले. इनामदारांची प्रथा, गोंधळाशिवाय लग्नविधी पुरे होणार नव्हते.

एक दिवशी मधला काका म्हणजे माझा बाबा आला. एकदम आलेला पाहून मी गडबडले. सर्व ठीक आहे ना घरी, असा विचार आला. मग विचारल्यावर म्हणाला खुशालीच पहायला आलोय. शेजारच्या गावी खंड वसुलीला आला होता तो पुढे आमच्याकडे आला. मग यांच्याशी बोलत बसला. तुम्ही लहान तेव्हा काही काम असले तर सांगत चला असे याना सांगताना ऐकले. हे काहीच बोलले नाहीत मला मात्र बाबांचे वागणे विचित्र वाटले. बोलावल्याशिवाय, मदत मागीतल्या शिवाय हा कशाला सुचवतो? दुपारी जेवून मग गेला. मला जरा ओशाळेच वाटले. खंड वसुली शाम बघायचा. हा केव्हा

पासून या कामाला लागला? नुसते सांगण्या पुरते कारण तर नाही? मी चांगलीच ओळखत होते त्याला.

महिन्याभरात मी खूपशी कामे अंगावर घेतली व करू लागली. दोन्ही सासू खूष झाल्या. कामावरची देखरेख, सोवळ्यातले जेवण, आरती म्हणणे, नोकरांकडून व्यवस्थित कामे करवून घेणे चालले होते. शेजारच्या इनामदारांचे कोणीतरी मधेच दृष्टीला पडे. मी हसून बोलण्याचा प्रयत्न करी. पण ते मान फिरवून निघून जात. पण त्यांच्या घरी तीनच माणसे एवढे समजले. भाऊसाहेब आमच्यांपेक्षा वर्षांनी लहान, एक मोठी बहीण व त्यांची आई. दोन्ही घरात जरा देखील बोलणे चालणे नाही. आम्ही पूजा नैवेद्य केला की ते येवून त्यांचा प्रसाद देवाला दाखवत. देव व देवघर एकच. मग सासूबाई म्हणाल्या "तीन वर्षे पूजा नी सणवार आपल्याकडे आणि एक वरीस त्यांच्याकडे. आता तिसरे वरीस चालू आहे. पुढचे वरीस त्यांचे." इनामदारीच्या वांटणी बरोबर देवानाही वाटून घेतलेले. मला समजेना देव वाटून कसे घेता येतील? मला मग विचार आला, काहीतरी कारणा वरून त्यांच्याशी बोलणे सुरू करायला बघायचे. संबंध चांगले करायला बघायचे. पण आमच्या घरी आवडेल का? एकमेकांसमोर बंदूका घेऊन उभे राहिलेली खानदानी दुश्मनी हळवी करता येईल का? मग ठरवले मोठ्यांशी हळू हळू सूतोवाच करायचे, त्यांचे मन जाणायचे मगच ठरवायचे.

दुपारी जेवणे झाल्यावर सगळेच विश्रांती घेत पडत असत. मी सासूबाई बरोबर गप्पा मारीत बसे. काहीतरी बैठे काम हाती असेच. त्या दिवशी दुपारी मी विषय काढला.

"आई! शेजारचे आपल्याशी बोलत, हसत नाहीत. चुलत असले तरी आपलेच आहेत ना ते?"

"माणसां पेक्षा इस्टेट मोठी गो या इनामदारांना. गुण्यागोविंदाने घर चाललं असतं. पण धाकट्या दीराना सगळीच इस्टेट हवी झाली. मग भावबंदकीचा कली घुसला घरात. आमच्यांनाय त्रास देवू लागले. त्यांचा भाग नांवावर करून द्या सांगू लागले. ह्यानी आयकले नाय. तुझ्या आबासाहेबाला दत्तक घेतला. ते गुणी होते. आमचा धाकला दीरच भांडखोर. काय करशील? तसा तुझा नवरा यांच्या बहिणीचाच मुलगा. कोण भायरचे नाय. पण इस्टेटीची हांव. काय करणार." आईंच्या ऐवजी काकी सासूबाई सांगत होत्या.

"पण आता ते गेले. नवी पीढी आहे आता. आपण बोला चालायचा संबंध तरी होतो काय बघायला हवे." मी चांचपणी करू लागले.

“विचारय करू नको. ती रांड, ताईबाय, संबंध ठेवायला पण देणार नाय जिवंत असे पर्यंत. महा खाष्ट जाव होती गो ती. तशीच भाउसायबाला पण शिकवते. काय कर्म संबंध सुधारणार तू?” काकी.

एक माहीत पडले. जरी काकी असे बोलल्या तरी सबंध सुधारले तर त्यांना आवडलेच असते. दोष त्या लोकांचाच काढत होत्या. त्यांत वैफल्य दिसत होते. वैमनस्य दिसत नव्हते. मला आता आमच्यांचे मन वाचायला लागणार होते. दोन्हींचे संबंध चांगले झाले असते तर? माझे माहेर भरलेले गोकूळ होते. इथेही तसेच झाले तर?

गोंधळ आटोपला. आता यांचे जेवण घेऊन मी माडीवर जायचे हे काकी सासूबाईनी सांगीतले. मी पहिल्यांदाच माडीवरची व्यवस्था पाहिली. जिन्याला वरून बंद करायचे दार होते. ते बंद केले की वरच्या माडीची लाकडी जमीन पुरी व्हायची. जिना कुठे ते समजतच नसे. पुढे कचेरी सारखी बैठक लावलेली. हिशोबाच्या तांबड्या वह्या रचून ठेवलेल्या. बैठकीवर पांढऱ्या शुभ्र चादरी अंथरलेल्या. वर छताला कांचेचे झुंबर त्यांत मेणबत्त्या लावलेल्या. बाजूला दोन कांचेची कपाटे. कागद, पुस्तके, लाल कपड्याची गाठोडी यांनी भरून गेली होती. पुढे एक खोली होती. त्यांत मोठा शिसवी पलंग होता. एका कोपऱ्यात खिडकी जवळ एक टेबल तीन चार खुर्च्या ठेवल्या होत्या. भिंतीवर दोन तलवारी तिरक्या एकमेकांशी लढाई करतात अशा लावल्या होत्या. एक बंदूक भिंतीवरच लटकवली होती. तसेच मेणबत्तीचे झुंबर छताला मधोमध लटकावले होते. एकंदर इनामदारी जामानिमा दिसत होता. खोत व इनामदार यातला फरक मला सहज समजून गेला.

मी जेवण घेऊन वर गेले तेव्हा इनामदार काहीतरी वाचत होते. आवाजाने देखील त्यांनी माझ्याकडे पाहिले नाही. जेवण कुठे लावू विचारल्यावर टेबला कडे बोट दाखवले. जेवण झाले व मी सगळे घेऊन निघाले तर आवाज आला “कुठे निघाला? आजपासून आम्हाला सोबत नाही करणार?”

“जेवण बाकी आहे माझे. आवरून पाणी घेऊन येते.” मी कशीबशी बोलले. अंगात थरथर शिरली होती.

“कितवी शिकलाय?” हे.

“नाय! शाळेत गेलीच नाय. लिहायला वाचायला येत नाय.” माझा आवाज थरथरत होता मला समजत होतं. मग ते गप्प झाले मी सगळे खळवटून खाली आले. तशा काकीसासूबाई म्हणाल्या “जेवून घेऊया. आवरुया लवकर लवकर. तुला माडीवर जायला उशीर नको.”

मी सगळे आवरून वर गेले.

सकाळी उठले तो माहीत पडले. आज आपल्या लग्नाची सांगता झालीय. आईने सर्व समजावले होतेच. आता आपल्या नव्या आयुष्याची सुरवात झाली आहे.

तीन महिने होत आले. कामाला येणाऱ्या बायकांना माझ्याशिवाय करमेनासे झाले. माझी "वैनीबाय" झाली होती. कामं मनाजोगती झाली की मी काम करणाऱ्याला काहीतरी अधिक द्यायची, प्रेमाने बोलायची, घरची मुलाबाळांची चौकशी करायची. मग त्यांना जवळीक वाटू लागली. वैनीबाय इनामदारीण हळू हळू जम बसवीत होती. आणि एक दिवशी शेजारी हलकल्लोळ उडाला. सकाळीच मोठमोठ्याने रडणे ऐकू आले. त्यांच्याकडे जायचा रस्ता देव घरातूनच होता. मी धांवले. दोन्ही सासूबाई देवघराच्या दारांत उभ्या राहिल्या. मी सरळ त्यांच्या घरात घुसले. भाऊसाहेब कपाळाला हात लावून बसले होते. त्यांची बहिण धाय मोकलून रडत होती. समोरच्या खाटल्यांत ताईबाई झोपल्या अवस्थेत होत्या. मला परिस्थिती झटकन लक्षात आली. त्या मुलीच्या जवळ बसून मी पाठीवरून हात फिरवू लागली. आणि तिने मला मिठी मारून जोरात टाहो फोडला "आई गेली वो माझी." भाऊसाहेब गदगदत रडू लागले. थोडावेळ मी तिला जवळ घेऊनच बसली. पाठीवरून हात फिरवत होती. मधूनच तोंडातून येई "ऊगी! ऊगी!" काय बोलावे समजत नव्हते. अर्धा तास गेला असेल. आलेच हां म्हणत मी उठले. घरी आले. काकी सासूबाई, आई व आमचे हे, सगळेच देवघराच्या दारात थबकले होते. मी त्यांना म्हटले अशा प्रसंगी आपण त्यांच्याकडे जाणे योग्य वाटते. वैर बाजूला ठेवून त्यांना मदत केली पाहिजे. दोघ मुलंच राहिली आता. लगेचच काकी निघाल्या. आई यांना म्हणाल्या तू जा, मी लोकांना बोलवायचं बघते. मग मला समोर बसवून त्यांनी कोणा कोणाला बोलवायचे ते समजावले. गावातलेच होते सगळे म्हणून कामवाल्या बायाना आल्या आल्या मी लोकांना बोलावयला पिटाळले. परत शेजारी गेले. हे भाऊसाहेबां शेजारी हातभर लांब बसले होते. मी परत मुलीच्या शेजारी बसले. तिला जवळ घेतली. तसं बघीतलं तर ती माझ्यापेक्षा मोठी होती. हळू हळू तिचा रडण्याचा जोर कमी झाला होता.

तिचा हात पकडून मी तिला म्हटले "चल."

ती उठली पुढच्या खोलीत गेल्यावर विचारले पणती, तेल कुठे आहे. दिवा लावूया. तिने स्वयंपाकघरात नेले. पणती, तेल, माचिस दिले. मी आजारपण काय होते विचारले तर म्हणाली "कायच नाय गे. रात्री चांगली जेवून झोपली. जरा उशीर झालेला. दोन

दिवसानी मला बघायला येणार होते. म्हणून फराळ बनवीत बसलो. आता काय करणार आम्ही दोघच?" परत तिला जोरांत उमाळा आला. मी थोडा वेळ पाठी वरून हात फिरवत बसली. मग म्हणाले "त्यांचा पत्ता दे. कळवते त्यांना काय ते. काळजी नको करू. शेवटी तुही इनामदारांचीच. तुझ्या मागे उभी राहीन मी." ती आता माझ्या तोंडाकडे पहातच बसली. परत जाऊन आम्ही दिवा लावला. काकीना तिच्या शेजारी बसवले. आता हळू हळू त्यांचे ओळखीचे, कुळे, वकील, डॉक्टर एक एक जमले आणि आम्ही घरी आलो. याना भाऊसाहेबां बरोबर स्मशानात जायला सांगीतले.

जेवण करणाऱ्या बाईना दोन माणसांचे जास्त करायला सांगीतले. प्रसाद करायचा नव्हताच. मनाने नसले तरी प्रथेने आमच्या घरच्या इतराना सुतक होतेच.

दोन दिवस त्यांना जेवण द्यायला गेली तेव्हा बोलणे चालू करून बरीच माहिती काढली. आबासाहेबांचे म्हणजे माझे लग्न झाले हे ताईबायने मनाला लावून घेतले. त्यांच्या मुलीचे व्हायचे असताना आबासाहेबानी थांबायला पाहिजे होते असे त्यांना वाटत होते. आता लवकर लग्न नाही झाले तर दोष लागत राहील असेच वाटे. त्यांच विचाराने त्या अस्वस्थ होत्या. आता पहायला येणार तर त्याच राहिल्या नाहीत.

एक स्वच्छ दिसू लागले. विजयाचा म्हणजे यांच्या त्या बहिणीचा माझ्यावर विश्वास बसू लागला होता. दिवस कार्य आटपली व मी तिला दिवसातून एकदा तरी भेटून बोलण्याचा नियम ठेवला. ती खरंच मनमोकळं बोलू लागली. इनामदारांच्या वैराला सुरुंग लागला, आता ते पूर्ण नामशेष करे पर्यंत प्रयत्न करायचा असेच मनात आले. आईची आठवण झाली. प्रेमाने सगळे साध्य करता येते हे दिसत होते.

पण लवकरच समजले. सर्व काही एवढे सोपे नाही. ताईबाय जाऊन महिना उलटला होता. रात्री यांनी मला समजावत सांगीतले. शेजारच्यांच्या बाबतीत फार पुढाकार घेऊ नकोस. भाऊसाहेबानी भेटून याना सांगीतले होते. आमच्या मदतीची जरूर नाही म्हणून. मला वाईट वाटले. एवढ्या लहान वयातच त्यांनी वैर जोपासायला सुरवात केली होती. माझी आई घरातच सांभाळत होती. हे घरातले नव्हते. मी यायच्या अगोदरच दोन घरे झाली होती. ताईबाय गेली ते दोन दिवस धांवपळ माझीच झाली होती. पण यांना त्याचे काहीच नाही?

दुसऱ्या दिवशी देवपूजे नंतर मी थोडी थांबले. विजया कुठे दिसते का पहात होते. एवढ्यात ती आलीच. मी हंसले. चपापून तिने मागे वळून पाहिले. मग पुढे आल्यावर हळूच म्हणाली. "संध्याकाळी मागच्या परसांत ये. बोलूया." मी बघतच राहिले. एवढ्यात

कोणीतरी खांकरल्याचा आवाज शेजारच्या घरातून आला. मी समजले. पाळत ठेवली जातेय.

संध्याकाळी विजया मागच्या परसात भेटली. म्हणाली “इनामदारी वैर आहे गे. सगळ्यात वाकडे दिसते याना. आमची एक आत्या होती. तिने वैर मिटवायचा प्रयत्न केला नी संबंध कायमचे बिघडवलेन. दोनय घरांशी. तू नको पडू यात. भाजशील.” मी काही बोलायच्या आंत ती निघून पण गेली. बघू परत संधी येईल तेव्हा बघू असा विचार करत मी घरात परतले.

घरी बघते तर शामदादा आलेला. आनंद झाला आणि धक्काही बसला. सगळे ठीक असेल ना घरी? शाम हसला बैठकीतून हे निघून माडीवर गेले. आई व काकी खूप आंतल्या खोलीत होत्या. मग शाम बोलला “रुक्मे! सासर मानावले गो तुला. बरीच तरतरीत झालीस.”

“असेल. पण काय रे, अचानक आलास?” मी विचारले आणि शामचा चेहेरा विचारांत गेला. बऱ्याच वेळाने म्हणाला “तुला सांगणार नव्हतो, पण तूच काय तरी करशील म्हणून सांगतोय. आज्यानी नी आईने सगळ्यांना वेगळे करायचे ठरवलेय गो. दोन नवी घरे बांधणार. जुन्या मुळच्या घरात आमी आणि नव्या दोन घरात धाकले दोन काका. वाटले नव्हते पण आईनेच आजोबांना सांगून करायला लावले. का ते काय मला समजले नाय.”

“मधल्या काकाने काय तरी खुसपट काढले असणार रे. तो एकच असा आहे करायला लावणारा. माझा बाबा खरा, पण गुण म्हाईत आहेत मला.” मी संतापत बोलत होते. आईने सांगीतले म्हणजे नक्कीच काहीतरी झाले असणार. हे करणारा फक्त माझा बाबाच होता कुटुंबात. वाटले दोन दिवसासाठी माहेरी जावे. सर्व समजून बाबाची कान उघाडणी करावी. पण इकडेही काम होतेच. शामदादा गेला पण दोन दिवस मन काही थाऱ्यावर येईना. पण कुणाला समजू दिले नाही. माहेरच्या गोष्टी सासरी नाही सांगायच्या व सासरच्या माहेरी नाही. सारखे माहेरी यायचे नाही. आपल्या संसारांत मग रमायला फार वेळ लागतो. हा आईचा उपदेश आठवला व शांत होत गेले.

अजून एक महिना गेला असेल व अचानक देवघराच्या खोलीत विजयाने गाठले. म्हणाली “आज मला बघायला येणार. तू असतीस तर बरे वाटले असते गे. मला एकटीला भिती वाटते. भाऊ गेलाय त्यांना आणायला दोन तास तरी येणार नाय. येशील काय गे थोडी मदतीला? फराळाला काय करू, ? चहा कसा करू मसाल्याचा की साधा?

साडी पण बरोबर नेसलीय की नाय कोण सांगेल? माझी तर धांदल उडालीय. आलीस तर बरे होईल. भाऊ यायच्या आत परत जा.'' मी घरी सांगून येते म्हटले व घरी आले. हे घरी नव्हतेच. सगळे बोलणे दोन्ही सासूबाईना सांगून विचारले काय करू जाऊ की नको. काकी पटकन म्हणाल्या ''पुण्याचे काम गो. जा, जरूर जा. नायतरी माझीय पुतणीच गो ती. तुला मानाने बोलावलन हे काय कमी? जा तू, मी समजावीन आबासाहेबाला''

मी पटकन निघाले. विजयाला शिरा, पोहे करून दिले. साडी नेसल्यावर सारखी केली. आंबाडा घालून दिला. वर छान फुलांची वेणी माळून दिली. विजया दिसायला सुंदर होती. गोरीपान होती. आणि आता तर एकदम निखार चढला होता. मी पटकन म्हणाले ''आज तुला पसंत करतीलच की नाय बघ. किती छान दिसतेयस.'' विजयाच्या डोळ्यांत टचकन पाणी आले. म्हणाली ''ताईबायन पण एवढे केले नसते. भाऊ म्हणतो तुम्हाला समजलं तर तुम्ही लग्नात मोडता घालाल.'' मला धक्का बसला. कुठपर्यंत खोटा विचार करतात भाऊसाहेब. आश्चर्य वाटले.

घरी आले पण लक्ष शेजारीच होते. रात्र पडली दिवे लावत सगळी कडे फिरत होते एवढ्यात विजया धांवत आली. मला घट्ट मिठी मारून म्हणाली ''पसंत केलनी गो. मग बोलणी पण केलीन भाऊने. पुढच्या म्हयन्यात लगीन घेतलेन. तुला मी कधीच विसरायची नाय.'' पहिल्यांदाच विजयाने आमच्या घरात पाय ठेवला होता. आनंदाच्या भरात ती सरळ घुसली होती. तिला कुणाचीच भिती वाटली नव्हती. परत एकदा वैराला सुरुंग लागला होता.

तिला देवाच्या पाया पडायला लावले. हात पकडून परत घेऊन आले. सासूबाईंकडे घेऊन गेले. म्हटले या तुझ्या काकी, आशीर्वाद घे. ती पाया पडली तसे काकीने तिला पोटापाशी पकडले. दोघींचेही डोळे ओले झाले होते. परत एकदा वैराला सुरुंग लागला होता.

''मी जाते. भाऊ येईल.'' असं म्हणत ती घरी पळत सुटली.

मला काकींनी जवळ बोलावले, पोटाशी धरले आणि म्हणाल्या ''लक्ष्मी आहेस गो. सगळं चांगलच करणार तूं. पुण्यवान गो.'' आईंच्या तोंडून पण सुस्कारा निघाला. समाधानाचाच वाटला. दुसऱ्या क्षणी मला भोवळ येवू लागली मटकन खाली बसले. काकी धांवल्या मला पकडून म्हणाल्या ''काय झालं गो?'' मी गरगरतेय म्हटल्यावर बोलल्या ''काय खाल्ल नाय ना त्यांच्याकडे? रांडेचे मारतील काय तरी खायला घालून.''

मी हसले केवढा अविश्वास होता दोघाना एकमेकांबद्दल. कसा काढायचा हा? मग त्यांनी मला झोपायची जबरदस्ती केली. थोडा आराम मिळाला व बरे वाटू लागले. जेवणाखाणाचे पहायला उठले. स्वयंपाक घरात पाय ठेवला तर वासाने पोटांत डुचमळू लागले. मला काय झालेय त्याची पूर्ण कल्पना आली. परत काकीं कडे गेले. जवळ बसले. सांगायचा संकोच येत होता, आईसारखी संवय अजून कोणाशीच झाली नव्हती. काकीनी विचारले कसे वाटतेय म्हणून. मग मी सुरू केले "मला कशाला कोण काय खायला घालील. देवाने आपलं काम केलन. इनामदारांचा वंश पुढे चालणार याची चाहूल लागलीय. म्हणून डुचमळतं पोटात."

आईसासूबाई आणि काकी सासुबाई जवळ जवळ आनंदाने हरभरून गेल्या. काकी सासूबाई तर उठून माझी कामे अंगावर घ्यायला निघाल्या. मला मायेचा दम मारून आईकडेच झोपून आराम करायला सांगीतले.

मी मनोमन हसली. किती सरळ मने. यांच्या मनात शंका देखील पटकन येत व दुसऱ्या क्षणी विरून जात. पुतणीवर प्रेमाचा वर्षावही होई आणि दुसऱ्या क्षणी, तिने करणी केल्याचा संशय येई. मला यांची मजाच वाटत होती. आता आठवत होती ती माझी आई व माय. हे समजल्यावर आईने कुशीत घेऊन गोंजारले असते व मायने काय काय खायला घालायची रांगच लावली असती. आठवणीने हसू आले.

तीन महिने म्हणे कुणालाही सांगायचे नाही. काकीनी दमच मारला होता. काय खावेसे वाटेल ते त्यांनाच सांगायचे. विजयाचे लग्न घेतले होते महिन्या भरांत. त्यांत उगाचच जास्त भाग घ्यायचा नाही. खूप सूचना सारख्या चालल्या होत्या.

पण मी सगळे काम अंगावर घेतच होते. पेंगुळल्या सारखे वाटले की येवून आईबंरोबर पडत असे. मधेच विजया येई. लग्नाच्या तयारी बद्दल बोले. काकी अगदी हजर असत. त्या दोन गोष्टींवर पाळत ठेवीत असाव्यात. एक तर विजया मला काही खायला देत नाही व मी तिला माझ्याबद्दल काही बातमी देत नाही. त्या मागचे प्रेम समजे व विजयावरच्या अविश्वासाचे हसू येई.

महिनाभर गेला. विजयाचे लग्न दोन दिवसापूर्वी छान पार पडले. भाऊसाहेबांचा विरोध मोडून तिने मला लग्नात खूप महत्व दिले. माझी मानाची ओटी भरायला लावली. आई व काकीना साडी द्यायला लावली. पण आमच्या याना कुठलाच मानपान केला नाही. तिथे मात्र भाऊसाहेब पुरे अडून बसले. आई व काकी नाराज होते. मी समजावले. भाऊबंदकी निवळतेय हे का थोडे आहे. त्यांचे संबंध सुधरायला पहिजे असतील तर वेळ

द्यायला पाहिजे. दोघीनाही पटले व शांत झाल्या. मला आता एक समजू लागले होते वयाने लहान असले तरी माझ्या विचाराना मानले जायचे, आई, काकी व आबासाहेबांकडूनही.

आता बागेत फिरण्याची दांडगी इच्छा झाली. सगळी फुले पहात फिरू लागली. शेवटी परसदाराच्या अगदी मागच्या भागाला आले. दूरवर शेती पसरली होती. पाऊस आठदहा दिवसांपासून पडत होता. पेरणी झाली होती. हिरवीगार शेते पहाताना मनात आले ही शेती आपली की भाऊसाहेबांची? घरी आले. थकून गेले होते. थोडा आराम केला संध्याकाळ झाली होती. माडीवरचे दिवे लावायला वर गेले. आंतल्या खोलीतला दिवा लावताना नजर भिंती वरच्या बंदूकीवर गेली. मी बंदूक हातात घेतली. खिडकीतून नेम धरला. मी काय करीत होते मलाच माहीत पडत नव्हते. मी तशीच नेम धरून उभी असताना हिरव्यागार शेतांत भाऊसाहेब शिरतायत व नासधूस करतायत असा भास झाला. चाप ओढला गेला. मन प्रसन्न झाल्यासारखे वाटले. बंदूक रीकामीच होती. त्यामुळे काही होण्याचा प्रश्नच नव्हता.

"वा! बंदूक चालवताय. कुणावर राग काढायचा ठरवताय?" मागून यांचा आवाज आला. मी गडबडून गेले. बंदूक भिंतीवर लटकवली. व लगबगीने खाली निघाले. विचार आला, आज बंदूक का घेतली? का एवढी ओढ वाटली? येणाऱ्या मुला मुळे तर नाही. बापरे! मग हा बंदूक भाऊसाहेबांवर रोखणार की काय? नको रे बाबा, ही इनामदारांची भाऊबंदकी मी संपवायला बघतेय. तूय तसाच हो रे! नको बंदूकीचा सोस नको धरूस. मनात असे नाही नाही ते विचार येत होते. धास्तावलेच होते.

दुसऱ्या दिवशी शामदादा अचानक आला. मी आईंजवळ आराम करीत होते. शामदादा आलेला बघून मी चपापले. एकदम कसा आला? तो समोरच बसला. काकी पण आल्या. शामदादा म्हणाला "आईन पाठवलेन, म्हयना झाला. चैन नाय पडत म्हणाली. जीवाला एक हुरहुर लागलीय म्हणाली. मग काल म्हणाली, असली हुरहुर रुक्मीच लावी. जाऊन खुशाली बघून ये रे."

काकी एकदम म्हणाली "केवढा जीव पोरीवर, खरी आहे रे हुरहुर." मला वाटले काकी पुढे सांगेल, पण ती गप्प बसली.

"काय गो! तू निजलीस कशी या वेळी, आणि अशी काय दिसतेस? एकदम लाल दिसतेस. काय बरं आहे ना सगळं?" शामदादा विचारू लागला. मला तीन महिने होत

आले होते. चेहेऱ्यावर निखार चढत चालला होता. काकी स्वतः काय काय करून खायला घालीत होत्या. त्यामुळे गर्भारिणीची सगळी लक्षणं उभारून आली होती.

काकी म्हणाल्या “आईंना जाऊन सांगा पोरगी आनंदात आहे. आणि तुम्ही मामा होणार. पण ही बातमी अजून कोणाला इतक्यात देवू नकोत. तुम्ही नी आई कडेच ठेवा.”

शामदादाचा चेहेरा एकदम उजळला. मला जप म्हणून सांगत जायला निघाला. त्याला आग्रहाने काकींनी जेवायला थांबवले. जेवून जाताना परत परत सांगत होता जपून रहा जपून रहा म्हणून. त्याची माया खरोखरच ओथंबून दिसत होती. तो मग निघाला. मागून पहात होते. चालण्यात वेग होता. उतावळा झाला असणार आईला बातमी द्यायला.

काकी म्हणाल्या चुलत भाऊ पण माया बघ! नाहीतर आमच्याकडे. उरावर बसतात एकमेकांच्या.

मला आता बरे वाटू लागले. माझ्या माहेरी माझ्या जीवाभावाच्या आईला ही बातमी मिळणार याचा आनंद झाला. तिला हुरहुर लागली या वरून तिचे माझ्यावर केवढे प्रेम होते याचा निर्वाळा मिळाला. मग माहेरच्या विश्वांत तरंगत गेले.

*******

७

## आबासाहेब-

माझे लग्न ठरवण्यांत काकीबाईने पुढाकार घेतला. आई म्हणत होती, तिकडे विजया अजून लग्नाची आहे. नाही म्हटले तरी चुलत बहिणच ना. मग तिचे झाल्या शिवाय कसे करायचे? उगीच त्याच्यावरून आणखी तंटे नकोत. पण काकीबाई सडेतोड बोलणारी. तिचे म्हणणे माझे लग्न घेतले की धावतील बघ तिचे जुळवायला. ताईबायला अक्कल कुठे आहे. अजून लग्नाचे बघायला सुरवात देखील केली नाही.

आई मात्र काकीबाईंचे सगळे ऐकायची. माझे बाबा व भाऊसाहेबांचे बाबा यांच्या मारामारीचा तिने धसकाच खाल्ला होता. तिच्या मुळेच आम्हाला घरचा मागचा भाग मान्य करावा लागला. जाण्या येण्याच्या वाटेवरून काका असे पर्यंत आमचे वाद चालूच होते. काका गेले व सगळे थंड पडले. ताईबाय काही वेळा खुसपटे काढी पण मी पुरा पडे. लग्न काकीनी परस्पर ठरवले. मुलगी पहायला पण गेलो नाही. खोतांची आहे, एकत्र कुटुंबात वाढली आहे, चुणचुणीत आहे. असे शेजारच्या गावी रहाणाऱ्या काकींच्याच नातेवाईकाने सांगीतले. दोन दिवसात मुलीचे वडील भेटायला आले व काकींनी लग्न ठरवले. आईनेही दुजोरा दिला.

मी जरा मनात रागावलोच होतो. मुलगी न बघताच लग्न कसे करायचे? आई व काकीचे म्हणणे बभ्रा नको. शेजारचे मोडता घालतील. मग मलाही पटले.

लग्नात तिला पाहिली व गुंगच झालो. आई व काकी आल्याच नव्हत्या. राग तर पळून गेलाच पण काकीवरचा भरोसा अजून वाढला. मुलगी सुंदर तर होतीच पण चेहेऱ्यावरून चुणचुणीतपणा दिसत होता.

लग्न देखील छान करून दिले खोतानी. खोतांचे एकत्र कुटुंब, त्यांचा एकमेकातला जिव्हाळा बघून विस्मय वाटला. मुलीची माया स्वतःच्या आईपेक्षाही मोठ्या काकीवर दिसली. मोठी काकी देखील तितकीच प्रेम करताना दिसत होती. एकदा मनात आले हे

सगळे आपल्या इनामदाराना दाखवावे. भांडणा शिवाय प्रेमानेही कसे एकत्र राहाता येते समजेल सगळयाना. तिच्या काकीला ती आई म्हणताना दिसली तर आईला माय म्हणून म्हणताना ऐकले. मजा वाटली. एकाच मुलीला दोन आयांचे प्रेम मिळतेय, किती भाग्यवान.

निर्धास्त झालो. माझ्या आईची व काकीबाईंची छान काळजी घेईल हे मनोमन पटले. लग्न करून परतीच्या वाटेवर न बोलताही बरीच ओळख पटत गेली. गोड आवाज, भावुक प्रेमळ डोळे, वाटेत, दुपार ढळल्यावर, डबा उघडून फराळाचे मला देताना पदराने झाकलेले तोंड. सगळे सांगत होते, तिच्यात एक अदब दाखवायची कला होती. वेळीच खाण्यापिण्याची काळजी घेण्याची सवय होती. वयाच्या मानाने समज चांगलीच होती. एवढ्याश्या मुलीतला पोक्तपणा वाखाणण्या सारखा होता. माझ्या बहिणी किंवा तिच्या मुलां अगोदर फराळाची बशी तिने माझ्या समोर केली होती. छोट्या बहिणीने तेवढ्यात चिडवायचा प्रयत्न करताच सगळ्या मुलां समोर बशा धरत विचारले काय काय कोणाला आवडते ते. तेच देणार म्हणाली. बशीत टाकायचे नाही. मला आणखी एक पैलू दिसला. बहिणीला न बोलता तिने समर्पक उत्तरही दिले व शिस्त आवडते हेही नकळत समजावले. हुशार दिसते.

घरी पोहोचलो. मोठी बहीण लगबगीने घरात गेली. आम्हाला बाहेरच उभे केले होते. ती आरती, भरलेले मापटे घेऊन आली. आई व काकी येवून उभ्या होत्याच. त्यांच्या निगराणीत आमचा गृह प्रवेश झाला. मग पहिली तंबी काकी कडून मिळाली. गोंधळ होईस्तोवर माडीवर बोलवायचे नाही. हो म्हणालो पण खट्टू झालो.

नेहमीचे जीवन सुरू झाले. दुसराच दिवस पुजा करायला घेतली. आरती करताना ही आली. माझ्या बरोबर आरती म्हणू लागली. मंजुळ आवाज, सुंदर चाल त्यात माझा भसाडा आवाज शोभेना मी फक्त ऐकत उभा राहिलो. गुंगून गेलो. सहज लक्ष तिच्यावर गेले. मिटलेले डोळे, पदर पुरा मागे गेलेला. मला पौर्णीमेचा चंद्र समोर दिसत होता. दोन मिनीटे स्थिर नजरेने सौंदर्य पाहून घेतले. शांत गोरा चेहेरा, सरळ धारदार नाक, गडद तपकीरी मोठाले डोळे, आवाजातला गोडवा. तिच्या आरती म्हणण्याने देवघरात एक सुंदर भक्तिमय वातावरण तयार झाले. एक असा ताल होता की माझ्या हातातली आरती त्यावर लयीत हेलकावू लागली. आज खरी आरती झाली होती.

बरेच दिवसांनी मनाला शांत वाटावे असे घडत होते. नाहीतर बाबांच्या वेळी इनामदारीच्या वाटण्या झाल्यापासून एक कायमची कटकट, भांडणे, धमक्या यांनाच तोंड

देत होतो. बाबा गेले व आईने धसका घेतला होता. काका माझा काटा काढतील व सर्व इनामदारी बळकावतील. त्यांना चौथा हिस्साच मिळाल्यामुळे ते पिसाळले होते. आई जरी सख्खी नव्हती तरी मला तिने आईच्याच मायेने जपले. तिचा एकुलता एक आधार मी होतो. त्याला काही होऊ नये म्हणून फार जपायची. आमची काही कुळे फितवून काकानी आमच्या जमिनीवर ताबा मिळवला. मुद्दामच खुसपट काढले होते. भांडण झालेच तर कायमचा काटा काढायचा ठरवला होता. मी भांडण काढण्या ऐवजी कुळाना कोर्टांत यायला भाग पाडले. कुळे घाबरली. काकानी कोर्ट खर्च त्यांना देण्याचे मान्य केले होते पण मग फिरले. कुळे परत आमच्याकडे आली माफी मागून परत पूर्वीसारखे चालू झाले. इनामदारीच्या वाटणीची कागदपत्रे इतकी स्वच्छ होती की काकाना काहीच करता येईना. मी लहान असूनही कागदपत्रांमुळे त्यांचे काहीच चालत नव्हते. दररोजची भांडणे, त्याचा दबाव वाढत गेला व एक दिवशी ते वारले.

ताईबाय माझ्या काकी. त्यांनी मनात ग्रह करून घेतला. मी करणी करून त्यांना मारले. भाऊसाहेब माझ्या पेक्षा लहान. विजयाताई मोठी. त्यांनी मुलाना आमच्या विरूद्ध खूप काही सांगून वैर जागते ठेवले.

आता लग्न होऊन ही आली. ताईबाय वारल्या व ही त्यांच्या कडे धावली. आई व काकी मला सांगू लागल्या. ती नवीन आहे. तिला काय माहीत नाही. तिला मारून टाकतील ते. ती गेलीच का? तू जायला दिलेसच का?

एवढ्यात हीच आली व आम्हाला म्हणाली, प्रसंगाला उभे रहायलाच पाहिजे. वैर विसरा, काही झालं तरी ते आपलेच आहेत. तिचे खरे होते. भांडणे कमी झाली तर हवीच होती.

आणि खरेच काही दिवस लोटले व विजयाताई आमच्याकडे आली. काकींनी तिला प्रेमाने जवळ घेतली. मला शांत वाटले. इनामदाराना सावरणारे कोणीतरी हिच्या रुपानेच आमच्या घरी आले असे वाटले.

दिवसे दिवस एक एक गुण प्रकर्षाने जाणवत गेले. विजयाताईचे लग्न फार छान सांभाळले. ती तर एक जवळची मैत्रीण झाली. मला माझ्या बायकोचा अभिमान वाटू लागला.

भाऊसाहेब मात्र अजून अढी धरून होते हे बाहेरून समजे. त्यांना विजयाची व हिची मैत्री मान्य नव्हती. ती लग्न होऊन गेली व मला भाऊसाहेबांचा निरोप मिळाला "सर्व

इनामदारी खरेतर आमचीच. तू नाग होऊन बसलायस. एक दिवस मीच ठेचणार आहे तुला. संबंध सुधरवायचा प्रयत्न सुद्धा करू नको.”

आईला, काकीला हे सांगावे असे वाटे. पण त्यांनी फक्त काळजी केली असती. मग बोललोच नाही. एवढेच म्हणालो हिचे संबंध सुधरवायचे प्रयोग भाऊसाहेबाला पसंत नाहीत. तिला सांगा जरा आवर हे. भाऊसाहेब काही सुधरायचा नाही.  पण खरी गोष्ट खुपशी दडवली. सबंध सुधरवणारी हीच होती. तिला सांगावे का हा विचार खूप दिवस मनात घोळत राहीला. पण बोललोच नाही.

आज आईकडून समजले, मी बाप होणार आनंद भरभरून दाटला. गळ्यातला आंवढा गिळताच येईना. चारी बाजूने सुखाचा, समाधानाचा वर्षाव करीत होती ही. इनामदारांच्या डोळ्यात अश्रू दिसता नयेत. म्हणून एक हुंकार देऊन माडीवर गेलो. शांतपणे पडलो. आता ठरवले, धमक्यांबाबत तिला काहीच सांगायचे नाही. या स्थितीत तिला त्रास नको.

इनामदारीण म्हणून खरंच शोभणारी सहचारिणी मिळाली होती. मी खरोखरच नशिबवान. मी दत्तकपत्राने इनामदार झालेलो. माझी आई खरे तर बाबांची बहीण तिचा सर्वांत लहान मुलगा मी. दत्तक प्रकरण भाऊबंदकी वाढवत गेले. बाबां नंतर मी इनामदार झालो. व शेजारचे धाकट्या काकाना भाऊसाहेब हा एकच मुलगा. मधल्या दोन काकाना मुलेच नव्हती. त्यांनी आपला भाग माझ्या नावे केला. मग काय, शेजारचे काका माझ्या हात धुवून मागे लागले.

केव्हा केव्हा वाटे, खरंच ही इनामदारी आपली नाही. त्यांचीच आहे. मी यांच्या पोटी जन्मलो नाही. ते भांडतात ते काय खोटे? दुसऱ्याच क्षणी समजे, आई बाबांनी मला स्वतःच्या मुला सारखेच वाढवले, प्रेम दिले. मग मी त्यांचाच ठरतो. त्यांच्या इच्छाना मला मान द्यायलाच पाहिजे. प्रचलित कायद्याने याला पूर्ण मान्यता आहे. मग ते बरोबरच आहे.

नजरेसमोर महाभारत येई. वाटे आपल्याला महाभारतच वांट्याला आलेय. पण त्याच्या सारखा संहार टाळावाच लागेल. एवढे दिवस समजत नव्हते काय केले तर वैराला आळा बसेल. आता आशा वाटू लागली. हिच्या रुपाने कोणीतरी आले आहे, हे वैर मोडायला. कमीत कमी महाभारत तर नक्कीच होऊ देणार नाही.

या विचारांत दिवस जात होते. एक दिवशी संध्याकाळी बाहेरून आलो. थकलो होतो. सरळ माडीवर गेलो. समोरचे दृष्य पाहून स्तब्ध झालो. ही बंदूक खांद्याला लावून

खिडकीतून नेम लावून उभी होती. एवढी हिम्मत कुठून आली? बंदूक कशी काय घेतली हिने? कोणावर नेम लावत असेल? कुणावर राग धरून आहे ही? कधीच कुणावर राग न करणारी बाई आज सरळ सरळ बंदूक घेऊन नेम लावयला का बघते? झरझर झरझर एका मागोमाग एक असे प्रश्न मनात आले. कौतुकही वाटले व चटकन बोलून गेलो "वा! बंदूक चालवताय. कुणावर राग काढायचा ठरवताय?"

चमकून तिने बंदूक ठेवली. व लगबगीने निघून गेली. काहीच बोलली नाही. मी विचारात पडलो. काय मनात होते समजलेच नव्हते. रात्री खोदून विचारले तेव्हा समजले. बाईसाहेबाना फार फिरावेसे वाटते. खास करून आपली जमीन, शेती, घर परसू सगळे पहावेसे वाटते. अशाच भटकत परसाच्या शेवटी गेल्या. समोरच्या शेतीत भाऊसाहेब नासधूस करतायत असे भासले. मग घरी आल्यावर अनावरपणे बंदूक घेऊन नेम धरायची इच्छा झाली. बंदुकीसमोर फक्त भाऊसाहेब दिसत होते. मग शांत होऊन म्हणाली, "या इनामदार घराण्याला भाऊबंदकीचा फार मोठा श्राप आहे." मग फार विचारात असल्यासारखी दिसली. मी फक्त पहात होते. एकाद्याच्या मनातली खळबळ चेहेऱ्यावर स्पष्ट दिसते. पण मनात काय चाललेय ते समजत नाही. आत्ता तेच चालले होते. कधी चिंतेची सुरकुती तर कधी करारीपणा. कधी एकादा सुस्कारा तर कधी ओठ मुडपून पांघरेली शाल घट्ट पकडलेली. बऱ्याच वेळाने विचारले. कसली खळबळ चाललीय मनात ते समजेल का? मला उलटा प्रश्नच आला. तुम्हाला कोण पाहिजे मुलगा की मुलगी? मला कोणीही चालेल, तुमचे काय? मी प्रतिप्रश्न केला. मग ती बोलली तिचा आशय विचार करायला लावणारा होता.

मला यावेळी मुलगी हवी आहे. वाटत नाही होईल असे. आंबट खावेसे वाटत नाही. उलट आपली जमीन, बंदूक, घर असल्याच गोष्टीत रस येतो. मी लग्नापासून शेजारी संबंध सुधारायचे कसे त्यांतच मग्न होते पण आता शेतीत नासधूस करणारे भाऊसाहेब, बंदूकी समोर भाऊसाहेब असले अघोरी डोहाळे. मुलगा झाला तर काय होईल याचीच चिंता. मुलगी झाली तर बरे. जरा तरी दमात ठेवता येईल.

या वरून नवीन पैलू मला दिसत होता. इनामदारांची भाऊबंदकी संपवण्याची जबाबदारी फक्त आपलीच आहे असे तिला का वाटते, समजत नव्हते. पण आम्ही कधी असा विचार केलाही नव्हता, हे तितकेच सत्य होते. मुलगा का नको तर भाऊबंदकी वाढू नये म्हणून. कुटुंबाच्या भल्याची जबाबदारी हिचीच असल्यासारखी वागत होती. वयाच्या मानाने खूप पोक्त विचार करीत असे.

माहेरी एकत्र कुटुंबाचा जिव्हाळा जोपासलेली होती. सगळे संबंध मायेने कसे जपायचे ते हिच्याकडून शिकावे. एवढा माहेरचा जिव्हाळा असूनही कधी माहेरी जाण्याची इच्छा दाखवली नाही. आमच्या घराची धुरा सावरायची हे काम आपले हे पक्के ठरवले. आई व काकी निर्धास्त झाल्या.

आता मी बाप होणार या पेक्षाही, ती आई होऊन हे सगळे कसे सांभाळेल, हेच सारखे मनात येत होते. मुलाकडे लक्ष द्यायचे, घरची कामे पहायची, हे काही सोपे नव्हते. पण कुठलेही काम अगदी आवडीने अंगावर घ्यायची सवय होती. दमत कशी नाही याचेच आश्चर्य वाटे.

मग आईने बोलवून सांगीतले. सातवा महिना लागला की माहेरी पाठवावे लागेल. तशी तयारी करावी लागेल. बाळंतपणानंतर कमीत कमी सव्वा ते दीड महिना येणार नाही. म्हणजे जवळ जवळ तीन चार महिने असणार नाही. सगळे सांभाळायचे पहावे लागेल. पोरीने सगळेच काम अंगावर घेऊन आम्हाला आळशी बनवलेय. मदतीला कोणीतरी लागेल.

खरे होते काकीचे. आई व काकी दोघांचेही वय जास्त म्हणण्यापेक्षा भोगलेल्या त्रासाने त्या लवकर ठिसूळल्या होत्या.

दिवस भरभर पळत होते. हिला न्यायला तिचे वडील व शाम आले होते.

मला मात्र आयुष्यात पहिल्यांदाच विरहाची जाणीव झाली. काळजी पण वाटत होती. सगळे जण निरोप घेऊन निघाले. मी माडीवर गेलो. परसाच्या आढ्यातून दूर जाणाऱ्या हिची अवघडत पडणारी पावले न्याहाळत होतो.

*****

## ८

## आई (सविता बाई)-

आज शामने बातमी आणली. रुक्मी गरोदर आहे. मला एकदम आनंदाचे उधाण आले. रवा काढला. स्वतःच भाजायला बसले. म्हटले थोडा शिरा करुया व गोडा बरोबरच सगळयाना बातमी देऊया. रात्रीचे सगळे जेवण मधलीने केव्हाच तयार केले होते. परत तिला बोलवून सांगण्यापेक्षा आपणच करू असा विचार केला. शामला सांगीतले एवढ्यात कोणाला बोलू नको. जेवताना तोंड गोड करूनच बातमी देऊया.

तेवढ्यात मधली आली. विचारू लागली. काय करायचे राहिले काय? म्हटले नाही ग बाय, जेवताना जरा गोड वाढायचे ठरवले. मग थोडा शिरा करायला घेतला. पण ती हुशार होतीच. लगेच मला विचारले "शाम रुक्मीकडे गेलेला. तिकडून बातमी आणलीन काय वो? रुक्मी गुरवार आहे वाटते." मायच ती. तिला समजणारच. मी हसून मान हलवत होकार दिला. तशी माझ्या जवळ येऊन बसली. हातात हात घेऊन म्हणाली "आजी होणार वो मी! किती बरं वाटतंय. दिवस कसे पळत गेले. पण आता जाता जायचे नाय. बाळंतीण होऊन नातवंडाचे तोंड दिसेस्तोवर दिवस हळू हळू जाणार. जीव वर काढणार."

पहिले मोठ्यांना जेवायला वाढले. पानात शीरा बघून मोठे सासरे विचारू लागले, सण नाही, संकष्टी पण नाही. आज काय म्हणून गोडधोड केले? सगळीच पुरुष मंडळी जेवायला बसली होती. नव्हते ते मधले दीर व गुरू. दोन घरे बांधणे चालले होते त्याच्यावर देखरेखीला गेले होते. त्यांना केव्हा एकदा भाग मिळून वेगळे होतो असे झाले होते. मी मधलीला बोलावले व म्हटले तू सांग सगळयाना. ती गप्पच राहिली. मग मलाच सांगा म्हणून गळ घालू लागली.

मी मग बोलले "मधली आजी होणार. रुक्मी येईल चार पांच म्हयन्यात बाळंतपणाला. शाम खुशाली काढून आला आजच."

दोन्ही सासरे खूष झाले. शामला रुक्मीची खुशाली विचारू लागले. एवढ्यात मधले व गुरू आले. थोड्या वेळाने त्यांना समजले रुक्मीचा विषय चाललाय. मग सासऱ्यानी सांगीतले "आजोबा होणार रे तू."

"म्हणजे?" मधले.

"अरे रुक्मी पोटुशी आहे. शाम गेलेला खुशाली काढायला" सासरे.

मधल्यांचा चेहेरा खुलला. पण थोड्याच वेळात गहन विचारांत गेला. मला समजले, त्यांना राग आला असणार. शामला का पाठवले? मुलगी माझी, मला का नाही सांगीतले? असलेच भेदी विचार असणार दुसरे काय? सगळयां बरोबर आनंद घेणं माहीतच नाही. प्रत्येक बाबतीत माझे माझे हेच चाले. आता दोन घरे झाल्यावर वेगळे रहायचे मनसुबे चालले होते. प्रत्येक वेळी कुटुंबापेक्षा आपलाच विचार चालला होता.

शाम सांगत होता. रुक्मी मजेत आहे. दोन्ही सासू फार लाड करतात, काळजी घेतात. अगदी रुळली आहे त्यांच्या बरोबर. छान तब्येत झाली आहे. गरोदर पणांतली नव्हाळी चढली आहे चेहेऱ्यावर. सगळे ऐकताना माझा व मधलीचा ऊर भरून येत होता. मधली तर मधूनच डोळे पुसत होती. आता छोटी बोलू लागली. म्हणाली बाळंतीणीची खोली साफ करायला हवी, गोधड्या, पांघरुणे धुवायला काढायला हवीत.

"अगो अजून चार महिने आहेत. एवढ्यांतच कसली घाई?" मी म्हणाले.

"अहो गोधड्या धुतल्यावर समजणार ना विरतात की चांगल्या आहेत ते. विरल्या तर नव्या नको का करायला?" छोटी.

तिचे बरोबर होते. कपडे धुणे, घर व्यवस्थित लावणे. मुलांना न्हाऊमाखू घालणे. हे काम तिचे होते. प्रत्येकजण आपली जबाबदारी आत्तापासूनच तपासायला लागला होता. बातमी मिळाली आणि उत्सवाचे वातावरण केव्हा आले ते समजले नाही. सुमी आता चार वर्षाची होत होती. रुक्मीताई येणार ऐकून घरभर धावत सुटली होती. दुसऱ्या दिवशी पासून तर भंडावून सोडायला लागली. एकच घोष, अजून रुक्मीताय कशी नाय आली? रुक्मी ताईला बाळ होणार. त्याला तीच खेळवणार, दुसऱ्याना घेऊच देणार नाही. मनात एकच रुक्मी ताई तिची म्हणून बाळ तिच्याकडे. लहानांचा हा उत्साह बघून मला बरे वाटायचे. खरंतर सगळी मुले अगदी सख्ख्यांसारखी प्रेमाने राहात.

एकदा वाटले रुक्मीकडे जाऊन भेटून यावे. पण मन आवरले. बरे दिसणार नाही. मुलीच्या सासरी फार जाऊ नये माहेरच्यानी. मुलगी तिच्या संसारात रुळत नाही. नाहीतरी आठ महिने वर झालेत तिच्या लग्नाला. चार पांच महिन्यात येणारच ती. असणार तीन

महिने तरी. विचार मन ढवळत होते व शांतही करत होते. मजा वटत होती मनाच्या या दोन्ही बाजू न्याहळताना.

रात्री मोठ्या सासऱ्याना ढांस सुरू झाली. काही केले तरी थांबत नव्हती. दुसऱ्या दिवशी शाम शहरातून डॉक्टरला घेऊन आला. त्यांनी ओषधे दिली. मग याना बाजूला घेऊन काहीतरी बोलला. यांचा चेहेरा एकदम चिंतातूर झालेला बघून मला रहावेना. संधी मिळताच विचारले. त्यांनी सांगीतलेले ऐकून मला चिंताच झाली. थोड्या दिवसाचे पाहुणे आहेत म्हणाले डॉक्टर.

मोठे सासरे कधी आजारी पडलेले दिसलेच नाहीत. चांगले फिरत होते दोन दिवसापूर्वी पर्यंत मग एकदम असे कसे? थोडीशी हवाळी लागायची अधून मधून, पण ती देखील पावसांत फार थंड झाले की. बाकी काहीच त्रास नव्हता. मग असे का म्हणाले डॉक्टर? आता रुक्मी ऐवजी सासऱ्यांचे विचार थैमान घालू लागले.

दुसऱ्या दिवशी त्यांची तब्येत अजून खालावली. ढांस थांबावी म्हणून औषधांबरोबर गरम काढा, छातीला लेप लावणे चालू केले. मला राहून राहून वाटू लागले, सर्वानी घरीच राहावे. केव्हा काय होईल सांगता येत नाही. मग बोललेच. कोणीही उत्तर दिले नाही. पण मधले बोललेच “त्यांना काय धाड भरलीय, ढांसच आहे ना होईल बरी दोन दिवसांत.” मग बाहेर निघून गेले. शाम कामासाठी बाहेर जाणार होता. तो थांबला. धाकटे सासरे भावा शेजारी बसून होते. डोळे पाणावत होते. मधेच म्हणत “नको जाऊ रे. मग मी कोणाशी बोलू?” भावांचे प्रेम बघताना माझेही डोळे पाणावत. दोन दिवस झाले व ते निपचीत पडून राहू लागले. ढांस जवळ जवळ नाही झाली. बरे वाटले. मनात आले होतील बरे. पोटांत काहीच नव्हते म्हणून पेजेचा निवळ घेऊन गेले. मला हातानी सांगू लागले. जातो आता. मनात चरकले. धाकटे सासरे हडबडून म्हणाले “असं काय गो करतोय हा. थोडी पेज पी बरं वाटेल रे.” त्यांचा आवाज रडवा झाला होता.

श्वासाचा आवाज बदलू लागला. घरघर आहे असे वाटले. मग सगळ्यांना बोलवले व त्यांच्या भोवती बसवले. हळूहळू घरघर वाढत गेली. धाकले सासरे अगदी जवळ, त्यांच्या डोक्यावरून हात फिरवत बसले होते. एकदा डोळे उघडून त्यांनी हंसऱ्या चेहेऱ्यानी सर्वांवर नजर फिरवली. डोळे मिटले व थोड्यां क्षणांत घरघर बंद झाली. ते कायमचे शांत झाले. धाकले सासरे लहान मुलासारखे रडू लागले. हे त्यांना आवरत होते.

बऱ्याच वेळानी धाकले दीर उठले व माझ्याकडे येवून विचारू लागले. “पोरींना बोलवणार? निरोप लवकर पाठवावा लागेल.” मनात आले माझ्या दोघीना बोलावले तर

रुक्मीला एकटीला का नाही. रुक्मी अवघडलेली आहे. तिला त्रास नको. म्हणून कुणालाच नको.

मी कुणालाच बोलवू नका म्हणाले. उद्या निरोप पाठवू. पुढची तयारी करा, गावात कळवा.

सगळे हळू हळू कामाला लागले. पंधरा मिनीटांत जवळ जवळ सगळे गाव जमा झाले. त्यांचे मोठे खोत गेले होते.

ओटीवर दिवा लावला. सगळे विधी ब्राम्हण उरकत होता. आमचे हे एकच पुत्र म्हणून सगळे करीत होते. धाकले सासरे भिंतीला टेकून शून्यात नजर लावून बसले होते. मधूनच हमसून हुंदका यायचा. राम लक्ष्मणासारखे नाते आज तुटले होते. खोतांच्या घरून बऱ्याच वर्षानी कोणीतरी कायमचा निरोप घेतला होता.

चार तासानी घरात शांततेशिवाय काहीच राहिले नव्हते. मधुनच सुमी काहीतरी विचारी. पण मोठ्या बहिणी तिला दबक्या आवाजात गप्प करीत.

काळ कोणासाठी थांबत नाही. चार सहा दिवसांत घर परत सारखे होऊ लागले. धाकले सासरे मात्र अन्नपाण्यावरची इच्छा गेल्यासारखे करीत होते. त्यांना समजावणारे कोणच नव्हते. मग मलाच पुढे व्हायला लागले. दुपारचे काम घेऊन त्यांच्याशी बोलत बसू लागले. महिना उलटला. ते बरेचसे सावरले होते. रुक्मीकडे गुरू जाऊन सांगून आला होता. मी त्याला स्पष्टच सांगीतले होते. रुक्मी यायचे म्हणाली तर आणू नकोस. अवघडलेली आहे, तिला त्रास नको. नाहीतरी थोड्यांच दिवसांत येणारच आहे. आबासाहेब इनामदार आले. धाकल्या सासऱ्यांबरोबर थोडावेळ बसून बोलले व गेले.

मला आता पुढचे पहायचे होते. पाऊस यायच्या अगोदर शेतीची तयारी. पावसाळ्यात लागणारे सामान भरायचे होते. लाकूडफाटा भरायचा होता. त्याचवेळी रुक्मीच्या बाळंतपणाला लागणारे सामान भरायचे होते. रुक्मी पावसाळा संपता संपता बाळंत होईल असा अंदाज होता. पावसाचे काय! पडायचा तेव्हा पडत नाही आणि मग धुमाकूळ घालतो. तयारीत असलेले बरे.

पेरणी आटपून महिना झाला. लावणीसाठी पाऊसाची वाट बघत सगळेच बसले होते. गेले आठ दहा दिवस पावसाने गुंगारा दिला होता. मळभ असायचे पण टिपूसही पडायचा नाही. आणखी पंधरा दिवसानी रुक्मीला आणायला जायचे होते. त्या अगोदर लावणी आटपली पाहिजे होती.

रात्री पावसाची धार सुरू झाली. सकाळपर्यंत ओतत होता. सकाळी लगबग सुरू झाली. लावणी करायला सगळे गाव धावू लागले. पुढचे आठ दिवस सुखदुःखाचा विचार करायला वेळ नव्हता. होतं ते फक्त काम. त्यात धाकल्या सासऱ्यांचे उसासे व रुक्मीच्या येण्याची आठवण दोन्ही विरून गेले. बाहेरची कामे जरी पुरुष पहात होते तरी पैरेकऱ्यांची न्याहरी, जेवण संध्याकाळी त्यांना द्यायच्या कण्या तांदूळ सगळे बघता बघता दिवस संपायचा.

लावणी आटपली आणि एक दिवशी रात्री जेवताना मधले म्हणू लागले.

"दोन्ही घरे तयार झालीत, कापणीच्या अगोदर वेगळे झालो तर ज्याचे त्याचे पीक ज्याच्या त्याच्या घरात जाईल. मग कोणाचे किती यावर भांडण नाही व्हायचे."

मी सुन्न झाले. धाकले सासरे अजून हयात होते. रुक्मीचे पहिले बाळंतपण, ते काय मधलीला जमणार होते? कसल्या जोरावर हे वाटण्या करायला बघत होते समजत नव्हते.

आता मात्र धाकले सासरे बोलले. सगळ्यात वडील तेच होते. त्यांनीच बोलले पाहिजे होते.

"हे बघ! मी तुझा बाप. भाग पाडलेस तर मलाय न्यावे लागेल तुला. मला काय ह्या घरा शिवाय करमणार नाय. घरे बांधतानाच सांगीतलेलं, आम्ही दोघय गेल्यावर काय त्या वेगळ्या चुली मांडा. आणि काय रे तुला घाई कसली लागलीय? तुज्या भागाचे बाकीचे खातात वाटते काय तुला? आणि एक लक्षात घे घरे तू बांधलीयस, कोणाला कुठचे द्यायचे ते मी ठरवीन. तेच सगळ्यानी मान्य ठेवायचे. माझा मुलगा म्हणून तुला उजवे बघीन ही आशा सोड. लाज वाटते रे तुझी मुलगा म्हणायला."

मी पुतळ्या सारखी उभी होते. मागे मधली येऊन केव्हा उभी राहिली ते माहीतच पडले नाही. एकदम बोलली,

"मी काय इतक्यात जाणार नाय. रुक्मीचे सगळे काढायला मला नाय होणार. ताई असेल तिथेच मी रहाणार. तुम्हाला जायचंय तर जा." मग रडत घरात गेली.

या बाईला कुठून बळ आले तेच समजले नाही. पहिल्यांदाच नवऱ्याला समोर बोलली. खोतांच्या रीतीला मोठा तडा गेला. तोच सासरे गरजले,

"कोणावरय जबरदस्ती चालणार नाय. तिला बाईल म्हणून जबरदस्ती करशील तर बघ. अक्कल शीक तिच्या कडून. सगळ्यांना घराची माया, तू एकटाच असा कसा रे?"

काहीतरी पुटपुटत मधले बाहेर पडले. कोपऱ्यात बसलेला गुरू पाठोपाठ धावला. रात्री कुठे चालले म्हणून मला काळजी वाटू लागली. डोक्यांत राख घालून काही केले नाही म्हणजे मिळवले.

अर्ध्या तासाने गुरू आला. विचारले तर म्हणाला शहरात गेलेत. सासरे आता माझ्यावर ओरडले, "तुला गो सगळ्यांची काळजी. पोटात चुरचुरले की येईल घरात. कोण जेवायला घालणार दोन दिवसापेक्षा? तू चिंता करायची सोड असल्या घरभेद्यांची."

बाप असून मुलाबद्दल असे उद्गार त्यांची मनातली व्यथा दाखवीत होती. घरात आले तर मधली पण म्हणाली "काळजी नको करूत तुम्ही. नाय आले आठ दिवस तर घर तरी शांत राहील."

एकादा माणूस स्वार्थाने आपली किंमत कशी कमी करून घेतो ते समजत होते. पण घरातून एकाद्याने रागावून बाहेर जाणे, मला माझा मोठा पराभव वाटत होता. मी सगळे घर एकत्र ठेवायला धडपडले. वेगळे व्हायचा चांगला मार्ग पण काढला, तरी देखील घरात वादळ यावे? कुठे चुकले? काय चुकले माझे. रात्रभर आढ्याकडे डोळे लावून पडले होते. झोपच नव्हती.

चार दिवस झाले मधल्यांचा पत्ता नाही. सगळे आपआपल्या कामात मग्न. मधलीकडे बोलले तर तिनेच मला समजावले. कुठे जाणार नाहीत. काळजी नको. बायको असून ही एवढी शांत कशी? पाचव्या दिवशी सकाळी लांबूनच मधले येताना दिसले, गुरू त्यांना बघताच धावत सुटला. मी सासऱ्याना म्हणाले येतायत ते. आता काही बोलू नका, वाद नकोत. रुक्मी येणार तिचे बाळंतपण पार पडू दे नीटपणे.

हसत सासरे म्हणाले "मी काय सांगीतलं तुला? गो खोटा शिक्का तो परतच येणार. घरात कामे तरी करतो काय गो? ओवजत फिरत असतो. दोघे भाऊ मरतात शेतीत हा गाव भटकतो. तू म्हणतेस तर रहातो गप. पण जास्त नाटकं करू लागला तर त्याला शिकवायला लागेल गो."

मी घरात निघाले. मधलीला सांगीतले, आलेत ते जा पाणी दे, चहा पाहिजे काय बघ. तिने सरळ शालीनीला सांगीतले "जा गो शाली, विचारून ये बापाला चा हवा काय. नी जाताना पाणी घेऊन जा." शालिनी गेली आणि मी मधली वर उसळले. "मुलांना कशाला ओढतेस यात. मुलाना नको शिकवूस दुस्वास करायला. आणि नवऱ्याबद्दल आदर ठेव जरा."

“होय तर पंचारती घेऊन जाते ओवाळायला, दिवे लावून आलेत ना. माझ्यासाठी नवे कोरे घर बांधलनी ना. ह्या घराचा, मोठ्यांचा अपमान करून बाधलनी. विसरू सगळे? तिथे गेलो ना तरी माझा जीव इथेच रहाणार. मला काय घास नाय गोड लागणार.” ती ताडताड बोलत सुटली. लग्नाला वीस वर्षांवर काळ उलटला होता. मग मलाच उमगले आमची लग्ने एका पुरुषाशी जरी झाली तरी आम्ही सर्व कुटुंबाच्या होतो. मधली सुद्धा कुटुंबाचे पहिले बघणारी झाली होती.

सगळेच गप्प राहिले व हे वादळ मिटले. मधल्यांना समजून चुकले की त्यांच्या खेरीज सगळे एक आहेत. पुढचे दिवस शांतपणातच गेले. पण छोटे दीर कधी काही न बोलणारे सासऱ्यांना म्हणाले. “सगळी जबाबदारी घेऊन कधी राहिलोच नाही, आम्हाला जमेल वेगळे रहायला? इथे मोठी वैनी सांभाळते बरोबर. माझ्या बायकोला जमेलसे वाटत नाय. आम्हाला वैनीचा आधार लागेल. कसं करुया?”

सासरे गडगडत हंसले म्हणाले “बघ गो बाय हा काय तुला सोडून जायला तयार नाय. काय करशील आता? सगळ्यांना सांभाळत राहिलीस नी लंगडे केलेस. निभव कसे ते.”

मी हसत बोलले. जरूर पडली तर रोज जाईन. समजावीन. अंगावर पडले की येईल सगळे. यायलाच पाहिजे. आम्ही आहोतच ना, काय वाऱ्यावर सोडणार नाही.

समाधानाने छोट्यांचा चेहेरा उजळला. व ते कामाला निघाले. कसे होते एक एक जण. छोटे दीर कधी बोलत नसत. वर्षानुवर्षे जी कामे समोर आली ती आपली समजून करीत राहिले. कुटुंबावर विश्वास. स्वार्थ कधीच न शिवलेले. आयुष्यभर ठराविक कामे केल्यामुळे वेगळा संसार करायला घाबरणारे. सरळमार्गी होतेच, पण छोट्याशा आश्वसनावर प्रचंड विश्वास ठेवणारे भाबडेपण त्यांच्यात होते. त्यांना वेगळे राहिले तरी आमची गरज पडणार होती.

वादळे, शंका, उपाय सगळे स्वच्छ झाले व घर मूळपदावर आले. आता उलट आम्ही जावा दुपारी विरंगुळयाच्या वेळी, वेगळे झाल्यावर काय होईल त्याच्या गप्पा मारू लागलो. मधली चिडूनच बोले. छोटी म्हणे माझे काही अडले तर ताईलाच घेऊन जाणार. मधली म्हणे मला नाही नेता येणार पण मीच येणार ताईकडे. मग सगळेच हसू.

दिवस पटपट गेले. कापणीला अजून दोन तीन आठवडे होते. मधल्यांना म्हटले रुक्मीला आणायला जायचे आहे, जोड्यानी जा. तर ओरडलेच म्हणाले “काय ते ती नी तुमी जा नाय तर गुरूला धाडा. मी काय जाणार नाय.”

मनातला विखार बाहेर पडत होता. दिवसे दिवस त्यांच्या मनातला दुस्वास वाढत होता. मधली पटकन म्हणालीच "ताई! तुम्ही नी मी जाऊया? मलाय रुक्मीचे घर बघायला मिळेल."

तिचे खरेच होते. पोरीला उजवून एवढे दिवस झाले तरी तिच्या सासरचे दर्शनपण केले नव्हते. छोटीवर सगळा भार टाकून एका दिवसासाठी आम्ही दोघीनी जायचे ठरवले. चांगला दिवस बघून निघायचे व दुसऱ्या दिवशी रुक्मीला आणायचे असे नक्की केले. दिवस ठरला तसे गुरूला रुक्मी कडे सांगावा देऊन पाठवला. गुरुवारी जायचे नक्की केले.

जायच्या दिवशी सोबत शाम निघाला. त्याचे वसुलीचे काम होतेच पण आम्हालाही सोबत होईल असा विचार त्याने केला.

मधलीने रुक्मीच्या घरी द्यायला खूपसा फराळ करून बरोबर घेतला. ती पहिल्यांदाच आपले माहेर किंवा सासर सोडून दुसरीकडे चालली होती. फार हरकून गेली होती. मला देखील उत्कंठा वाढली होती.

गुरवार पर्यंत सगळे घर रुक्मीसाठी तयार करण्यात दिवस पटकरून गेले. आणि आम्ही रुक्मीला आणायला निघालो.

*****

अरुणा कुळकर्णी

## ९
## रुक्मिणी-

पांचपरतावन झाल्यापासून माहेर पाहिलेच नाही. आता दोन दिवसांत आई व माय येणार मला न्यायला. बाळंतपण तिकडेच करणार. म्हणजे इकडे पहाणारे कोणी नाही. सासूबाई तर फार थकल्यात. काम होत नाही त्यांच्याकडून. काकीसासूबाई जेवणखाण करतील पण बाहेरचे काम कोण सांभाळणार? पावसाचे दिवस आहेत. शेतीची कामे जोरात असणार. नारळांचे पाडप आलेय नारळांचे मोजमाप करून व्यापाऱ्यांना द्यायचे हे बघतील. पण पाडपाच्या गड्यांचे चहापाणी, जेवणखाण सगळे काही काकीसासूबाईना नाही जमणार. कसे जातील हे दिवस. आमचे हे इनामदार. शेतीत बागेत फिरकत पण नाहीत. शेजारचे टपलेतच नोकराना फितवायला. पाडपाला नजर ठेवली पाहिजे नारळांवर. सगळ्याच चिंता एकदम डोळ्या समोर येतायत.

माहेरी जायला पण जीव आसुसलाय. मोठे आजोबा गेलेत. धाकले आजोबा एकटे झाले असणार. त्यांच्या बरोबर बोलत बसायला हवे. नाहीतरी आई आणि माय कामाला हात पण लावू देणार नाहीत. आजोबांबरोबर बोलत बसले की दोघांचाही वेळ जाईल.

माझ्या बाबाने काय गोंधळ घालून ठेवलाय देव जाणे. दोन नवी घरे बांधायला घेतलीत. वेगळे होणार. मग तर माहेरच तुटेल माझे. माय पेक्षा आईचा लोभ जास्त. माहेर म्हणून जायचे कुठे? माय कडे गेले तरी मन आईकडे ओढणार. आईकडे गेले तर मायला वाईट वाटणार. कसे होणार घर विस्कटले तर?

इनामदारांची सगळी कामे माझ्यावरच पडली होती. मी गेले तर चारपांच महिने सांभाळणे अवघड पडणार होते. कसे होईल याचीच चिंता आहे. काकी सासूबाईंकडे बोलले पाहिजे.

दुपारची जेवणे झाल्यावर सासुबाईंसोबत आडवी झाले तेव्हा विषय काढला. सविस्तर माझी काळजी सांगीतली. कसे सांभाळणार ही चिंता दाखवली. सासूबाई

म्हणाल्या "तुझ्या आधी चाललेलं तसंच चालणार गो बाय. काय घरात येईल ते आपलं. जाईल ते आपलं नाही समजायचं."

काकीसासूबाई म्हणाल्या "होईल तेवढे बघेन गो मी. पिटाळीन आबासायबाला ध्यान द्यायला. तू तुला सांभाळ. एक वरीस थोडं कमी मिळेल ना? मग तू आहेसच. काय कमी पडणार नाय. पण खरं गे पोरीन ह्या वयात सगळे सांभाळलेन बरोबर. भाऊसायब पण वाटेला जात नाय."

"म्हणजे?" मी विचारले.

"अगो काय सांगू तुला! आमचा आबासायब गप राही. भाऊसायब भागेल्यांना फितवी नी नारळ सुपारी परस्पर पळवी. आमच्याच बागेतली यांच्या घरात जाई. तुझी सासू आबासायबाला आवरी. म्हणे खाऊ दे त्यांना. देव बघतोय. तू नको जाऊ. मारामारी करेल तो. मग काय हा गप घरात बसे. भागेल्यांना बोलावून दम मारी. भाग काढून दुसऱ्याला नेमीन म्हणून सांगी. पण त्यानेय पाणी जोखलनी गो. मग तू जायला लागलीस, पाडपाचे नारळ मोजून घरात येयला लागले. भागेलीय तुझ्या गोड बोलण्याने सरळ झाले. नी भाऊसायब गप झाला." काकी सासूबाई मला एवढ्या दिवसानी लग्नाअगोदरची परीस्थिती सांगत होत्या.

"आता भागेलीय नाही उभे करणार भाऊसायबाला. तुला मान देतात, भीतात ते. तेवा काय होईल याची चिंता नको करू. परत आल्यावर हिशोब घेणार म्हणून सांग भागेल्यांना. मग सरळ राहातील बघ." काकीसासूबाईनी पुढचा सल्ला दिला.

मला माहीत होते की लग्नाआधी हे लहान म्हणून सासूबाईच भागेल्यांचा हिशोब बघायच्या, नारळ सुपारीचे पाडप मोजून घरी आणायच्या. तीच कामं मी आल्यावर माझी समजली. पण माझ्यासमोर भाऊसाहेब कधीच उभे नाही राहिले. विजयाताईंच्या लग्ना नंतर तर ते मला घाबरू लागले की काय तेच समजेना.

पाडपानंतर भागेल्यांचा भाग देवून वर मी त्यांना दहा वीस नारळ व पिशवीभर सुपारीचे बेडे देऊ लागली. त्यामुळे असेल, त्यांनी भाऊसाहेबांची दंडेली ठुकरावली. सगळे इमानदारीत हिशोब देत. माडीवर कचेरीत कसे हिशोब होत ते काही मला समजत नसत. शिकलीच नाय तर काय वाचणार नी समजणार? आता वाटले, आपण आपल्या पद्धतीने हिशोब ठेवला पाहिजे होता. म्हणजे आता मी नसताना किती उत्पन्न कमी झाले ते समजले असते. आबासाहेबाना याबाबत विचारण्याची सोयच नव्हती. इनामदारांचा

उपमर्द ठरला असता तो. पण आता काकीसासूबाईना विचारायला काय? असे मनात आले.

मी मग बोललेच. आईसासूबाई बघायच्या ती कामे उचलली. मला हे माहीतच नव्हते. पण काकी सासूबाई माझ्यामुळे काय चूक झाली नाही ना. उत्पन्नांत घट पडली नाही ना? हे विचारले तशा दोन्ही सासूबाई एकदम हंसू लागल्या. मग आईसासूबाई म्हणाल्या “घट काय पडणार? उलट सगळे बरोबर घरात येते म्हणत होता आबासायब. तो हिशोब ठेवतो. पयल्याच वर्षाला म्हणाला. असेच चालले तर सगळे उत्पन्न बरोबर येईल घरात.”

“लक्ष्मीच्या पावलाने आलीस तू. आता बाळंतपणाला जातेस इनामदार घेऊन ये म्हणजे पावलो ग.” काकी सासूबाई हसत बोलल्या.

मी जायची तयारी करू लागले. दोन दिवसानी आई आणि माय येणार होते. संध्याकाळी भागेल्याना बोलावणे पाठवले. त्यांना सांगीतले, सगळी सुपारी व नारळ घरी आले पाहिजेत. मी देते ते नारळ व सुपाऱ्या पण घरीच द्यायचे. मी आल्यावर हिशोब बघेन. जे बरोबर हिशोब देतील त्यांना मी नेहमीपेक्षा दुप्पट नारळ व सुपाऱ्या देईन. सगळे माना डोलावत गेले. जेवण करण्याऱ्या भटणीला सासूबाईंची काळजी घ्यायला सांगीतले. जास्त वेळ घरीच राहायला सांगीतले. मी त्यांना दोन छान साड्या देईन म्हणून वचन दिले. त्यांनी सगळे मानले. बरोबर न्यायचे असे काहीच नव्हते. फराळ घेतला असता तर आई आणि माय ओरडली असती. तरीपण सुमीसाठी बेसनाचे लाडू आणि चिवडा घेतला.

आई आणि माय आल्या तेव्हा दुपार टळून गेली होती. सात आठ मैल चालून चांगल्याच दमल्या होत्या. मधेच पडलेल्या पावसाने भिजवले होते. मग उन्हात तापत आल्या होत्या. हात पाय धुवून बसायला सांगीतले. जेवण तयार होते पण जेवायला नाहीच म्हणाल्या. थोड्या वेळाने चहा घेऊ म्हणाल्या. सासूबाईंना भेटल्या व त्यांच्या गप्पा सुरू झाल्या. मला डुलकी आली व मी गाढ झोपून गेली. मला कुणी उठवलेच नाही. कपबशीचा आवाज आला आणि जागी झाले तर भटीणबाईनी चहा करून आणला होता. मी घाईत उठले तर आई रागावली. हळू उठ म्हणाली. अवघडलेली आहेस झोप येणारच म्हणाली.

रात्री जेवणे झाली आणि गप्पाना रंग आला. मायने हट्टाने जेवण केले. सगळ्यांनी वाखाणले. तशी म्हणाली “भाग्य माझं! इनामदार जावयांच्या घरात त्यांनाय जेवण करून घालायला मिळाले.” रात्री दमलेल्या त्या गाढ झोपल्या सकाळी लवकर उठून निघायचे

ठरले होते. गुरू बैलगाडी घेऊन येणार होता. तो आला की लगेच निघायचे ठरले. मी मात्र अर्धवट जागी, अर्धवट झोपलेली अशा अवस्थेत होते. कधी इनामदारांची काळजी तर कधी माहेरच्या आठवणी. कधी आजोबांची आठवण तर कधी पोटांतल्याची लाथाळी. मी सुख दुःखांच्या झोपाळ्यावर झोके घेत होती. कुस वळवत पडले होते.

पहाटेचा कोंबडा आरवला आणि मी उभी झाले. दररोजची संवयच पडली होती. मी उठलेली बघून शंभू उठायचा. गाई म्हैशींची वैरण घालून दूध काढायला बसायचा. मला उठायला उशीर झाला की यालाही उशीर व्हायचा. मी त्याला म्हटले मी नसणार उद्यापासून, लवकर उठत जा. मान हलवत तो दूध काढायला लागला. पण मनोमन मला वाटले, हा काही उठणार नाही. आरामात चालणार सगळे.

चूल पेटवून चहा टाकला व आंघोळीला गेले. आता उठतील सगळे. ह्यांना पहाटेच चहा लागतो. केव्हाच उठले असतील. आंघोळ आटोपून देवाची स्तोत्रे चालू झाली असणार. थोड्याच वेळात चहा पोचवला पाहिजे. वेळ होता नये. मी गेले की कसे होणार हे सगळे? घराच्या, संसाराच्या चिंता सगळ्या बाईलाच करायच्या. मग अशा काही प्रसंगी केवढी अडचण होते. कसा मिळेल चहा वेळीच?

दररोजच्या सगळ्या कामांची भुते फेर धरून मला खिजवत होती. माहेरपण सुखांत जावे अशी त्यांची मुळीच इच्छा दिसत नव्हती. मी मात्र चिंता वाढवत बसले होते. आजच्या दिवस तरी सगळे व्यवस्थित करू म्हणून मनाचे समाधान केले व चहा घेऊन निघाले.

माडीवर पोचले तर हे चहाची वाटच पहात होते. चहा ठेवला तर कानावर पडले "आज माहेरी जाणार आहात ना?"

हो म्हणून मान हलवली. पुढे ऐकू आले "आमचा सकाळचा चहा चुकणार. काकी काही एवढ्या लवकर उठत नाहीत."

"मग नको जाऊ? बाळंतपण इथेच काढावे लागेल. कोण करील?" मिश्कील हसत मी विचारले.

"नाही! नाही! तुम्ही जाच. तुम्ही एवढे सोसणार आहात, त्यापेक्षा आमचा चहा काही मोठा नाही. काढू कळ आम्ही. पण तुम्ही सांभाळून रहा."

"तुम्ही देखील सांभाळा. थोडी अडचण होईल. सगळेच वेळच्यावेळी व्हायचे नाही कदाचित. पण सहन करा. मी येईन तोपर्यंत कळ सोसा. काकीसासूबाई होतील तेवढे करतीलच." एवढे बोलून मी रिकामा कप उचलून निघाले.

“तुम्ही सांभाळा व आम्हाला लगेच कळवा काय झाले ते. आम्ही येऊ.”

मी खाली आले तर माय, आई, काकीसासूबाई व सासूबाई सगळेच उठले होते. माय व आई घाई घाईने आंघोळी करायला गेल्या. अर्ध्या तासाने सगळे जमलो चहा झाला व आवरा आवर सुरू झाली.

दिवस उजाडला तसा आईचा जीव वर खाली होऊ लागला. अजून गुरू गाडी घेऊन पोचला नव्हता. गाडी तर यायलाच हवी. मला एवढे चालत जाणे शक्य नव्हते. सूर्य वर आला तांबडे फुटून प्रहर उलटला असेल आणि गाडी येतेय म्हणून सांगत गडी आला.

गाडी आली. पण गुरूऐवजी शाम आला होता. आईने विचारले तर म्हणाला “सकाळी पोंचायचे तर भल्या पहाटे निघायचे. गुरूला उठवले तर उठेनाच. मग आजोबाच म्हणाले मला. मी आलो”

आईनी सगळे सामान गड्याला दिले. शामने व गड्याने ते लावे पर्यंत निरोपाचे चालले होते. हे पण खाली आले होते. सासूबाईंच्या पाया पडू लागली तर दोघीही रडू लागल्या. काकीसासूबाईनी मिठीतच घेतले. अगदी मुली सारखे कुरवाळत होत्या. मग आम्ही जोडप्याने आई व मायच्या पाया पडलो.

मला वाटले मी दोन्ही घरी माझी माया लावली होती. लग्न झाले तेव्हा आई, माय व काकीच कशाला माझ्या सगळ्या बहिणी रडत होत्या. आता माहेरी निघाले तर दोन्ही सासूबाई रडत होत्या. माया अशी कशी? किती अजाणतेपणी पेरली जाते कशी सुंदर रुजते. पाणावलेल्या डोळ्यानी हळू गाडीत चढले. सामाना बरोबर घरच्या चिंतांचे ओझे पण बरोबर आले होते.

गाडी मार्गी लागली व माझे डोळे पाहून माय म्हणालीच “थोरली जाऊबाय! रुक्मी इनामदार झाली हो. डोळयांतले पाणी खरत नाय घर सोडताना.”

“घरची माया लागायलाच हवी, तरच सुखाचा संसार करायला येतो. तुला आठवते काय गो माहेर? तुला म्हयनाभर जायचे आले माहेरला तर जाताना तुय रडशील आता. संसाराची, सासरच्या माणसांची माया गो ती. डोळयातून पाझरणारच.” आई म्हणाली.

“खरं हो! दोनी सास्वा नी इनामदार माया करताना दिसले रुक्मीवर. समाधान वाटतं असं बघितल्यावर. पोरगी सुखाला लागली.” माय.

मी हे ऐकता ऐकता बरीच निवळले. डोळे भरायचे बंद झाले. विचार आला, खरंच आपण किती भाग्यवान. माहेराने उदंड माया दिली. सासरी मायाच नाही पण मान देखील मिळाला. आपसूकच सगळे काम अंगावर आले ते पेलले आणि बरोबर सर्वांनी सत्ता व

मान बहाल केला. काही धडपड करावीच लागली नाही. माहेर व सासर यात फरक होताच. माहेरी कामे केली तरी जबाबदारी नव्हती. व्यवहार बघणारे सगळे मोठे होते. आजोबा, आई, माय, छोटी काकी, शामदादा, सगळे काका असल्यामुळे आम्ही मुलं सांगकामेच होतो. लग्नानंतर मात्र सगळेच काम डोक्यावर पडले. निर्णय सुद्धा मीच घ्यायचे. आईने दिलेल्या उपदेशाप्रमाणे कुणालाही कधी नाही म्हटले नाही की कामाला घाबरले पण नाही. परिणाम मात्र असा झाला की माडीवरचे इनामदारी हिशोब सोडून सगळी जबाबदारी माझी झाली. ती मी सहज पेलली देखील.

माहेरी एकोप्याने राहाणारे आम्ही. इनामदारांकडे कट्टर भाऊबंदकी. हा फरक फारच मोठा होता. कसेही करून हे भाऊबंदकीचे विष इनामदार वाड्यातून घालवायचे होते.

मी गप्प विचारात पाहून आई म्हणाली. “रुक्मी बरे वाटतेय ना? धक्के बसतात त्रास नाय ना होत?” मी नाय म्हणत मान हलवली.

“मग गप कां? बोलावं गो, मग टाईम कसा लवकर पळतो.” आई.

“काय नाय गे. कामं कशी होतील त्याची चिंता. सगळं मीच सांभाळी. एकल्या काकीसासूबाय कुठे कुठे बघणार. हे काय बागेत, शेतात जात नायत. दिवसय पावसाचे.. कामाचे. नोकरचाकर काय घरच्या सारखी शेती करणार? बाळंतपणय अगदी कामाच्या वेळेवर आले.” मी

“जाऊबाय, पोर जबाबदार झाली, इनामदारीण झाली. लवकरच झाली नाय?” माय बोलली.

“व्हायलाच पायजे, नायतर तुझी..माझी लाज राहिली असती? रुक्मी सगळ्यांचा जीव दिसला तुझ्यावर. सासर सुखाचे वाटले. कसं?” आई विचारत होती. मला आश्चर्य वाटले. आई कधीच असला प्रश्न विचारायची नाही असेच समजले होते.

“इनामदारांचं सुखय मोठं आणि दुःखय मोठं. आणि दुःखा शिवाय सुख अळणीच गे. आता मला लगीन करून पाठवलत तर सासरचे सुखय माझे नी दुःखय माझे. सांगून काय बदलणार?” मी बोलले तशी आईच्या चेहेऱ्यावर एकदम समाधान पसरले.

“असं कां बोलते गो? काय दुःख आहे तुला? सांगून टाक मन हलके कर.” माय.

“गे माय, सुख..दुःख तर सगळ्यांनाच असतं म्हणतेय गे. म्हणजे मला मोठं दुःख आहे असं समजू नको. आणि असलं तरी तुला सांगून दुःखी कशाला करू. तू काय नीरवायला येणार?” मी.

आईचा हात चटकन माझ्या डोक्यावर आला. मायेने केसातून फिरू लागला. हंसऱ्या चेहेऱ्याने माझ्याकडे पहात बोलली, “रुक्मे, असाच विचार ठेव गो. तुला दुःख आलं तरी भिजवणार नाय आणि तुझ्यापासून कोण दुखावणार नाय. किती शाणी झाली माझी पोर. सगळा उपदेश अंगात उतरवलान गो मधलेबाय. आता कितीय विचारलंस तरी सासरची एकय कागाळी येणार नाय तुझ्या कानावर.”

मला समजले आईने माझी परीक्षा घेतली होती. मग गाडीतच आडवी झाले. गाडीच्या धक्क्यानी काहीच सुखकर वाटत नव्हते. अडीच तीन तासाचा प्रवास होता. आत्ता कुठे अर्धा तास झाला होता. आडवी झाले तर पाच मिनीटांत उठून बसले. पोट हलले की जीव घाबरा होई. त्यापेक्षा बसलेले बरे वाटे. बसले की पाय भिरभिरत, मुंग्या आल्यासारखे होई. जीव अवघडतो म्हणजे काय ते समजत होते. आईचा हात डोक्यावरून फिरत होता. माय पाय दाबत चोळत होती. मी नको म्हटले तरी ऐकत नव्हती. खरे सांगू? मला अतीव सुख म्हणजे काय ते समजत होते आणि गाडीचे धक्के सुसह्य होत होते. मधेच गप्पा, मधेच खाऊ पिऊ चालले होते.

आईने मग शाम दादाला विचारले “गुरू आला नाय तो काय रुसवा फुगवा नाय झाला ना? कोण काय बोललं नाय ना?”

“नाय गे! तस काय नाय, रुक्मीला आणायचं तर माझाच डोळा लागेना रात्रभर. निघायची वेळ झाली तरी गुरू उठेना. दोनदा उठवलं तर माझ्यावर ओरडला. तू जा, इतक्या फाटपटी मी नाय जाणार. दुपारी पोचलो तर काय झालं?” मग बोथान मारून निजला. मी जोडली गाडी मग.” माझ्या मनात आले किती फरक? एक सख्खा भाऊ, दुसरा चुलत पण माया जास्त दुसऱ्या भावाचीच. जबाबदारीची जाणीव, कळकळ त्यालाच. सख्खा झोपतोय. बहिणीची, आईची, मायची जरा पण कदर नाही. असा कसा फरक? एकाच घरात वाढलो, त्याच माणसांत वावरलो, संस्कार सगळे तसेच झाले. पण वागणुकीत केवढा फरक. पुर्वजन्मीचे संस्कार घेऊन जन्मतात काही माणसे हेच खरे.

घुंगरांची खणखण आता लयीत चालली होती. बसल्याच डुलकी यायला लागली आणि आईने अलगद डोके खांद्यावर घेतले. मी सुखाने तिच्या खांद्यावर विसावले. माय जागा बदलून पुढ्यात बसली व माझे पाय लांब करायला लावून तळव्याना हळूवार चोळू लागली.

असाच वेळ पळाला. घर आले. सगळे उतरले. मग आईने अगदी अलगद उचलूनच मला उतरवले. घरच्या दारात सगळेच उभे होते. सुमी धांवत येताना दिसली. दुसऱ्या क्षणी

तिने पायाना मिठी मारली व मी चालायची थांबले. तिचा हात पकडून मी घरी निघाले. किती तरी प्रश्नांच्या फैरी ती माझ्यावर सोडीत होती. मी उत्तरे देत होती. दारांत पोचले तोच छोट्या काकीने ओवाळून घरात घेतले. ओटीवरच आजोबा बसले होते. सगळयांना सोडून मी पहिली त्यांच्याकडे गेले. एकदम हमसून रडायची त्यांनी सुरवात केली. मला पण आवरले नाही. मी त्यांच्या पाठीवर हात ठेवून बसले होते. दोघांच्याही डोळ्यातून धारा लागल्या होत्या. निःशब्द होऊन दोघही एकमेकांचे दुःख वाटीत होतो. त्यांना मिळालेला एकटेपणा व मी हरवलेले अंत्यदर्शन ही दोन्ही आम्हाला कायम दुःख देणार होती. अर्ध्या तासाने ते हळू हळू शांत झाले व मी पण. मग आई आली. व मला म्हणाली "चल गो जरा हातपाय धुवून जेवून घे नी मग बस आजोबांकडे."

"जा गो बाय जा. दमली असशील. खाऊन पिऊन घे. जन्म मरण चालतच रहाणार गो. जाणारे जातात. मागे रहातात ते आठवणी काढतात. जा जेव नी मग सावकाश ये." एक उसासा देत आजोबा म्हणाले.

मी हळू उठून आईच्या मागे निघाले. मोठे आजोबा गेलेले, मी नव्याला जन्म द्यायला आलेली. जन्म मृत्युचे चक्र समोरच दिसत होते. विचारांतच चालत जेवायला पोचले. छोट्या काकीने सुंदर बेत केला होता. मला एका बाजूला पान वाढले होते ते बघून सुमी आपले पान सरकवत माझ्या शेजारी आली.

"मी रुक्मीतायकडेच बसणार." जोरांत फुरंगटल्या सारख्या आवाजात तिने सगळयाना दम मारला. मी तिला जवळ घेत बोलले "हो गो बाय. बस हा रोजच बस." मग कळी एकदम खुलली. आई बाजूला बसून पहात होती. छोटीकाकी चटपट करीत वाढत होती. खरंच सगळे जेवण चवदार झाले होते. मी पटकन बोलून गेले "काकी जेवण छान केलेस हो."

"मग मला येतं ना जेवण? मधलीन कधी चूल दिलीच नाय माझ्या हातात." काकी

माय हसत  बोलली "मग असं कर, चुलीकडचे तू बघ आजपासून मी तुझं काम करीन."

"नको गे बाय धगीकडचे काम. माझं काम बरं आहे." काकीन आपला पाय काढता घेतला.

आई आणि माय हसत  होत्या, सगळी मुलं एकमेकांशी बडबडत मजा करीत जेवत होतो.

बरेच दिवसानी मला गोकुळात परत आल्याचा भास होत होता. इनामदारांच्या घरची शांतता इथे नावाला देखील नव्हती. या सगळ्या आवाजात मी बऱ्याच दिवसानी डुंबत होते. केवढे समाधान वाटत होते. लहानपणापासून या आवाजातच वाढले होते. असेच सगळे बडबडत एकमेकांच्या कळी काढत जेवलो होतो. एकदम लक्षात आले, शेवटच्या सोलकढी भाताला आम्ही जोरजोरांत भुरके मारायचो. कुणाचा भुरका मोठ्या आवाजाचा ते बघायचो. सोलकढी भात आला तसा मी जोरांत भुरका मारला. सगळ्यांकडे पाहिले. त्यांना समजले आणि सगळेच जोरांत भुरके मारू लागले. आईनी मला दम मारला "रुक्मे तू नको मारू भुरका, पोटावर जोर येतो." मी गप झाले पण बाकीच्यांचे चालूच होते.

जेवण संपवून जरा आडवे झालो त्या वेळी माय बोलली "थोरली जावबाय, शारदा नी सुधा दोघांच्याय सोयरीकी आल्या, वैशाखात लगीन घेणार की रुक्मी आहे स्तवर करून घेवूया सरायवर? राहील म्हयनाभर जास्त."

"दोनय भयणींचं एकदम करणार? सोयरीक कुठची?" मी एकदम विचारले

"रुक्मे, एकाच मांडवात करावं लागणार. एकाच घरात जाणार गो. सुधा मोठ्याला नी शारदा ल्हानाला. समोरून मागणी घातलीय. फोंड्या जवळच्या गावचे खोत आहेत. दोनच भाऊ आहेत. राम लक्ष्मणासारखे. एकाच घरातून बहिणी आल्या तर भांडण नाय होणार भावांत. हा त्यांचा विचार. सुधा नी शारदा नायतरी गळयात गळे घालूनच असतात." माय भडाभडा सांगत सुटली.

किती सुंदर! लग्न झाले की एकमेकांच्या सहवासात रहाणार. तशी सुधा व शारदा अगदी सरळ, प्रेमळ बहिणी. छान संसार करतील. एकमेकाना सांभाळतील. आईची शिकवण असणारच दोघीना. मग एकदम मनातच हसू आले. विचार आला लग्ना आधी आई काय दोघानाही एकदम घेऊन झोपणार? दोघीना एकदमच लग्नाचा अर्थ समजावणार? तेवढ्यात माय पुढे बोलली,

"शामचंय लगीन मग आठ दिवसानी करायचं. त्याचीय सोयरीक बघतायत. मग पयली सून येणार घरात."

मी सगळे ऐकत होती. खरंच यानी बाळंतपणाला जोडून लग्न घेतलं तर मला महिना दीड महिना जास्त रहावे लागेल. तिकडे तर सगळीच अडचण, मग एवढे राहायचे तरी कसे? नंतर लग्न घेतले तर चार दिवसांसाठी परत येता येईल. मनातल्या या विचारानी मलाच हसू आले. एवढ्या कमी दिवसांत मी इनामदार झाले. लग्नापूर्वी ते संभाळत होते

मग आताच का वाटते, आपल्या शिवाय कसे होईल म्हणून? लग्नानंतर सगळीच जबाबदारी अंगावर आली.

शामचे लग्न झाले तरी तिच्यावर काही अशी जबाबदारी पडणार नाही. आई आहेच. घरे वेगळी झाली तरी आई सुनबाईला व्यवस्थित काम समजावणार. पण सगळी जबाबदारी आईवरच राहाणार.

सुमी झोपत नव्हती. सारखी बडबडत होती. माझा देखील डोळा लागेना. मग सुमीला घेऊन आजोबांकडे गेलो. सुमी आजोबांच्या मांडीत जाऊन बसली. त्यांना बरे वाटले. मग मी बाजूला बसून त्यांच्याशी गप्पा मारायला सुरवात केली. आजोबांशी बोलून त्यांचे मन दुसरीकडे वळवायचा प्रयत्न करीत होते. नाहीतर एकटे बसले की मोठ्या आजोबांच्या आठवणीत गढून जायचे. मग थोडी चिडचीड करायचे.

"आजोबा, आपल्याकडे नारळ सुपारीची झाडे कमीच. इनामदारांच्या तीन तीन बागा आहेत नारळ सुपारीच्या."

"गो, आपण वरच्या भागातले, वलाट पट्टीतले. पाणी कुठे आहे नारळ सुपारीला. पाणी पिणारी झाडं ती. तुजे इनामदार खलाट पट्टीतले. तरीत पाणी असतं बाराय म्हयने." आजोबा

"खर आहे. सगळया बागा तरीच्या कांठानेच आहेत. इनामदारांचा वाडा पण चारी बाजूने झाडानी घेरलेलाच आहे. सगळीच झाडे आहेत. फुल झाडे, फळ झाडे, साग, ऐन, कुंभया, असली जंगली झाडे पण आहेत. घरातून निघालं तर पाठच्या फाटकात पोचायला दोन घटका लागतात, इतके मोठे परडे." मी बडबड चालूच ठेवली.

"इनामदारांना मी ओळखतो चांगलं. तुझ्या नवऱ्याचे तीन काका होते. पहिले तिघे निपुत्रीक. धाकल्याला एकच मुलगा तो भाऊसाहेब. वाद अगोदरय होतेच. आबासाहेबाला मोठ्याने दत्तक घेतला. दोन मधले काका नी धाकले भांडत. मग काय धाकल्या काकाला दत्तक मान्य नव्हता. भांडणे सुरू झाली. बंदुकी काढल्या गो भावाभावांनी. मग कोर्टांत केस गेली नी धाकला हरला. दत्तक मान्य झाले. मग भांडणे कायम होऊ लागली. धाकल्याने सगळ्याच भावांना व पुतण्याला दुखावले. मधले दोन्ही काका निपुत्रीकच. मोठे वारले. मग काय तुझ्या नवऱ्यावर दोन काका काकी सगळ्यांना सांभाळायचे आले. त्या दोघांनी आपला भाग पण तुझ्या नवऱ्याला दिला. भाऊसाहेबाचा बाप चवताळला. भांडण वाढतच गेले. तुझ्या आबासाहेबात व भाऊसाहेबात हेच वितुष्ट गो. आम्ही गेलेलो समजूत काढायला. जातवाले ना. पण जुनी रक्तात उतरलेली भाडणं

काय समजवणार त्यांना. मुळावर उठलेत एकमेकांच्या. सांभाळून ऱ्हा गो तू. तुझ्या बापाने सोयरीक केली तेव्हापासून मोठा नी मी बोलू, कशाला इनामदारांच्या आगीत ढकलतोय पोरीला. पण इस्टेटीचा लोभ गो तुझ्या बापाला. पण मला सांग, तुला काय त्रास नाय ना? भांडण नाय ना तुझ्या बरोबर? संभाळून ऱ्हा गो पोरी.''

सगळा इतीहास का सांगत होते त्याचा उलगडा झाला. माझी प्रेमापोटीची काळजी. दोनदोनदा सांभाळून रहायला सांगत होते. आमचे सगळेच असे एकमेकांवर माया करणारे.

''मला काय त्रास नाय. उलट विजूताईची, भाऊसाहेबांच्या बहिणीशी माझी चांगली मैत्री झालीय. भाऊसाहेबांचा त्रास वाटत नाय. भागेल्यांना फोडीत. ते मी काम बघायला लागल्यावर बंद केलनी. आता मी नसले की कायतरी करतील थोडे, पण भांडण नाय होणार.'' मी

''बरं वाटलं गो पोरी. भांडण करूच नको. जमलं तर वाद संपव.'' आजोबा.

मला खूप बरे वाटले. माझ्या मनातलेच बोलले आजोबा. मला त्यांचे आशीर्वाद आहेत मग भिती  कसली?

मी नेमाने सकाळ संध्याकाळ अशा गप्पा मारू लागले आणि ते खूप निवळले. माझे दिवस पळत होते. दसरा झाला व सराईच्या कामांची झुंबड उडाली. भात कापणी सुरू झाली. सगळे त्यांतच गुरफटले. मी, आजोबा आणि सुमी एवढेच मोकळे होतो. एकमेकांचा वेळ गप्पा मारून घालवत होतो. सुमी सगळ्यात लहान. आजोबा तिला शेंडेफळ म्हणायचे, फार लाड करायचे. कधीही पाहिले तर आम्ही तिघे ओटीवर गप्पा मारत बसलेले दिसू. बाकी सगळे घर पळा पळ करीत कामे उरकीत होते. आई म्हणे आठ दहा दिवस काढ गो पोरी. कापणी संपून भात तट्ट्यांत गेले की मग बाळंत हो. मग आम्ही मोकळे असणार.

चांगले दहा बारा दिवस गेले. कामे संपून चार दिवस वर झाले होते आणि मला दुपारी पोटांत कसेसेच वाटू लागले. मधूनच कळ येवू लागली. आईला बोलल्या बरोबर धांवाधांव सुरू झाली. शामला बोलवून सुईणीला आणायला पाठवले. मला बाळंतिणीच्या खोलीत नेऊन पलंगावर झोपवले. बाजूला पाळणा तयार करून कोपऱ्यांत सरकवला. बाळंतपण झाल्यावर लागणार होता. आता मधेच अडचण नको म्हणून आई बडबडत होती. सगळीच धावपळ सुरू झाली.

सुईणबाई आली म्हणाली, रात्री उशीरा बाळंत होईल वेळ आहे अजून. चांगली पहाटे चार वाजता सुटका झाली. जीव कासावीस होऊन गेला होता. गरम गरम खिरीने जरा ताजे

झाल्यासारखे वाटले. मग एक एक ऐकू येवू लागले. पोरगी झाली, गोरी गोरी आहे, नाक बघा धारदार आहे, लक्ष्मी आली.

कधी आई, कधी माय तर कधी छोटी काकी बोलत होत्या व मला समजत होते. बाळ खणखणीत आवाजात रडत होते. दोन तासानी बाळाला माझ्याकडे दिले तेव्हा ते गप्प झोपून गेले होते.

आई व माय सबंध दिवस धाव धाव करून माझी बडदास्त ठेवत होत्या. काय काय खायला देत होत्या. प्यायला देत होत्या. बाळाला जवळ देऊन अंगावर घ्यायला शिकवत होत्या. मी एकदा म्हटले “इनामदारांना कळवा, सासूबाई वाट बघत असणार.”

“आत्ता नाय! पांचव्या दिवशी सटवीन ललाट लिहीलेन मग पाठवू निरोप.” आईने संगीतले.

गुरू सांगयला गेला तर इनामदार त्याच्याबरोबरच आले. मुलीला बघून चेहेरा हंसरा झाला. मग हळूच म्हणाले, “आई आणि काकूंना मुलगा पाहिजे होता. पण आम्हाला काहीही चालणार होते. तुम्ही सुखरूप आहात, बाळ सुखरूप आहे हाच आनंद आम्हाला” जेवून दोन घटका बसून ते परत गेले देखील. सगळे रहायला सांगत होते पण आई व काकी एकट्या नको पडायला रात्रीच्या असे म्हणून निघाले.

मला बरे वाटले. मुलगी झाली की नाकं मुरडायचे दिवस, पण ह्याना आनंद झालेला बघून मी सुखावले.

माहेरचे दिवस झरझर पळाले. सव्वा महिना झाला. देवळांत जाऊन आलो आणि मी लकडा लावला आता जायला पाहिजे. नाहीतरी लग्न तुम्ही वैशाखांत घेतलीत तेव्हा येईन. पण माय म्हणाली तुझ्या मदतीला कोणी नाही. आम्ही तुझ्याकडे येऊन रहाणे शक्य नाही. मग कामे बघशील की मुलीला सांभाळशील? पण मला घरची चिंताच लागून राहिली. आई हसत  हसत  म्हणाली “पोर खरी संसारात रमली गे. संभाळील ती सगळं. जाऊ दे तिला. सगळं समजावते मी बाळाचे शीकपण ओळखायला, कुठची औषधे कशावर ते सांगते बरोबर. मग जाऊदे तिला दोन चार दिवसांत चांगला दिवस बघून पाठवणी करुया.”

सगळी बांधाबांध करून दिवस बघून सकाळीच गाडीने निघालो. मी, बाळ व वैशाली. आईने वैशालीला मुद्दामच बरोबर दिले. म्हणाली “सास्वा म्हाताऱ्या, त्यांना धांव धांव नको. हातधोंडा म्हणून वैशालीला ने म्हयनाभर.”

वैशालीला तर आनंद झाला. सुधा व शारदाचे लग्न होणार व शालिनी कामासाठी लागणार, म्हणून वैशालीचा नंबर लागला. वैशाली खूप चुणचुणीत मुलगी होती. बोलण्यात पण लाघव, म्हणूनच आईने तिला बरोबर दिले असणार. यावेळी गुरू पोचवायला आला. बैल त्याला छान हाताळता येत. गाडी छान चालवी. लवकरच पोचलो.

घरी सगळे वाटच पहात होते. सवाष्ण बाईने ओवाळून घरात घ्यायची प्रथा कशी सांभाळणार याची मला काळजी वाटत होती. मग भटीण जेवण करायला यायची तिला सासूबाईनी सांगीतले. आम्ही घरात गेलो. बाळ बघायला एकच गर्दी केली सगळ्यांनी. सासूबाई व काकीसासूबाई तर समोर मांडीतच घेऊन बसत होत्या. कामवाल्या बाया पण येवून बघून जात होत्या.

थोड्याच वेळात विजूताई लगबगीने आल्या. बाळाला मांडीत घेऊन निरखत म्हणाल्या "गोड, गोरीपान आहे गो तुझी पोर. तुझ्या सारखीच होऊ दे गो." मला कोडे पडले विजूताई इकडे कशा? मी विचारताच म्हणाल्या "म्हणजे तुला म्हाईत नाय? भाऊसायबाने लगीन केलेन. काल पाच परतावनाला गेलाय. आत्ता येईलच. वैनीला जरा काम समजावचे म्हणून मी थांबलेय आठ धा दिवस. नी तुलाय मुलीबरोबर बघायचे होते. बघू भाऊसायब अजून आठ धा दिवस जाऊ नको म्हणतोय. राहीन तो सांगेल तेवढे."

मला एकदम धक्का बसला. असे नकळत लग्न कसे केले? आपल्या घरून कोणाला लग्नाला बोलावले की नाही? कोणी लग्नाला गेले की नाही? कित्येक प्रश्न मनात काहूर उठवायला लागले.

विजूताई आता वैशालीशी बोलत होत्या. माझी बहीण म्हणून त्या अगदी जवळीक दाखवत बोलल्या व त्यांचे छान जमले. थोड्या वेळातच विजूताई गेल्या. मी काकीसासूबाईना विचारले, आपल्या घरून कोणी लग्नाला गेले की नाही?

"आमाला बोलावले नाय. सगळं गपचूप केलन. बाहेरून समजे लगीन ठरवलेन ते. पण कधी काय ते म्हाईत पडायला नाय दिलन. आमी काय मोडता घालणार होतो?" काकीसासूबाई बोलत होत्या. पुढे सांगीतले ते ऐकून मला आश्चर्य वाटले.

"अगो तुला मुलगा झाला तर! म्हणून जळत होता, मुलगी झाल्लेली ऐकून फटाकडे फोडलेन. अरे! पयलीच मुलगी झाली मग काय मुलगा होणार नाय? मनच मेल्याचे वशाड. ह्याचे भले कसे होईल."

पोटतिडकीने बोलणाऱ्या काकीसासूबाई उसासत गप्प झाल्या. मी मात्र विचारात गढले. कसा असा दुस्वास करतात माणसे? काय मिळते त्यांना दुसऱ्याचे वाईट चिंतून? पण माझे काहीच वाईट? झाले नव्हते. मुलगी झाली हे काय वाईट. विजयाताई ही त्यांची मोठी बहीणच होती ना? मग पटकन बोलले "अहो पण विजयाताई त्यांची मोठी बहीणच ना? मग हे जन्मलेत."

"तिथेच त गोम आहे, विजया जन्मली तेवा आमच्या घरात फटाकडे फोडलेले, आता भाऊसायबाने दिवाळी केलीन. इनामदारांची भाऊबंदकी एक सणच झालाय. दुसरं काय?" काकीसासूबाई.

आपण लग्न होऊन यायच्या अगोदरचा कितीतरी इतिहास मला माहीत नव्हता. होता तो सगळा दुश्मनी वाढवणारा होता. मला ती कमी करायची होती. कमी कशाला संपवायचीच होती. या पुढे कुणाकडूनही मागचा इतिहास ऐकायचा नाही. आपल्या मनात तो ऐकून ऐकून अढी बसली तर हे काम शक्य नाही. गप्प बसून होते. एवढ्यात माली उठली. हो मुलीचे नाव यांनी मालिनी ठेवले होते. जवळ घेऊन तिला शांत केली तर वैशाली येऊन तिला घेऊन गेली.

कामे पहायला मी मोकळी झाले.

असेच दिवस चालले होते. मधेच विजयाताई येत, बोलत. पण जास्त करून वैशालीशीच गप्पा करीत. त्यांची फारच मैत्री जमली होती. त्या नेहमी वैशालीला म्हणत मधून त्यांच्या घरी बोलवीत. वैशाली हो सांगे, पण जात नसे. विचारले की त्यांना सांगे "येणार होते वो, पण माली रडू लागली तिला फिरवत बसली." मी ऐकून समजत होते. ही शिकवण आईचीच असणार. आईने सांगीतले असणार. मला वैशालीचे कौतुक वाटले. आईची शिकवण ती छान पाळत होती. ती देखील कुणालाही न दुखवता. मनी हसू आले. आई किती छान पेरणी करते मनात. तिच्या सांगण्याबाहेर आम्ही बहीणी कधीच वागत नसू. बरे! बोलण्यांत धाक जरा पण नसे. पण तिने सांगीतल्या विरुद्ध वागणे कुणालाही बरोबर वाटत नसे. वैशाली तर आईची मुलगी, सगळे गुण आईंचेच दिसत होते.

एक दिवशी विजयाताई आल्या, तीन आठवडे झाले उद्या निघणार. निरोपाचेच सांगायला आल्या होत्या. वैशालीला म्हणाल्या "एकदाय यायला नाय ना तू माझ्याकडे! आता मी पण नाय ओळख दाखवणार." पटकन वैशाली माझ्याकडे बघत विचारू लागली "रुक्मीताय पटकन जावून येते. बगशील मालीला? ताईचं खरं आहे त्या दररोज येयात मी एकदाय नाय जायला. बरं नाय ना वाटत असं. ही गेले नी ही आले बघ."

मी हसत  होकाराची मान हलवली आणि दोघी अगदी हातात हात घालून निघाल्या. एक लग्न झालेली वीस बावीस वर्षांची तर दुसरी दहा वर्षांची. पण मैत्री केवढी गाढ झाली, ती देखील गेल्या काही दिवसांतच. वैशालीचे बोलणे देखील लाघवी. कामाला येणाऱ्या बाया पण तिच्याशी दोन शब्द बोलल्या खेरीज जात नसत. वागण्या बोलण्याने माणसे कशी बांधली जातात हे सुंदरपणे पहात होते. असेच जर सगळे वागतील तर कुटुंबात केवढा एकोपा राहील. भांडणेच व्हायची नाहीत. स्वतःच्याच विचारात किती वेळ गुंगले होते देव जाणे. वैशाली आणि विजयाताई परत हसत  खिदळत हजर झाल्या.

“रुक्मीताय! हे बघ काय काय मला दिलेन विजूताईन. मी नको नको म्हटलं तरी पिशवीत घालून दिलेन बघ.” वैशाली सांगत होती.

“मग देणारच ना! मला गोड धाकली बहीणच वाटलीस गो तू.” विजूताई

“आणि रुक्मीताय! नव्या वैनीलाय भेटवलन गे. चांगली हंसरी आहे. पण इथे यायला नाय म्हणाली मी बोलवल तर.” वैशाली.

“ती काय येणार! हुकूम आहे ना शेजारी संबंध ठेवायचा नाय म्हणून. मी नाय जुमानत हुकूम. सरळ सांगते, मी मोठी आहे, तू ल्हान. मी काय करायचं ते तू नाय सांगायचं. गप ऱ्हातो तो. पण ती पडली याची बाईल. काय करील ऐकायलाच पाहीजे.” विजयाताई

मग वैशालीने सगळी पिशवी उलटी करून दाखवायला सुरवात केली. चार पांच रंगाच्या रिबीनींची रीळे, निरनिराळ्या रंगांच्या बांगड्या, केसांच्या पिना आणि एक परकर पोलक्याचे कापड तिने दिले होते.

“विजूताई काय हो इतके कशाला दिलेत? सगळ्यांनाच अडचण होईल. सबंध कसे. तुम्हाला बोल लागेल.” मी बोलले.

“हे कायच नाय. मला जमले असते तर तुलाय काय काय दिलं असतं वैनी. पण सबंध तसे नाय ना दोनय घरांचे. मला म्हाईत आहे. तू ते सुधरवायला बघतेस. त्यांत तुला यश मिळू देत गे. मग बघ तुझी पूजाच करीन मी.” विजयाताई.

विजयाताईने माझे मन बरोबर ओळखले होते. हेच भाऊसाहेबानां वाटले असते तर? विचार मनात आला न आला तोच विजया ताई बोलल्या, “कसे होईल देव जाणे, भाऊने बायकोला दम मारलाय, बाजूवाल्यांशी संबंध ठेवलास तर जीव घेईन म्हणून. त्याला समजलेय, तू तिच्याशी मैतर करणार ते. केवा देव चांगली बुद्धी देईल त्याला? पण वैनी चांगली आहे गे. गरीब आहे.” एक सुस्कारा टाकत विजयाताई उठल्या व गेल्या. माझ्या

मनात होतेच. लवकरच शेजारच्या नव्या जाऊबाईंची मैत्री करायची. पण ते काम कसे अवघड आहे याची कल्पना विजूताई देऊन गेल्या.

दिवस मास मागे पडले होते. माझी पूर्वीची कामे मी सांभाळली होती. आता ती सर्व मालिनीला सांभाळत करावी लागणार होती. दोन दिवसांत कोणीतरी येऊन वैशालीला घेऊन जाईल मग सगळेच करावे लागणार.

पण मधेच काही गोष्टी लक्षात यायला लागल्या होत्या. आबासाहेब काहीतरी दडवतात असे वाटे. काकीसासूबाई सुस्कारा टाकून म्हणत "घराला कीड लागायला वेळ लागत नाय. बघ गे बाय कसं सांभाळशील ते. इनामदाराना कोण बोलत नाय तर ते व्हावत जातात असे." मला याचा अर्थ समजत नव्हता.

सकाळी मी दूध काढणे, न्हाणी पेटवणे, सारवण असल्या कामांवर देखरेख करायला घरच्या मागच्या बाजूलाच असे. मग सगळे आटपून आबासाहेबांचा चहा घेऊन जात असे. हल्ली एकदोनदा आबासाहेबांचा चहाचा कप जसाच्या तसाच होता, प्यालेच नव्हते. विचारले तर चहा नकोच म्हणाले. काम करीत बसल्यामुळे मी जास्त न बोलता कप घेऊन निघून आले होते.

एक दिवशी सकाळी मागे न जाता मी पुढच्या बाजूला फुले आणण्यासाठी निघाले. मांडवकर भागेल्याचा रख्या हातात काहीतरी घेऊन माडीवर जाताना दिसला. काय नेत होता समजले नाही. माझी नेहमीची कामे आटपून मी चहा घेऊन वर गेले. हे कामात बसले होते. केव्हा उठले होते समजले नाही. पूर्वी पेक्षा बदल झालाय जाणवत होते. पण काय तो समजत नव्हता.

मी सहज विचारले, मांडवकरच्या रख्याला बोलावलेत? काय केलेय मांडवकरने? भागेल्यांचे व्यवहार मीच सांभाळत होते. प्रश्न निरर्थक नव्हता. इनामदार मात्र जोरात म्हणाले "आता आमच्या कचेरीत पण लक्ष घालणार का? माझे एक काम असते त्याच्याकडे, म्हणून तो येतो. आपण लक्ष घालू नये."

पहिल्यांदाच मला असे तुटक बोलणे ऐकू आले. जरा धास्तावले. खाली आले व सासूबाईना चहा देताना तिथेच बसले. सकाळी कामाची धांवपळ सोडून मी बसले कशी, म्हणून काकीसासूबाई विचारू लागल्या. मी बोलले "सकाळी मांडवकराच्या रख्याला माडीवर जाताना बघीतलं विचारल तर सरळ उत्तर नाय दिलं. मांडवकराशी भागावरून काय झालंय काय?"

“तेच लवकर थांबव रख्या येता नये. मुतायला बरोबर होत नाय कारण गो. पाणी पी म्हणावं गोलीभर. होईल मुतायला भसाभसा. पण ते मडके नको. दरीद्र आणील घरात.” पोट तिडकीने काकीसासूबाई बोलल्या. मागून सासूबाईंचा हुंदका आला. मला अंधुकपणे संकटाची चाहूल लागली.

सगळी कामे विचारातच करत गेले. संध्याकाळी बाहेर पडले. भागेल्यांकडे जाते म्हणून सांगीतले. एका पैरेकरणीला बरोबर घेतले. मालीला कडेवर घेऊन ती माझ्याबरोबर निघाली.

मांडवकरवर, पहिलाच पडाव घेतला. सुपारीचा ढीग खळ्यांत पडला होता. मांडवकर मला बघून चपापला पण सांवरत म्हणाला “मी येणारच होतो. कालच पाडाप संपवलय, ह्या सुपाऱ्या घालायला येणार होतो. तुमी का आलात?”

मांडवकरला मी ओळखत होते. आमचा भागेली असून देखील भाऊसाहेबांची तरफदारी करणाऱ्यांचा तो म्होरक्या होता. मग मी व्यवहार पाहू लागल्यावर सगळे भागेली सरळ झाले. हा सर्वांत शेवटी सरळ झाला. एक मोसम भागाचा हिशोब त्याच्या खळयावर केला तसा निमूटपणे सरळ हिशोब देवू लागला.

“रख्याला बोलव, सुपारी मोज आत्तांच. ल्हान पोराला घेऊन परत परत यायला नाय होणार मला.” या वेळी माझा आवाज जरा चढाच होता. रख्यातर माझ्या समोर ययला तयार होईना. मग मांडवकरने दम मारल्यावर आला. सुपारी मोजून भाग करू लागला व मी मधेच विचारले.

“रख्या, सकाळी सकाळी काय घेऊन येतोस इनामदारांकडे?”

रख्याची त त प प उडाली मग कसाबसा म्हणाला “आमचे धनी पाठवतात इनामदारांकडे, ताजी ताडी असते. बाकी काय नाय.”

मांडवकर आता उठून जायच्या मार्गावर होता. मी हटकले “काय मांडवकर! काय म्हणून ताडी पाठवतां? ताडीत भाग मागीतला कधी इनामदारानी? बंद करा ताबडतोप.” मी गरजले

“आमी रयत वो तुमची. इनामदारानी मागवलानी, त्रास आहे म्हणून. आमाला आयकायला नको? काय करणार तुमीच सांगा?” मांडवकर कांगावा करीत बोलला.

“मी बघीन काय त्रास आहे तो. उद्या पासून मडके पाठवायचे बंद करा.” मी परत इनामदारणीच्या अधिकारात हुकूम सोडला.

“इनामदारानी सांगावा पाठवलानी तर? आमी काय सांगायचं त्यांना?” मांडवकर

"माझा नाव पुढे करा. सांगा मी सांगीतलय म्हणून." मी

मांडवकर आता गप्प झाला. सुपारीचे वांटप कसेबसे पुरे करून रख्या घाम पुसत सटकू लागला.

"रख्या संध्याकाळच्या आंत सुपारी वाड्यावर पाठव. सकाळी कधीच वाड्यावर दिसता नये तू" मी.

माली कुरकुरत होती तिला घेतले व घरचा रस्ता पकडला. माझी वसुली झाली होती. विचारात होते. मी कधीच चढ्या आवाजांत न बोलणारी, मांडवकरला दम कसा काय मारला? आईची आठवण झाली. नाही पटले तर अबोला धरायचा. पण लागट बोलायचे नाही. मग अशी कशी बोलले मी? पण अबोला आपल्या माणसांवर चालेल. कधीतरी भेटणाऱ्या नाठाळ भागेल्यांशी अबोला काय कामाचा?

"ताई! बरं झालं. मांडवकराला झाडलात ते. गावची घाण आहे तो. ताडीच नाय, दारूची भट्टीय लावतो तो." पैरेकरीण सांगू लागली. "पयल्यांदा फुकट पाजतो, मग पैशे, नारळ, सुपारी, केळी सगळं घेऊन जातो. भिकेला लावतो बघा एकएकाला."

मी हुंकार भरत होते काय करायचे ते मनात ठरवत होते. वाटेत भागेली भेटत ते नमस्कार करीत. मी मान हलवत होते पण बोलत नव्हते. काही ठाम निर्णय मनात पक्के होत होते.

भाऊबंदकी मिटवण्याची लढाई व घरी आलेले संकटाचे सांवट दोन्ही वर एकदम लढताना फार कठीण पडले असते. पहिले घर ठीक करायचे. मगच भाऊबंदकीची लढाई जिंकायची. मत बनत होते. काय करायचे याचा आराखडा तयार होत होता. घरचे संकट सांभाळताना कलह होणार नाही याची काळजी घ्यायची होती. पण तरीही कुटुंबासाठी चांगला म्हणून आपला अट्टाहास सोडायचा नव्हता. प्रसंगी आईने सांगीतलेला अबोला वापरायचा. प्रसंगी समजूत काढणे वापरायचे. केव्हा आपले मत उघडपणे मांडायचे. इनामदारांचे रीतीरिवाज पटत नसतील तर त्यांना समज देत सुधरवायचे. खोट्या मोठेपणाचे अवडंबर तोडून काढायचे. मन आता थोडे शांत होत आहे. निश्चय झाला की अर्धा मार्ग सांपडतो म्हणतात. तसेच झाले. निश्चय झाला आता कृतीत उतरवायचा. इनामदाराना पहिले जबाबदार गृहस्थ बनवायचे मगच भाऊबंदकी संपवता येईल. आपले नाणे खणखणीत वाजणारे असले तरच आपल्याला बळ येणार. विचारातच घर गांठले. माली पेंगुळली होती तिला झोपवले व माडीवर निघाले.

*****

## १०

## आबासाहेब-

आत्तांच ही येवून गेली. म्हणाली मांडवकरकडे हिशोब करून आली. भागाच्या सुपाऱ्या संध्याकाळ पर्यंत येतील. घरी अडचण नको. दोन दिवसांत व्यापाऱ्यांना देऊन टाकण्यास सांगीतले. मनात आले मी इनामदार की ही? पण तिचेही खरेच होते. जवळ जवळ सगळी सुपारी घरात आली होती. विकली तर घरातील अडचण जाणार हे ही खरेच. घर नीटनेटके सांभाळते म्हणून काकी म्हणत होत्या. तिला सगळेच मान देतात. हो ती देखील इनामदारीण आहे. पण म्हणून काय आमच्याही वर इनामदारीण म्हणून राज्य करणार?

जाता जाता काय म्हणाली, रख्या येणार नाही उद्यापासून काय होतेय ते सांगा. दुसरे खूप साधे उपचार आहेत. मग बोलायला वाव न देताच निघून गेली.

आम्ही इनामदार आहोत. आम्ही काय आमच्या मर्जीचे उपचार आमच्यावर करू शकत नाही? सांगीतलेच पाहिजे नाहीतर डोक्यावर बसेल.

हो पण आता रख्या नाही आला तर? हल्ली सकाळी जरा ताडाचे नीरपाणी पोटांत गेल्याशिवाय चैन पडत नाही. रख्या नाही आला तर आपण जाणे प्रशस्त नाही. इनामदार भागेल्याबरोबर बागेत ताडी प्यायला जातात हे गावात समजले तर किती कमीपणाचे? कसे समजत नाही हिला? समजावलेच पाहिजे. आम्हाला न विचारता रख्याला यायचे बंद कां केलेत असे खडसावून विचारलेच पाहिजे.

जमेल विचारायला? एवढ्या दिवसात ओळखणे जमले नाही. काकी नेहमी गुण सांगत असतात. सर्वांना आपलेसे केले आहे तिने. एवढेच काय शेजारच्या विजयाला पण मैत्रीण करून टाकलेय. कधी कुणाबरोबर वाद नाहीत की चढा आवाज पण ऐकला नाही. सगळीच कामे कशी सहजपणे अंगावर घेतली आणि पेलली देखील. लग्नाअगोदर मला नव्हते जमत. समजत नाही हिला कसे जमले. काही लोकांत हे गुण असतातच वाटते.

तिला विचारायचे ठरवतोय खरे, पण विचारले जाईल काय? आपले चुकले आहे. व्यसन वाईटच. पण एकादे छोटे व्यसन असतेच एकाद्याला. त्याचा एवढा राग करायचा कशाला? आणि नाहीतरी आम्ही इनामदार आहोत. आत्ता पर्यंत इनामदारांवर हुकूम गाजवायचा कुणी प्रयत्न केलाय का? प्रथा माहीत नाहीत. समजावल्या पाहिजेत.

आपण आजपर्यंत कधी रागावलो नाही त्यांच्यावर. आज होईल रागवायला? काहीच पक्के होत नाही मनाचा गोंधळ होतोय. काय अशी किमया आहे की आपण बोलू की नाही याबाबत साशंक आहोत?

पूजेच्या वेळी आरती केवढी सुंदर म्हणते. आवाज किती गोड आहे. कामाला येणाऱ्या बाया देखील शब्द पडायला देत नाहीत. कोणतेही काम करायला तयार असतात. आई आणि काकूच्या वेळी असे नव्हते. किती मिनतवाऱ्या कराव्या लागत त्यांना. पण ही आल्यापासून चित्रच बदलले. सगळे कसे आपसूक काम करू लागले. इनामदारीण शोभू लागली म्हणून आम्ही खूष. पण म्हणून काय आमचाही ताबा घ्यायचा? काही नाही, आज बोललेच पाहिजे.

.....

.....

रात्र उलटली, पहाट केव्हाच निघून गेली. चांगलेच उजाडले. रख्या आला नाही आणि जागवले नाही. पण रख्या येणार नव्हता. बंदी घातलीय इनामदारिणीने.

मग काल रात्रीचा प्रसंग डोळ्यासमोर झळकू लागला. फक्त एवढेच विचारले “रख्याला बंदी का? आम्हाला न विचारता असा हुकूम कसा दिलात? इनामदार आम्ही की आपण?” नंतर हसत तिने जी गोष्ट सांगीतली ती ऐकून आपली चूक तर उमजलीच पण केवढे खजील झालो. कोणताही मानभंग न करता सणसणीत अंजन घातले डोळ्यांत. एकच गोष्ट, लहान मुलाला सांगावी तशी गोष्ट सांगीतली. तिच्या आईने सांगीतलेली गोष्ट. आता पण पूर्ण आठवते आहे. त्यांतला राजा फार चांगला होता पण त्याला एक छोटे व्यसन लागले. तो मद्य पिवू लागला. मग द्यूत खेळू लागला. राणीने वेळीच अडवले असते तर राज्य गेले नसते. राज्य गेले, राजाला राणी, राजकुमार, राजकुमारी सर्वांना घेऊन पळून जावे लागले. खाण्यापिण्याचेही हाल होऊ लागले. मद्य तर विसरावेच लागले. मग राजाला समजले आपल्या चुकीने राणी व मुलांवर नको तो प्रसंग आला. त्यांची चूक नसतानाही ते भोगत होते. राणीलाही चूक कळली. राजाला वेळीच आवरले असते तर ही

परीस्थिती आली नसती. गोष्ट संपवून हलके हसत  म्हणाली “राणीने केलेली चूक मी करणार नाही. एवढेच माझ्या हातात आहे. राजाने ठरवावे त्याने काय करायचे ते.

इनामदार तुम्हीच आहांत व तुम्हीच रहावेत म्हणून हा आटापिटा केला.”

एकाद्याच्या हुशारीचे दर्शन कसे आणि केव्हा होईल सांगता येत नाही. पूर्ण सन्मान देत तिने दोष पदरात टाकला होता.

पण मी तरी काय करणार! तीन साडेतीन महिने ही बाळंतपणाला माहेरी जाऊन बसली. एवढ्या दिवसांची सवय पडली होती. कंटाळाच येई. मग एक दिवशी मांडवकर आला. त्या दिवशी जरा बरे नव्हते. त्याला बोललो तर म्हणाला “उद्या रामपारी वशेद पाठवतो, रख्या बरोबर, सगळा पिवून टाका. थोडे दिवस घेतलात काय साफ बरे व्हाल. आणि खरं तर रोज सकाळी घेतलात तर कधीच शीक पडणार नाय.”

मग दररोज सकाळी मडके पाठवू लागला. बरे वाटे घेतले की. हिची आठवण देखील सहन करू लागलो. पण मग दररोज सकाळी प्यायचा नादच लागला. आज समजले बायका किती समजूतदार असतात.

एवढ्यांत दार उघडून ही आत आली. हातांत मोठा गडू व पेला होता. म्हणाली हे सगळे पाणी प्या औषध घातले आहे. चहा घेऊन येते थोड्या वेळांत. पण औषध प्या म्हणजे त्रास होणार नाही.

परत कधीही रख्याच्या नादी लागू नये म्हणून ही काळजी. मी मनोमन समजत होतो. एका बाजूने खजील वाटत होते तर दुसरीकडे हिचा अभिमान वाटत होता. मला अगदीच सामान्य माणूस असल्या सारखे वाटू लागले. आणि ती एकदम मोठी वाटू लागली. खरी खुरी लायक इनामदारीण.

पाणी प्यालो तोच चहा आला.

.....

.....

दिवस उलटत होते. ही सगळे सांभाळीत होती पैरी, भागेली सगळे खूष होते. काकी तर सूनेचे गोडवे गात सुटली होती. तिने घर सांभाळले म्हणून, मला व्यसन लागू दिले नाही म्हणून काकी फार आनंदात होती.

एवढ्यात बातमी मिळाली आम्ही परत आणखी एका मुलाचे बाप होणार. मालीनी दीड वर्षाची झाली होती. आणि ही बातमी मिळाली. सगळे गप्प गप्प राहू लागले. काही झाले तरी शेजारी ही बातमी लवकर समजता नये याची सगळे काळजी घेत होते. लग्नाला

वर्ष उलटले तरी काहीच चिन्ह नाही म्हणून भाऊसाहेब बायकोशी भांडत. ते सर्वानाच माहीत पडले होते.

घरच्याच मंडळींना अशी वागणूक तर आपल्याला कशी मिळेल, म्हणून त्यांचे भागेली बिथरू लागले होते. आमचे भागेली सांगत भाऊसाहेब दंडेली करून भागाच्या हिशोबात गडबड करतात. मग ते पण उत्पन्न कमी दाखवतात. आमच्या भागेल्याना तर नेहमीच सांगतात, एक दिवस मीच तुमचा मालक होणार. त्याला भांडायची काय खुमखुमी तेच समजत नाही.

अशा माणसाला घरच्या बातम्या समजू द्यायच्या नव्हत्या. आता परत ही माहेरी जाईल बाळंतपणाला. मग परत तेच एकटेपण, कामाची वाताहात. भागेल्यांचा हिशोब पण बरोबर होणार नाही. काही म्हटले तरी तिच्यामुळे आम्ही इनामदार आहोत. नसली तर सगळीच अडचण होते. बाहेरचे व्यवहार व घरची कामे सगळे तीच संभाळते. आपण आज तिला विचारलेच पाहिजे, हे सगळे कसे जमते तिला.

काकी तर थकत चालल्यात, आईने कधी व्यवहारात लक्षच घातले नाही. बाबांची व धाकल्या काकांची भांडणे पाहून ती घाबरून गेली होती. कायम दडपणा खाली असायची. बाहेर काही भांडण झाल्याचे कळले की बाबा येई पर्यंत गप्प निजून द्यायची. मधेच उठून बाहेरदारी चक्कर मारून यायची. बाबा घरी येई पर्यंत हेच चाले. एकदा घरी आले की ही तरतरीत व्हायची. काकी मग विचारीत, बाबा सर्व काही काकीला सांगत. आई फक्त ऐके.

आईने तशी कधी फार माया दाखवली नाही. पण बाबा व काकी लाड करीत. ती दोन बहिणींचेच लाड करी. आत्या होती, ती देखील फार कमी येई.

काकीच्या बोलण्या वरून समजले, की माझ्या बाबानी बहिणीला मुलीच्या लग्नासाठी पैसे द्यायचे नाकारले म्हणून संबंध बिघडले. कोण म्हणे, माझे आतोबा व्यसनी, त्यांनी बाबांकडून बऱ्याच लहान लहान रकमा घेतल्या व कधीच परत केल्या नाहीत, म्हणून संबंध बिघडले. एवढे खरे की बाबा गेले तरी हे संबंध परत जुळले नाहीत. मला फार वाटे, केव्हातरी आत्याला भेटून यावे. लग्ना अगोदर तसे सुतोवाच करताच काकी ओरडू लागल्या "सापाच्या बिळांत जातोस? परत यायचंय की नाय? अरे वर तुझ्या बापाला शांती लाभेल काय रे?"

मी गेलोच नाही. माझ्या लग्नाचे आमंत्रण गावच्या सरपंचासोबत मानाने पाठविले. तरी ते लग्नाला आले नाहीत. माझ्या इथल्याच बहिणी लग्नाला आल्या.

इनामदारी हा मला जुलमाचा राम राम वाटे. प्रेमाचा ओलावा नसलेले आयुष्य माझ्या वाटेला आले होते. शेजारचे काका व भाऊ मला इस्टेटीचा मोठा भाग मिळाला म्हणून चिडले होते. काकी आणि आई इनामदारांचा वंशाचा दिवा म्हणून मला जपत. पण मायेचा ओलावा कधी जाणवत नव्हता.

खरेतर ही इनामदारी माझी नव्हतीच. मी दत्तक आलो होतो. तो वंश चालवण्यासाठी माझ्यावर इनामदारी लादली होती. म्हणूनच मी कधी भागेल्यांवर दंडेली केली नाही. एकदा तर भाऊसाहेबांबरोबर संधी करायचा प्रयत्न केला. पंच व सरपंच होतेच. आपण दोघांनी ठरवून परत भाग व्यवस्थित करू. मग भांडण राहाणार नाही असा प्रस्ताव दिला.

“मी इनामदार आहे, खरा इनामदार, मला कुणाची भीक नको.” असे म्हणत भाऊसाहेब निघून गेला. लोकांनी त्याला आडमुठा ठरवला. पण मला खोटा इनामदाराचा फार खोल ओऱखडा उठऊन तो गेला. मी संभ्रमात पडलो. मी इनामदार नक्की आहे का? वंशाने दत्तक, गुणांनी मवाळ इनामदाराना न शोभणारे मवाळपण. मग ही इनामदारी माझी होते का? खरे इनामदारांचे रक्त भाऊसाहेबात आहे, आपल्यात नाही. तरी तीन भाग इनामदारी मला व एक भाग भाऊसाहेबाला. कुठेतरी जरूर अन्याय आहे. म्हणून भाऊसाहेबांच्या दंडेलीला मी सामोरा जात नव्हतो? की इनामदारी रक्तच नसल्याने अंगात सळसळ नव्हती? डोके भणभणे मग वाटे कसेही करून झोप लागावी.

लग्न झालं. हिने सगळे किती सहज सांभाळले. भागेली खूष, घरचे खूष, घरी कामाला येणारे खूष एवढेच काय भाऊसाहेबांची बहीण विजया पण मैत्रीण झाली. आमची काळजी, वेळच्या वेळी चहा, पूजेची तयारी, जेवण सगळे कसे एका सुसंगत वेळापत्रकात बांधले गेले. स्वभाव तर एवढा लाघवी, प्रेमळ की चार दिवस देखील विरह सहन होत नव्हता. काय असते असे एकाद्या माणसांत की ते हृदयात घर करून रहातात.

भाऊसाहेबापुढे इनामदारी नाही दाखवली. हिच्या समोर दाखवायला निघालो होतो. किती सुंदर तऱ्हेने कानपिचकी दिली. न दुखणारी पण डोळ्यात अंजन घालणारी. आणि आता परत काही दिवस दूर जाणार. बाळांना वेळ जास्त दिला जाणार. मी वाट पहात रहाणार. हे सहन करायची देखील ताकद नाही आपल्यात. फार दिवसांनी आपलेपणाचे सुख मिळाले ते निसटू नये म्हणून केवढी घालमेल चाललीय.

विचारानी श्रांत झालो व डुलकी लागली.

“काही होते आहे का? बरे नाही वाटत?” काळजीने ओसंडणाऱ्या आवाजात ही विचारत होती.

पलंगावर उठून बसलो. तिच्यावर नजर गेली. शांत करारी चेहेऱ्यावर एक काळजीची छोटी रेषा ठशठशीत पणे दिसत होती.

“काही नाही, तुमचाच विचार करीत होतो. डोळा लागला एवढेच.”

“कसला एवढा माझा विचार? आंघोळ करायची नाही? पुजेला वेळ झाला तर जेवण खोळंबेल. आंघोळी अगोदरचा चहा आणलाय.”

“हो आलोच सर्व आटोपून” आज्ञाधारक मुलासारखे पटकन शब्द निसटले.

ती निघून गेली. असा वेळच्या वेळी मिळणारा चहा बंद होणार. बायका आपल्याला किती परावलंबी करतात. सगळी कामे या करत सुटतात व मधली पुजेसारखी कामे त्यांच्या वेळी करण्यात आपली फरफट करतात.

पण काही म्हणा या बाईमुळे घर कसे छान होऊ लागले आहे. एक शिस्त सगळीकडे नांदते आहे. कवाईतीत उभ्या असलेल्या मुलांसारखी कामे सकाळीच रांग पकडतात आणि ठरलेली माणसे ती वेळच्या वेळी करत जातात. हिने ही शिस्त किती सुंदर घालून दिली. कुठेही आरडाओरड नाही, चढ्या आवाजात बोलणे नाही की कुणाच्या कामाची तक्रारही नाही. सगळे नोकर चाकर बाईसाहेबाना खूष करायला धडपडत असतात. पूर्वी नाहीतर काकींची आरडाओरड चाललेली असे. नोकरांवर ताशेरे झाडत फिरत असत. आता म्हणतात काय सगळं छान चालवते म्हणून.

आज पूजा झाली व आरती सुरू झाली. फारच छान सूर लागला होता हिचा. त्या तालावर माझ्या हातातली आरती सुंदर लयीत फिरत होती. आरती संपली व प्रसाद सगळ्यांना दिला. प्रसादाची थाळी हिने पटकन माझ्याकडून घेतली. काय करते ते पहाण्यासाठी वळलो तर मागे भाऊसाहेबांच्या पत्नी त्यांच्या दारात उभ्या होत्या. ही सरळ त्यांच्या पर्यंत पोचली. व प्रसाद देऊ लागली. त्या घाबरल्या, संभ्रमात पडल्या. देवाचा प्रसाद नाही म्हणता येत नाही व घेतला तर भाऊसाहेब रागावेल.

“देवाच्या प्रसादाला नाही म्हणू नये. राग आपल्या जागी भक्ती आपल्या जागी ठेवावी” ही हसत बोलली. त्यांनी हसत प्रसाद घेतला व निघून गेल्या.

मैत्री करण्याची संधी, एकाद्याला बरोबर कचाट्यात पकडून कशी साधते याचे दर्शन झाले होते. पण आमच्या घरी जरा नापसंतीचा सूर निघाला.

“काय गरज होती समोरून जाऊन प्रसाद द्यायची? कशाला नेहमी हीच पडते घेते?” काकी कडकडू लागल्या.

“अहो मी प्रसाद दिलाय तो तिच्यातल्या देवाला. आपल्या सर्वांत देवाचा अंश असतो. हे मानपान माणसाचे. देवाकडे नसतात मानपान, द्वेष, वैर असलं कायपण नसतं. आपण दुसऱ्यातला देव बघायचा. मग सगळं बरोबर वाटतं.” हिचे हे तत्वज्ञान ऐकून काकी तर गप्प झाली पण मी एकदम विचारात पडलो. कुठल्या मातीत रुजलीय ही? शिक्षणाचा गंध नाही पण ज्ञानाचा साठा भरपूर दिसतोय. बहुतेक ही भाऊसाहेबाच्या बायकोला आपल्या स्वभावाने जिंकणार.

आता उन्हाळा फार आहे. दोन दिवसात मृगाच्या पावसाची सुरवात होईल. शेतीच्या कामांची गर्दी होईल. मग त्यांतच गुंतेल ही. यावेळी तिला पावसात जायला मना करायचे. बघेल कोणीतरी. विचार आला आणि मलाच नवल वाटले. पहिल्या वेळी काहीच काळजी नव्हती वाटली. आता कसे विचार येऊ लागले. सहवासाने बंध हळू हळू केव्हा घट्ट केले समजलेच नाही. फार काळजी वाटून रहाते हल्ली. मन सैरभैर होते. हे सगळे मनात चालले होते पण सांगू शकलोच नाही

पाऊस सुरू झाला. पाहिले तर ही काही शेतावर जात नव्हती. सकाळीच नोकराना सांगे. एवढ्या कोपऱ्यात पेरणी झाली पाहिजे. पेरणीचे बी पण काढून द्यायची. मग नोकर काय करणार, सांगीतलेले काम पुरे व्हायचे. भटीणबाई जेवण करायला येत त्यांची बाराएक वर्षाची मुलगी बरोबर येवू लागली. मालीला सांभाळे. आई, काकीना काही लागले तर पाही. पण दोन दिवसांत ती हिच्या मागे मागे राहू लागली. ती सांगेल ती कामे आनंदाने करू लागली. खरेतर बऱ्याच दिवसांनी हिला कोणी मैत्रीण मिळाली. वयात खूप फरक तरी मैत्री गाढ झाली.

पेरणी संपली. लावणी संपली, गणपती आला व गेला, कापणी होऊन धान्य घरात आलं आणि मग सर्वांना समजले की आम्ही परत बाप होणार.

त्या रात्री भाऊसाहेबांच्या घरी गदारोळ उडाला. बायकोला त्यांनी गुरासारखे मारले. तिच्या किंचाळण्याचा आवाज पहिल्यांदाच आमच्या घरात पोचला. काकी नको नको म्हणत असताना ही तडक भाऊसाहेबांकडे निघाली. मागोमाग काकी निघाली. देवघराच्या हद्दीपर्यंत जाऊन मी उभा झालो.

मग जे काही झाले ते खरोखरच आश्चर्य करण्या सारखे होते. ही जाऊन पोचली व तिने भाऊसाहेबांच्या बायकोला कवटाळून मिठी मारली. भाऊसाहेबाना असे होईल वाटलेच नव्हते. या अनपेक्षित घटनेने ते भांबावले. हातातला दांडा टाकून ते घरातून बाहेर पडले. हिने त्यांच्या बायकोला सावरत देवघराकडे आणले. बसवून म्हणाली “कोणीतरी हळद

चुना आणा. बांधायला जुनी साडी नायतर पंचा आणा. डोक्याला खोक पडलीय, हातालाय लागलेय."

सगळा उपचार करून तिच्या वरून हात फिरवत म्हणाली "सोसायचे आलेय गे तुझ्या नशीबात. तू पण ताठ हो. ही भाऊबंदकी मिटली तरच सुख येईल. समजव नवऱ्याला."

ती एकटक हिच्याकडे बघत होती. एकदम मिठी मारून रडू लागली. मग जोर आवरून म्हणाली "मला आईकडे पोचवा. उपकार होतील. हे इथे कोणाला यायला देत नाय आणि मलाय माहेरला पाठवीत नाय. आईला समजले तर ती पाठवायचीच नाय परत. मला मदत करा."

"हे बघ असं काय आमी केलं तर दुश्मनी अजून वाढेल. कुठच्या गावची, कोणाची ते सांग मग बघतो काय करायचं ते. आणि ह्या पुढे मार खायची वेळ आली तर देवघराच्या खोलीत पळून यायचं. देवघरात दोघांचाय वावर आहे. आम्हाला यायला बरे मदतीला." ही सांगत होती.

ती काहीच बोलत नव्हती. एवढे मात्र खरे की भाऊसाहेब हिला घाबरला होता. तिथून निघून गेला होता. घरात होता की बाहेर गेला होता माहीत पडत नव्हते. सगळी मलमपट्टी झाल्यावर हिने तिच्या पाठीवरून हात फिरवायला सुरवात केली. तिला परत उमाळा आला व रडू लागली. मी हे अप्रूप बघून सुन्न झालो होतो. आमच्या इनामदार बाईंना नको ते धाडस करायला कोणी सांगीतले होते. एकादा दांडा हिला बसला असता तर? पोटुशी बाई, अशी कधी भांडणात मधे पडते काय? मी घरी परतलो. परताना लवकर घरी या सांगीतले. तशी काकी उठली.

आता माझ्या मागे चालताना काकीची भुणभुण सुरू झाली. कशाला त्यांच्या घरच्या भांडणात पडायचे? आपली अवस्था काय याचाही विचार नाय. धावते सगळ्यांच्या मदतीला. असे बडबडत मागे मागे येत होती. मी समजलो हे सगळे ती मुद्दाम बोलत होती. मी तिला जाब कसा विचारावा हे मनात भरवीत होती.

आईसासूकडे आलो तर आई अगदी कासावीस झालेली दिसली. "सून कशी आहे रे? कशाला त्यांच्या घरच्या भांडणात पडता? कसलं वैर मिटवायला धडपडता? एक दिवस जीव जाईल." आईला सुनेची, आमची काळजी. त्यामुळे ती अस्वस्थ. त्या घरी गेलात तर परत धड याल की नाही ही शंका.

तेवढ्यात ही आली आणि सगळ्यांची सरबत्ती सुरू झाली. तशी शांतपणे म्हणाली. "अहो कुणी एकाद्याला गुरा सारखे मारताना पहात बसायचे? आपल्यात माणूसकी नको?

आणि हे बघा, हे असले पुरुष खरे मर्द नसतात, भित्रे पळपुटे असतात. चांगल्या समोर टिकाव नाही धरू शकत ते. पळालेच ना? बायकोला मारण्यात मर्दुमकी कसली. गरीब गाय आहे ती. तिच्यावर कसली दादागिरी. बाहेर दाखवा मर्दुमकी.”

परत एकदा बाईसाहेबांचा रंग दिसत होता. मी गप्प माडीवर निघून गेलो. थोड्या वेळाने ही देखील आली. चेहरा शांत होता. म्हणाली बाहेर गेलात तर त्यांच्याशी वाद करू नका. आजच्या प्रसंगामुळे ते तुमच्याशी बाहेर भांडण काढतील. पण तसे काही झाले नाही.

पुढचे कित्येक दिवस शांतपणातच गेले. फक्त देवघरात भाऊसाहेबांची बायको हिला भेटून गप्पा मारते हे काकीने सांगीतले. तिला व मला जरा भिती वाटत असे. पण आता इनामदारीण स्वतःचा अधिकार मिळवून बसली होती. भाऊसाहेब काही करताना दिसत नव्हता. त्याची बायको हिच्याशी गप्पा मारते. भाऊसाहेबाला माहीत पडले तर? तिची भिती  गेली कशी? एवढी धीट कशी झाली हिनेच काहीतरी बरोबर उपाय सुचवला तर नाही? आम्हाला आश्चर्य वाटायचे. पण विचारायचे कसे?

आता वाटत होते हिच्याकडे काय असे आहे की सगळया स्वभावावर बरोबर उपाय शोधून काढते. विचार करीत बसायचो. आश्चर्य वाटत राहायचे. कोडे मात्र सुटत नसे. उत्तर काही मिळत नसे.

*****

अरुणा कुलकर्णी

## ११

## रुक्मिणी-

लवकरच बाळंतपणाला परत माहेरी जायचे. खरेतर इथेच करायची इच्छा होती. पण या घरी मनुष्यबळच नाही. म्हणून आईनेच निरोप धाडला. पहिल्या बाळंतपणा नंतर आले ती जाऊ शकले नाही. माली पांच महिन्यांची होती. सर्दीने हैराण झाली होती. सासूबाई आजारी होत्या. जगतील की नाही असे वाटत होते. कशी जाणार लग्नाला? परत रख्या प्रकरणामुळे मन थाऱ्यावर नव्हते. आईला सांगावा पाठवला. अडचणींचा डोंगर आहे. मला निघायला होणार नाही. लग्ने उरकून घ्या. मग केव्हातरी येवून जाईन. पण मग नव्या बाळाची चाहूल लागली. जाणे जमलेच नाही.

मग पांचवा महिना लागला व आईला कळविले. शामदादा आला होता त्याला सांगीतले. त्याच्या बायकोची नव्या वहिनीची विचारपूस केली. माहिती काढली. म्हणाला फार हंसते जोरांत खळखळून हंसते एवढेच. बाकी सर्वांशी चांगलेच जमते. सुमी तर तिलाच चिकटलीय. आता तुला विसरलीय. मनात म्हटले असेच असते. सहवास संपतो तिथली नाती विरायला लागतात आणि जिथे जातो तिथे नव्या जीवांशी नाती जुळतात. बायकांच्या आयुष्यात हेच असते. माझा इथे केवढा जीव गुंतलाय. मनात आले तरी कुठे जाता येत नाही.

आई विचारी. तिला आमच्या घरची परिस्थिती माहिती. लगेच निरोप आला. बाळंतपणाला इकडेच ये. आम्ही चौघी चौघी आहोत, सहज होऊन जाईल. तिकडे सासूबाई उतारवयाच्या त्यांना कसे जमणार? इकडेच ये. झाले काकीसासूबाई म्हणाल्याच खरे आहे, तुझी सगळीच बाळंतपणे तिकडेच करावी लागणार. आम्ही अजून म्हाताऱ्या होत जाणार आणि पहिली मुले सांभाळत बाळंतपण इकडे करणे तुला शक्यच नाही. दोन महिन्यानी सातवा लागेल मग निघावे लागणार.

परत बाळंतपणानंतर रख्याचे येणे जाणे सुरू नाही झाले म्हणजे मिळवली.

या सगळ्या विचारात बसली होती जेवणे नुकतीच आटोपली होती आणि शेजारी मार देण्या बरोबर भाऊसाहेबांच्या बायकोच्या किंचाळया ऐकू आल्या. तशीच देवघराकडे धांवली. मागोमाग काकीसासू पण आल्या. भाऊसाहेबांच्या दिवाणखान्यातून आवाज येत होता. तिकडे धांवले. तिच्या डोक्यातून रक्त येत होते. चेहेरा रक्ताने भरला होता. भाऊसाहेब दांड्याने तिला बडवत होते. मी मधे पडले. पहिलीच नजरा नजर झाली होती. मोठ्या मिशा, लाल डोळे आणि स्थूल शरीराचे भाऊसाहेब एकाद्या माजलेल्या सांडा सारखे दिसले. जरी मी त्यांच्या बायकोला कवटाळले होते तरी नजर त्यांच्यावरच होती. जळजळीत नजर बघून भाऊसाहेब दांडा टाकून बाहेर निघून गेले. मी पवित्र्यांत होते. दांडा मारायला उगारला असता तर उठून पकडायचा हिसकावून घ्यायचा निश्चयच केला होता. तोही कदाचित त्यांनी हेरला असेल.

ते गेले व मी त्यांच्या बायकोला देवघरात घेऊन आले. मलमपट्टी करून रक्त थांबवले. मग पहात बसले. ती भिती ने थरथरत होती. मग बोलली माहेरी आई कडे जायचेय. लग्न झाल्यापासून पाठवलेच नाही. काकीसासूबाई, हे सगळे जरा नाराजच दिसले. हळू हळू निघून गेले. मग मी तिला समजाऊ लागले.

बाई एकदा घर सोडलेस की परत कशी येशील? इनामदारांचे काय सोडचिठ्ठी देवून दुसरे लग्न करतील. तुला माहेरी दिवस काढताना कठीण जाईल. नवऱ्याने सोडलेल्या बाईचे जीणे फार कठीण. किंमतच नसते. जिथे राहाशील तिथे नोकरासारखे वागवतील. इथून पाय काढू नकोस. पण हा मार सहनपण करू नकोस. मला माहीत आहे तुला का मारले ते. सांग त्यांना मुल न होण्याचा दोष त्यांचा कशावरून नाही? बोलायची हिम्मत कर. अग हे असले लोक भ्याड असतात. समोर उभी झालीस की पळ काढतील की नाही बघ. परत मारायला आले तर घाबरू नकोस. जळजळीत नजरेने त्यांच्या डोळ्यांत बघ. उगारलेला दांडा पकडायची हिम्मत दाखव. वर सांग जगाला ओरडून सांगेन "भाऊसाहेब इनामदाराना वारस होणं शक्य नाही." तोंड लपवून जगावे लागेल म्हणावे.

ती अचंबा करीत माझ्या तोंडाकडे पहातच राहिली मग म्हणाली " दांडा पकडीन, बघीनय खरी रागाने. पण पोर न होण्याचा आरोप कसा हो करू? उद्या खरंच पोर झालं तर उलटी बोंब मारून घरा भायर काढतील त्याचं काय?"

"केवढी भितेस गे! असं कायएक व्हायचं नाय. एक नंबरचा भित्रा आहे तुझा नवरा म्हणून असा वागतो. एकदा भांडणं थांबली, तो सरळ झाला, प्रेमाने बोलू लागला की

होईल बघ पोर. प्रेमान जवळ नाय घेतलन तर पोर काय होणार?" मी सुनावले. तिला पटलेले दिसले.

घरी आले तर माझ्याबद्दल बोलणे चालले होते. मी मधे का पडले. खरेच होते त्यांचे. एकतर वैर वर मी पांच महिन्याची पोटुशी. त्यांची काळजी रास्त होती. पण असे कोणी बाईला गुरा सारखे मारत असेल तर गप्प पहात राहायचे? तिच्या माराला मूळ कारण देखील मीच होते. मला १९ वे वर्ष चालू होते व दुसऱ्यांदा आई होणार होते. तिला लग्न होऊन दीड वर्ष होत आले तरी कूस उजवत नव्हती. इनामदारांच्या शर्यतीत भाऊसाहेबांना ती मागे पाडत होती. जणू काही सगळा दोष तिचाच होता. मुख्य म्हणजे माझ्यामुळे मार पडत होता. मग नको मधे पडायला? माणुसकी म्हणून तरी पडायला हवे.

खरे तर यात माझा वैर मिटवायचा विचारही नव्हता. ती आतून आलेली हांक ऐकूनच मी धावले होते. पण सासूबाईना वाटले माझ्या संबंध सुधरवण्याच्या प्रयत्नाचाच भाग आहे तो.

मग मात्र शांती नांदू लागली. उज्वलावैनी, भाऊसाहेबांची बायको मग देवघरात बसून गप्पा मारू लागली. भाऊसाहेब दोन दिवस रागात राहिले होते. मग रागातच बोलले. शेजारणीला भेटलेले त्यांना पसंत नाही म्हणाले. लवकरच मुल झाले नाही तर दुसरीशी लग्न करणार म्हणाले. हिने जळजळीत नजर टाकत विचारले, तिलाही मूल नाही झाले तर काय तिसरी आणाल? आणा किती हव्या तितक्या, पण लक्षात ठेवा मी काही घर सोडून जाणार नाही. मारून पुरून टाकावे लागेल इनामदारांच्या वाड्यांत. उज्वलाचा अवतार बघून भाऊसाहेब पहिल्यांदा बावचळले. मग पुरुषी मर्दानी दाखवायला दांडा उचलून मारायला निघाले. हिने नजरेला नजर भिडवत गर्जना केली. मार खाणार नाही. दांडा पकडून हिसकावला. तो तिच्या हातांत आला. भाऊसाहेब धडपडले. ही दांडा घेऊन परसदारी गेली दांड्याचे तुकडे करून टाकले. मग घरात सगळी कडे फिरून इतर दांडे गोळा केले. त्यांचेही तुकडे केले. सगळे जाळायला बसली. भाऊसाहेब पुरे वरमले, जळफळू लागले काय करावे तेच त्यांना सुचेना. मग रात्र असूनही तरातरा बाहेर निघून गेले.

घर शांत झाले.

आठवडा उलटला असेल अचानक उज्वला वहिनींचे आईवडील सकाळीच हजर झाले. भाऊसाहेबांनीच बोलावले असावेत. त्यांना भाऊसाहेबांनी उज्वलाला घेऊन जा म्हणून सांगीतले. उज्वलाची आई हबकलीच रडू लागली. वडील विचारांत पडले.

उज्वला बाहेर येवून म्हणाली “मला कोण घरातून काढते ते बघतेच मी. रोज मार खाईन. मेले तरी चालेल पण हे घर सोडून जाणार नाय. माझा गुन्हा पदरात घाला. आई बाबा आहेतच. हिम्मत असेल तर सांगा खरं काय ते.” भाऊसाहेब उठून बाहेर पडले. उज्वलाने आई बाबाना सविस्तर काय झाले ते सगळे सांगीतले.

उज्वलाचे वडील सरकार दरबारी वजन असलेले होते. भाऊसाहेब जेवायला आले तसा विषय त्यांनीच चालू केला. जावयाला दमात घेतला. वर म्हणाले परत मुलीवर हात उचललात तर जावई म्हणून की इनामदार म्हणून गय करणार नाही. तुरुंगाची हवा दाखवीन. परत एकदा भाऊसाहेब तोंडावर पडले.

मला हे बरोबर वाटले नाही. अशाने संसारात उज्वलाला कायम त्रास होईल. याच्यातून मार्ग काढायलाच पाहिजे. दोन दिवस विचार केला आणि ठरवले. उज्वलाला आता मनमिळावूपणाने समजूत काढायला सांगायचे. तसे बोलले तर गप्पच बसली. बोलती करण्याचा प्रयत्न केला तर रडायला लागली. पुढे जे काही बोलली ते फारच भयंकर होते.

लग्न झाले तेव्हा इनामदार घराणे म्हणून घरचे सगळे खूष झाले होते. ती घरात सगळ्यांची लाडकी होती. लग्न करून आली आणि पहिल्याच दिवसी भयानक दम मारला भाऊसाहेबांनी. शेजारी संबंध ठेवायचे नाहीत, ते घरात काय करतात हे कुणालाही समजता नये. सर्व इनामदारी जर मिळवायची असेल तर तोंड बंद ठेवायचे. शेजाऱ्याना निर्वंश करायचा पक्का निर्णय त्यांनी केला होता. घरी काही लोक येत. त्यांचे बंद खोलीत बोलणे चाले. समजत नसे काय बोलतात ते. बाहेर पडले निरोपाच्या वेळी एक दोन वाक्ये कानी पडत. ते नेहमीच प्रत्येकाला म्हणत “माझं काम कर, बरोबर केलंस तर पुरी इनामदारी माझी होईल. मग बघ तुझेय कसे भले करतो ते.” यावरून अंदाज येई काहीतरी कारस्थाने चालू आहेत. बहुतेक ती शेजाऱ्यां विरुध्द असणार. मी एकदा चुकून विचारले, कसली खलबत करता म्हणून. चांगल्या चार पांच थोबाडीत मिळाल्या व वर शिव्यांची लाखोली. त्या दिवशी आईबाबांची फार आठवण आली तिला. माहेरची ओढ लागली. माहेरी जायचा विषय काढला तर परत मार पडला. ती नवऱ्याला घाबरू लागली. त्याच्या जवळ जायची हिम्मतच होत नव्हती. एकांतात जेव्हा दोघे भेटत तेव्हा देखील घाबरलेलीच असे. एक सोपस्कार आटोपल्यासारखी ती भाऊसाहेबांच्या खोलीतून बाहेर पडे व माजघरात पथारीवर पडून नशीबाला दोष देत, तळमळत राही. अशा संबंधात मुल होण्याची तिची आशा खुंटत होती. किंवा भिती पोटी ती गरोदर रहात नव्हती.

मी सुन्न होऊन सगळे ऐकले. मग समजावले. “तुझे आई बाबा आहेत तुझ्या पाठी. मीय येईन धाऊन मारू लागले तर. पण तुलाय हिम्मत दाखवावी लागेल. बाहेर पड, भागेल्यांचा हिशोब बघ, त्यांना मायेने वागव. सगळ्या गोष्टी कानावर येतील. मगच भाऊसायबांना समजावता येईल. कायच म्हाईत नसेल तर काय करशील? बाहेर पड. आणि घरात खलबते करायला येतात त्या भागेल्यांना पहिले पकड.”

“नाय वो ताई! मला घरा बाहेर पडायलाच देणार नाय. विचारूनच सगळं करायचं. वेवहार त्यांच्या हातातच आहे. लगीन नाय झालं माझं, तुरुंगवासात पडलेय मी.” उज्वला.

“बोलायचं सोडून दे. गप ऱ्हात जा. जेवायला खायला घाल आणि झोपून देत जा. अजिबात भीक घालू नको. दुसरं लगीन करतो म्हणाले तर खुशाल करा म्हणून सांग. आणि घराबाहेर पडू नको. म्हायेराला जायचा विचार सोड. येईल वठणीवर. पण होईस्तवर माहेरच्या लोकांना मधे ओढू नको.” मी आईचा अबोला शस्त्र तिला शिकवले.

ती माझ्याकडे बघतच बसली. मग मान डोलवून संमती दाखवलीन.

दिवस पळत होते. शेजारी शांतता नांदत होती. आमच्याकडे सगळे सुरळीत चालू होते. आणि माहेरी जायचे दोन दिवसांवर येऊन ठेपले. मग विचारानी जिवाची तगमग वाढली. सगळ्यात मोठे ओझे होते आमच्या ह्यांचे, आबासाहेब इनामदारांचे. मी तीन चार महिने तरी नसणार. माझ्या मागे परत रख्या सारखे दुसरे काही होणार नाही ना? कामे थोडी रखडतील पण आलो की करता येतील सगळी सरळ. सासूबाई व आई थकल्यात त्यांचे सर्व बरोबर होईल ना? तिकडे आजोबांची तब्येत फारशी बरी नसते. मधलाकाका म्हणजे माझा बाबा वेगळे व्हायचा विचार मधून मधून बोलून दाखवतो. मग घरात वातावरण बिघडते. सगळेच विचार मनात फेर धरतात.

इनामदार हे अगदी निर्बळ. पटकन वहात जाणारे. माझे नसणे त्यांना सहन होत नाही. मग जातात कशाच्याही आहारी. मला इनामदार कसल्यातरी नव्या नादी लागतील याचीच भिती वाटत होती. मग त्यांना बोलले. मी नाही चार महिने. राजाची गोष्ट लक्षांत ठेवा. हसत म्हणाले, ठेवायलाच लागेल. निश्चिंतपणे जा व सुखरूप या. मग निर्धास्त झाले. तरी देखील काकी सासूबाईना म्हटलेच. माडीवर कोण येते जाते यावर लक्ष ठेवा. त्याही हसत म्हणाल्या बरोबर राखण करते या वेळेस. पण यावेळी नातू आण.

दोन दिवसांनी माहेरी आले. आई, माय, छोटीकाकी सगळी बोलायला बसली. शामदादाची बायको पाणी घेऊन आली. चांगली हंसरी होती. आईची पसंती असणार हे

बघतांच समजले. मग तिच्याशी बोलत बसले. ती मालीशी सूत जुळवायला बघत होती. पण माली ढीम्म कुणाकडे जाईल तर. हल्ली मालीचे गुण दिसू लागले होते. मला वाटे, जन्मतःच माणसे काही स्वभाव घेऊन जन्मतात. मालीचा रागीटपणा, कुणातही लवकर न मिसळणे हे स्वभावगुण माझे नव्हेत. ते मालीत कसे आले? सुमी धांवत मालीकडे आली पण माली काही तिच्या बरोबर जाईना. म्हटले नवीन जागा, नवीन माणसे बुजत असेल. मिसळेल थोड्या वेळात.

आजोबाना भेटायला गेले. बसले. आजोबा अगदी बारीक झाले होते. चालताना कापत होते. मला बघून आनंदले. खूप बोलू लागले. तशी आई येऊन रागे भरली. जास्त बोलू नका हवाळी लागेल मग. मला सांगू लागले, आता थोडेपण श्रम केले तर हवाळी लागते. श्वास वर खाली होतो. वाटते भावाने बोलवले वर. मी मनात चरकले.

सुमी मोठी झाली होती. माझी सवय सुटली होती. मी तिला प्रेमाने बोलवायची, जवळ घ्यायची पण ती थोड्याच वेळांत पळून जायची. शामदादा आला हसून बोलला. लग्नाला नाही आलीस, मी नक्की येईन असे त्याला वाटले होते. मी ओशाळले. खरंच माझा खरा मोठा भाऊ, पण काय करू? मनातच विचार करू लागले. तर त्याने हसत वहिनीला भेटली का विचारले. मग लग्नाच्या मजा सांगत होता.

दिवस पळत होते. दीड एक महिना झाला होता माहेरी येऊन. तोच एक दिवशी आबासाहेब आले. सर्वांशी बोलल्यावर मला म्हणाले "आई फार आजारी आहे. काही बरे वाईट झाले तर धावाधाव करीत येवू नको. तब्येत सांभाळ."

माझी चिंता अजून वाढली. कसे सांभाळतील काकीसासू सगळे? आई म्हणाली "जन्म मरण हे फेरे होतच राहाणार. आपण फक्त बघणारे. दुःख होते त्याच्यावर वेळ औषध करतो. काळजी करून काही होत नाय. वरच्याची मर्जी असेल ते होईल."

आठ दहा दिवस गेले. आजोबा फार आजारी झाले. सारखा जोरजोरांत श्वास चालत होता. रात्र पडायला आली आणि मझ्याही पोटांत दुखू लागले. सगळ्यांची धाव धाव सुरू झाली. छोटी काकी माझ्या दिमतीला आली. आई आजोबांना काय हवे नको ते पहात होती. सुईण आली, वैद्य बुवाही आले. रात्री जेवणे कशीतरी आटपली. रात्र संपून चार घटका झाल्या असतील. आणि सगळे बाहेर धावले. खोलीत मी व सुईणच होतो. बाहेर गडबड ऐकली. कोणीतरी खोलीचे दार बंद करून घेतले. माझ्या कळा वाढल्या. सुईण सतत धीर देत होती. मध्यरात्र उलटली असेल आणि मी बाळंत झाले. सुईणीने मुलगा झाल्याचे सांगीतले व माय खोलीत आली. मुलगा झाल्याचे समजताच म्हणाली "कायाच

बदललानी वाटते. बाहेर ते गेले आणि इथे जन्मले इतकेच.” मला समजले, आजोबा गेलेत. मायला वाटतेय तेच माझ्यापोटी जन्माला आलेत.

मग बाहेर जाऊन तिने सर्वांना बहुतेक तेच सांगीतले. सगळ्यांचा दुःखाचा आवेग खूप कमी झाला. सुईणीने सगळे आटोपल्यावर सगळेच येऊन बाळाला बघून गेले. सकाळी आजोबांचे शेवटचे दर्शन मी दुरूनच घेतले. घरात सोयर आणि सुतक एकदमच बसले. आजोबा गेले व मला मुलगा झाला हे दोन्ही निरोप मिळताच आबासाहेब आले, सर्वाना भेटले मला भेटले ते म्हणाले “सुख आणि दुःख असे हातात हात घालून आलेले पहिल्यांदाच पाहिले. सांभाळा. आणि लवकरच घरी या.” सासूबाई कशा आहेत विचारले तर म्हणाले “दीड दोन महिन्यात तू येशील तोपर्यंत राहिली तर बघशीलच. फार थकली आहे.”

यावेळी सगळेच कठीण झाले असे वाटू लागले. पण हेही दिवस गेले. सोयर, सुतक दोन्ही संपले तसे मधला काका मोठ्या काकाला म्हणाला लवकरच घरे वेगळी केलेली बरी. बाबानी कुठे लिहून ठेवलेय काय, कुठला हिस्सा कुणाचा ते? मोठया काकाला काहीच माहीत नाही म्हणाला. मग आई म्हणाली “केवा घरं वेगळी करायची, कोणाचा हिस्सा कुठला सगळं मला दोघाही भावानी समजावलय आणि लिहूनय दिलंय. वेळ आली की कागद काढीन बाहेर.” आम्ही सगळे सुन्न झालो होतो. माझ्या बाबाला घर तोडायची घाई काय झालीय समजत नव्हते. तो काय सगळे सांभाळणार होता? आणि मायला बाहेरचे सगळे सांभाळायला जमणार होते?

आईला मी गेल्यावर काय ते भाग करा म्हटले. विचारले माहेरपणाला आता आम्ही कुठे यायचे? आई फक्त हसली. हसण्यात दुःखाची रेषा मला दिसली.

मी परत जायचा दिवस उजाडला व माहीत पडले सगळी कडे जाळपोळ सुरू झालीय. गांधी बाबाना कोणीतरी गोळी मारली. तो ब्राह्मण होता. म्हणून सगळे भटांबरोबर आमची बामणांची घरे पण जाळीत सुटले होते. माझे जाणे पुढे ढकलले. चार दिवसानी आबासाहेब मला न्यायला आले. गाडी जोडून गुरू घेऊन निघाला. आबासाहेब बंदूक घेऊनच आले होते. गाडीत कांबळया खाली बंदूक दडवून ठेवली. पण आम्ही सुखरूप घरी पोचलो. वाटेत काहीच झाले नाही.

घर येता येता आबासाहेब म्हणाले “आई वारली. तुम्ही बाळंत झालात, मुलगा झाला एवढे ऐकले दुसऱ्या दिवशी समाधानाने श्वास सोडला. वाटले नातवासाठीच थांबली होती.”

यावेळी मुलगा झाला तरी निखळ सुख पदरी येत नव्हते.

काकीसासू नातवाला बघायला आसुसल्या होत्या. सारख्या म्हणत दोन महिने काढले असते तर नातवाचे तोंड बघितले असतेन. मग नातवाला घेऊन बसल्या. यावेळी माझ्याबरोबर कोणी  आले नव्हते. मग जेवण करायला येणाऱ्या बाईंना सांगीतले. मुलाला पहायला जरा बघा कोणी मिळाले तर. लगेचच त्यांनी एक मुलगी आणली आणि माझी कामे बघायला मी मोकळी झाले.

मुलगा झाल्याचे भाऊसाहेबाना समजलेच असणार. पण यावेळी शेजारी कुठलाच आवाज ऐकू आला नव्हता. उज्ज्वला पण दिसली नव्हती. चार दिवसानी देवघरात भेटायला आली. म्हणाली मुलगा झाल्याचे समजले तसे हे उदास झाले. आता गारुडी झालेत की काय समजत नाहीत. तीन चार पिवळे धम्मक नाग साप आणलेत. त्यांना पाळलेत. चामड्याचे मोजे नी पयात बूट बनवलेत सकाळी तासंतास नागां बरोबर खेळतात. मला सांगतात राखणदार बनवतायत घर राखायला. वाकडी नजर कोणी केली तर माझे राखणदार त्यांचा फडशा पाडतील.

मला हसू आले. आम्ही काय यांचे वाईट बघत नाही. आणि राखणदार काय असे तयार होतात? कोणीतरी लोभी अतृप्त आत्मा जन्म घेतो म्हणे पूर्वजन्मीची संपत्ती राखायला. पण नव्या नादाने उज्वलाचा त्रास बराच कमी झाला होता.

दिवस भरभर पळत होते माली व राघव मोठे होत होते. मी भागेल्यांची कामे पहात होते. घरची नेहमीची कामे सुरळीत चालली होती. शेजारच्या इनामदारांचा त्रास घरापर्यंत पोचत नव्हता. उज्ज्वला मधूनच भेटे. दिवसे दिवस जास्त दुःखी होते की काय वाटे. मला माझ्या मुलांच्या व कामांच्या गडबडीतून वेळ कमी मिळे. त्यामुळे तिला भेटणे बोलत बसणे कठीण होई. एक दिवशी असेच भेटलो तेव्हा म्हणाली "ताई! मुलां बरोबर नवऱ्यालाही सांभाळा. आमचे आता गनीमी कावा खेळतायत तुमच्या बरोबर."

"म्हणजे ग? काय ते सरळ सांग." मी

"काय ते नीट माहीत नाही. पण कोणीतरी सखाराम आला होता. त्याला सांगत होते. बरोबर नादाला लाव आबाला. सोडू नको. घराची वाट लागली पाहिजे. मग बघतो एकटी काय करते ती? सगळे मला सोडून जातात तसा तू जाऊ नको. काय खर्च होईल तो सांग. दाम दुपटीने देईन. पण काम पुरे झालेच पाहिजे नाहीतर तुझे घर बुडवीन. अशी धमकी दिली. मी चहा पाणी विचारायला म्हणून गेले तर खोलीत चाललेले हे बोलणे ऐकले. तुमच्या बद्दल आहे हे समजले. पण नक्की काय ते नाही माहीत पडले."

मी विचार कर कर केला. हल्ली घरात सर्व काही व्यवस्थित होते. सखाराम कोण ते ध्यानात येईना. हे देखील पूर्वीप्रमाणेच सर्व व्यवहार करीत होते. कुठेच काही विपरीत घडतेय अशी चिन्हे दिसत नव्हती. मग काय असेल?

काकी सासूबाईंकडे बोलले. कोणी सखाराम माहीत आहे का ही चौकशी करून बघितली. मग सर्व काही सांगीतले तर म्हणाल्या "पोरी! सांभाळ गो आबाला. काहीतरी करणी करायच्या मागे असेल तो भाऊसाहेब."

पण पुढे दोन महिने झाले तरी काही विशेष घडले नाही. मनुष्य स्वभावा प्रमाणे मी देखील हे विसरून गेले. एकच गोष्ट मात्र घडत होती. हे कोर्टाच्या कामाला म्हणून जिल्ह्याच्या गावी वारंवार जाऊ लागले. स्वातंत्र्य मिळाले, जमिनींचे कायदे बदलताहेत. बागाइती व जिराईत जमिनींची नोंद बरोबर करून घेणे जरूरी आहे म्हणायचे. म्हणून जिल्ह्याला जावे लागते म्हणायचे. या गोष्टी मला जास्त समजत नसत.

दिवस भरभर चालले होते. मी परत गरोदर होते. माहेरी घरे वेगळी झाली होती. एकट्या मायला माझे बाळंतपण कसे जमणार? आईपण एकटी तिच्यावर कसा भार टाकायचा? मी माहेरी काहीच कळवले नाही. ठरवले घरीच सगळे करायचे. आणि माझे तिसरे बाळंतपण इनामदारांच्या घरीच झाले. दुसरा मुलगा झाला. महिन्याभरात परत सगळे होते तसे चालू झाले.

शामदादा आई व मायला घेऊन आला. आई म्हणाली "रुक्मे! विसरलीस आम्हाला? कसं सांभाळलंस ग एकटीने? आली असतीस तर मी आली असते तुझ्या मायला मदत करायला. वेगळे झालो तरी आम्ही तिघी एकमेकाना धरून आहोत. प्रसंगाला एकमेकीकडे मदतीला धावतो."

"आई खरे म्हणतेस तू. पण आपला संसार आपले घर दुसऱ्यावर भार टाकून किती दिवस चालवायचे? या वेळी माझा फार तर महिनाच गेला. बाकी सगळे दिवस मी काम बघू शकले." मी

"अहो तुमची पोर लक्ष्मी हो. सगळ्याना मायेने करते. कामवाल्या बाया पण माया करतात तिच्यावर. भागेल्यांच्या बायका पण धावतात मदतीला. सगळ्याना मायेन बांधलेन तिने." काकी सासूबाई सांगत होत्या व मायने एकदम हुंदका देवून रडायला सुरवात केली. आई तिच्या पाठीवर हात फिरवू लागल्या.

मनात आले, ह्या दोघी पंधरा सोळा वर्षाच्या होईपर्यंत एकमेकाना ओळखत देखील नव्हत्या. आज किती एकमेकात मिसळून गेल्यात. सख्ख्या बहिणींच्या प्रेमापेक्षाही जास्त

प्रेम आहे या तिघीतही. ही सगळी आईची करामत आहे, तिचे कुटुंब एक ठेवायसाठी पेरलेले व जोपासलेले प्रेम आहे. पुरुषात भाऊ असून देखील ती जवळीक नव्हती आली. इथे तर रक्ताचे नाते नसताना रुजवलेल्या अपूर्व प्रेमाचा साक्षात्कार दिसत होता.

"माय रडतेस कशाला? मी येणार नाही असं नाही पण खरं सांगू माहेरी कुठे जाऊ तेच समजत नाही. तीन तीन घरे झाली. गोकुळासारखं एक घर होतं त्याचे तीन भाग झाले. एकीकडे आई, दुसरीकडे माय. आमची कुचंबणा होते ग कुणाकडे पहिले जायचे? मी तुझी पोरगी पण आईनी घडवलं सगळ्यांना. तिला प्रेम पहिलं द्यावं वाटतं. मग तुला वाईट वाटेल याची काळजी वाटते. कसं करायचं ग आम्ही मुलींनी?" माझे मन असे झरझर वहात होते. माहेरची फाळणी जी मनात घर करून बसली होती तिला पूर येवून बाहेर पडत होती.

"आलीस तर पहिली आईकडेच ये. मग माझ्याकडे. मला जरापण वाईट नाही वाटणार. मी देखील आठवड्यातून एकदा तरी जाते त्यांच्याकडे. जीव नाही रहात गेल्या शिवाय. मग तुला कसं सांगू माझ्याकडेच ये पहिली?" माय मन उघडून बोलली. अगदी मनापासून बोलत होती.

मग सगळे बाळाला घेण्यात खेळवण्यात गुंतले मी फराळाचे बघायला गेले. चहा फराळ घेऊन आले व मुलांना बोलावले.

आजींनी बोलवताच राघव लुटूलुटू धावत आला. माली आली पण शिष्टा सारखी लांब बसली. आईने बोलावले तर म्हणाली "मला नाही आवडत मांडीत बसायला. मी आईच्याही कुशीत झोपत नाही." मी ऐकले व तिला ओरडले. "माली! काय बोलतेस? असे बोलू नये मोठ्यांना. तुला भेटायला आल्यात त्या. आज्या आहेत तुझ्या." मग ती गुश्यांत बसली पण त्यांच्या जवळ काही गेली नाही. मला तिची काळजी वाटे. केवढी हेकट होत होती. बोलण्यात उर्मट पण होत होती. माझे बोलणे मनावर घेतच नसे. कित्येक वेळा वाटे ही अशी कशी झाली. पोरीच्या जातीला न शोभणारा ताठा तिला जन्मजात आला होता. राघव मात्र लाघवी व समजूतदार दिसत होता. कोण जाणे मोठा झाल्यावर कसा होईल.

आई, माय त्या दिवशी राहिल्या व दुसऱ्या दिवशी गेल्या. पण भेटल्याचे समाधान वाटले. माहेरची सगळी माहिती मिळाली.

मायचे घर फार लांब होते. छोटी काकी त्या मानाने जवळ होती. आईच्या म्हणजे आमच्या मूळ घरापासून तासभर चालावे लागे तेव्हा मायचे घर येई. छोटी काकी पंधरा

मिनीटावर होती. दररोज दुपारी जेवणे आटपली की छोटी काकी हजर व्हायची. म्हणायची "कामच नाही गे. इथे एवढ्या सगळ्यांचे काम करायची सवय, तिथे अर्ध्या दिवसात आटपते सगळे. मग आठवण येते इकडची."

मग माय आली की तिघीय एकत्र व्हायच्या. तो खरा आनंद असायचा त्यांचा. घरे वेगळी झाली तरी मने जोडलेलीच होती. प्रत्येकाची शेती, भागेली वाटले गेले होते. आंब्याच्या दोनच वाड्या होत्या. त्या एकत्र ठेवून आंबे उतरले की वाटप व्हायचे. कधी छोटे काका व माझे बाबा वाटप करायचे तर कधी मोठे काका व माझे बाबा करायचे. हजर नसेल त्यांचा वाटा बरोबर मिळतोय हे बघितले जाईल अशी ही व्यवस्था होती. मधले काका म्हणजे माझे बाबा मात्र कायम असायचे. एकाचा जरी अविश्वास असला तरी कुटुंबात कशी परिस्थिती होते ते दिसत होते. मायची मेहनत वाढली होती. शेतीच्या कामात गुरू व बाबा जास्त लक्ष घालत नसत. मायच सगळे करवून घेई. थकून जाई बिचारी.

आईला समजे. मग तिच्या, आमच्या मूळ घरापासून जवळ असलेल्या शेतीत आई कोणाला तरी मदतीला पाठवे. वेगळे झाले तरी एकमेकांच्या अडचणीत साथ देत होते,

नाहीतर इकडे इनामदारांकडे नुसते वैर. मन नेहमी दडपणाखाली असे. भांडण केव्हा कुठून सुरू होईल समजत नसे. पण हल्ली सगळे शांत वाटत होते. पण मनात वेगळेच येई. भाऊसाहेब काही न समजेल असे करीत तर नाहीत? साप पाळून काय करणार होते? सखाराम कोण काहीच समजत नव्हते. मनोमनी वाटे पडद्याआड काहीतरी चालू असणार. काय असेल?

*****

## १२

**आबासाहेब-**

हिला आता आमच्या साठी वेळच नसतो. दर दीडदोन वर्षानी बाळंतपण असते मग चार सहा महिने त्यांतच गुंतते. आम्ही हिशोबा शिवाय कशात लक्षच नाही घातले. आता नवे सरकार येणार. ईंग्रज गेले. नवे सरकार नवे कायदे करणार म्हणे. राजांची राज्ये खालसा करून एकसंध राष्ट्र बनवत आहेत. पुढच्या वर्षी पहिल्या निवडणूका होतील. मग नवे कायदे येतील. वतने, जहागीर, इनामे सगळे खालसा करणार असे म्हणतात. चांगला वकील गाठून सल्ला घेतला पाहिजे.

आपली इनामदारी नाही पण जमीन, बागा तरी वाचवल्या पाहिजेत. भागेल्यांचे हिशोब हीच सांभाळते. शिक्षण नसले तरी कसे हिशोब सांभाळते समजत नाही. पण ही सगळे कसे व्यवस्थित व वेळच्या वेळी करते.

जिल्ह्याच्या गावी चांगला वकील मिळालाय. थोड्याच दिवसांत कसेल त्याची जमीन हा कायदा येणार म्हणाला. बागायती जाणार नाहीत पण भातशेती व इतर पिकांच्या जमिनी जातील. जुनी खंडकरी कुळे जमिनीतून काढा व नव्यांना जमिनी द्या. दरवर्षी अदला बदल करीत रहा म्हणाला वकील. खंडकरी कुळांना कसे समजवायचे? एवढी वर्षे शेती केलेली जमीन सोडतील कसे? बरे कुळांचे व्यवहार हीच पहाते. मग माझे कसे ऐकतील? सगळे प्रश्न एकदम डोके फिरवू लागले.

हॉटेलात चहा पीत बसलो होतो. विचार चालूच होते एवढ्यांत एक माणूस आला म्हणाला, "रामराम इनामदार"

"आपण? मी ओळखलं नाही." मी विचारले

"आमी इनामदारांचेच भागेली. पयली तुमची घरे एक होती. आता दोन वाटे झाले. आमी दुसऱ्यांचे भागेली पण आमाला आटवता तुमी अजून. मी सखाराम पवार. जिल्ह्याला कसे?" तो.

मग तो खूप अघळ पघळ बोलू लागला. भाऊसाहेबांचा त्रास फार, आमचे भागेली इनामदारीणबाईला मानतात, ते सगळे सुखी आहेत. भाऊसाहेबांची रयत दुःखी आहे. मी मधेच म्हणालो "हे बघा मला नसती भानगड नको. तुम्ही त्यांचे भागेली. मला भेटलात समजले तर तुम्हालाही त्रास आणि आमच्यातही वाद सुरू होतील."

तो एकदम रागात म्हणाला "गेले ते दिवस भाऊसायबांना घाबरायचे. भागाचा हिशोब दिला की आम्ही आमच्या मर्जीचे मालक. भाऊसायबांशी आमचे अगोदरच वाद झालेत. ते काय बोलतील? आणि आता नवे कायदे येतायत. जमीन आमची होणार मग भाऊसाहेबांना कोण विचारतो."

मी धसकलो सगळ्या कुळांना, भागेल्याना समजले असेल नव्या कायद्याचे तर आपले काम कठीण होणार. तरी धीर करून म्हटले "तुमच्याकडे त्यांची शेत जमीन किती आणि बागाईत किती आहे? शेत जमीन मिळेल पण बागाईत मिळताना कठीण. कायदा काय येतो कुणाला ठाऊक."

"अहो कायदा गरीबांच्या बाजूचा येणार. राजे गेले आता इनामदार, वतनदारय जाणार." तो.

मी आणखी विचारात पडलो. घरी यायला रात्र पडली. जिल्ह्याहून नुकत्याच सर्वीस मोटारी सुरू झाल्या होत्या. आमच्या गावापासून दोन मैलावर स्टॉप होता. गाडीत चढलो तर सखाराम जागा पकडून बसला होता. मला बघताच बोलावले. स्टॉप वर उतरे पर्यंत तोच बोलत होता. उतरायची वेळ आली आणि जोरात पाऊस सुरू झाला. झाडाखाली थांबलो तर सखारामने खिशातून बाटली काढली. मला म्हणाला "पावसात भिजलात तर शीक पडाल. हे औषध घ्या. थंडी, पाऊस बाधत नाही."

मी नाही म्हणत होतो तरी त्याने बाटली माझ्या हातात जबरदस्तीने दिली. दुसरी बाटली काढून स्वतः पिवू लागला. लहान चपटी बाटली होती. आंत पिवळसर तपकीरी सरबत भरलेले दिसत होते. मी पहिल्याच घोटाला समजलो ही ईंग्लीश दारू आहे. कित्येक दिवसापासून वाटे एकदा इंग्लीश दारू पिऊन पहावे. मागे एकदा ईंग्रज पोलीस गावात आला होता. दोन दिवस आमच्याकडे राहिला होता. मी सहा सात वर्षाचा होतो त्यावेळी. संध्याकाळी तो असलीच पण मोठी बाटली उघडे व माडीवर पीत बसे. एक वेगळाच वास येई. सरबता सारखे काहीतरी असावे असे वाटले. मग ते पिण्याची जबर इच्छा झाली. आज अचानक सखारामने बाटली पुढे केली.

"अरे हे तर ईंग्रज पितात तुला कुठे मिळाली?" मी विचारले.

“जिल्ह्याला दारू दुकान आहे तिथे मिळते. मी जातो तेव्हा आठदहा बाटल्या आणतो पावभाराच्या. सहा सहा आण्याला मिळतात. मोठी पुरी घेतली तर रुपयाला पडते. बरी लागली ना? पण पुरी पिवू नका. गरगरेल. अर्धी आता प्या अर्धी उद्या.” तो सांगत होता अर्धी बाटली पोटात गेली आणि छान वाटायला लागले. थंडी पळाली. पाऊस पडत होता तरी तरतरी आली होती व पावले झपझप चालत होती. दुकानाचा पत्ता विचारावा वाटत असताना सखाराम म्हणाला “जिल्ह्याला गेलात की आणून ठेवा दोन चार बाटल्या नायतर मी गेलो तर आणीन तुमच्या साठी. पण माझ्याकडून न्याल तर, मी वाड्यावर तुमच्याकडे येणार नाही. भाऊसाहेबाची कीरकीर कशाला फुकट.” मी काहीच बोललो नाही.

गाव आले सखारामचा रस्ता वेगळा झाला. मी घरी पोचलो. रात्र केव्हाच पडली होती. आंघोळ करून कपडे बदले पर्यंत ही जेवण घेऊन आली. जेवून झोपलो तर गाढ झोप लागली.

सकाळी मात्र डोके पकडल्या सारखे वाटत होते. ही चहा घेऊन आली. म्हणाली “काल फार दमले होतात वाटते. एकदम गाढ झोपून गेलात.”

“हो! आणि पावसानेही चांगलेच भिजवले. झोप लागली मग. मुले ठीक आहेत ना?.” आबासाहेब.

“मुले ठीक आहेत पण काल भागेल्यांकडे गेले होते. नारळ सुपाऱ्यांचे पाडप झालेय. भाग बरोबर करतात हे बघायला गेले होते.” मी.

आता केव्हा जिल्ह्याला जाऊ असे वाटत होते. यावेळी इंग्लीश दारूच्या बाटल्या आणायच्याच असे ठरवले. जीव काही रहात नव्हता. कसेतरी चार दिवस काढले व कामाचे निमित्त करून जिल्ह्याच्या गावी गेलो. संध्याकाळ पर्यंत इकडे तिकडे भेटी घेऊन वेळ काढला. काकींसाठी व हिच्यासाठी एक एक साडी खरीदली. चांगल्या चार उंची बाटल्या खरीदल्या. दुकानदाराने छान खोक्यात भरून बांधून दिल्या व घरी परतलो. बस मधून उतरून निघालो तर हातचे खोके घेऊन माझा भार हलका करणारे भेटले. घरा पर्यंत पोचवायला आले.

घरी पोचलो व सरळ माडीवर जाऊन बाटल्या कपाटात ठेवल्या. साड्या घेऊन खाली आलो. काकीला साडी दिली तर म्हणाली “दिवाळी नाय, गणपती नाय मधेच साडी आणलीस?”. मनात आले काकी व हिचे बाटल्यांच्या पार्सलवर लक्ष जाऊ नये म्हणून

साड्या घेतल्या खऱ्या पण त्यामुळे त्यांना संशय तर येणार नाही? चार बाटल्या महिन्या भरात संपल्या. गाढ झोप लागे.

एकदा हिने विचारलेच "दररोज रात्री त्या बाटलीतले काय पिता ते औषधच आहे ना? की दुसरेच काही?"

आता पर्यंत औषध म्हणून सांगीतलेले सर्वांनाच पटले होते. मग भीड चेपली. नवीन बाटल्या येत होत्या. मी आणल्या की सखाराम कधीमधी घेऊन जाई. मग मला देखील आणून देई. आम्ही बाहेर देवळाकडे भेटू.

एके दिवशी काकी बडबडू लागल्या "अरे तुझी लक्षणं काय ठीक नायत रे. औषद पितोस मग धडपडत चालतोस. अरे सारखे औषध कशाला रे? आता बंद करून बघ थोडे दिवस. नाय तर त्याचाच नाद लागेल. नायतरी इनामदार तुम्ही! पटकन नादी होतात रे."

जरा बावचळलो. उत्तर सुचले नाही. माडीवर गेलो. विचारात बसलो. मुले हीच सांभाळते. माझ्याकडे मुले यायला घाबरतात. भागेल्यांचे हिशोब हिच्याचकडे. घरातला सगळा व्यवहार कामे हीच पाही. पैशांचा हिशोब व कोर्ट कचेरी ही माझी कामे. मला दररोज असे कामच नसे. वेळ जाण्याचे साधनच नाही. हिशोब ठेवायला देवळे होते. ते सकाळी येऊन सगळे आटपून दुपारी घरी परतत. हल्ली ते कुरकुर करीत. एकदा तर म्हणाले देखील. "साहेब पंधरा पंधरा दिवस तुम्ही हिशोब पहात नाहीत. पहात जा. मीही माणूस आहे चूक होऊ शकते. वेळच्या वेळी सुधरायला येईल. पहात जा जरा. आणि ती इंग्लीश दारू जास्त घेत जाऊ नका. तब्येतीला वाईट ती."

त्यांचे शेवटचे वाक्य ऐकून मी गडबडलो. याना माहीत होते तर. घरात बोलले तर सगळेच उघडे पडेल. ते वडिलांच्या वेळे पासूनचे हिशोबनीस होते, वयस्क होते, घरात मान होता. पण वेळ मारून नेली. पिणे सोडायचा विचार बरोबर वाटे पण संध्याकाळ झाली की हात कपाटाकडे जात. आता पुरी संवय लागली होती.

एक दिवशी देवळेनी सांगीतले. वय झाल्यामुळे त्यांना जबाबदारी पेलवत नाही. दुसरा हिशोबनीस पहाण्यास सांगून ते निघून गेले. परत आलेच नाहीत. आता दररोजचे हिशोब लिहीणे थांबले.

कोणाचे येणे केवढे ते माहीतच पडेना. व्यापारी येवून नारळ सुपारी घेऊन जात. पैसे दोन महिन्यांत हळू हळू देत. पैशांचा हिशोब लिहीलाच नाही तर येणे समजणार कसे? लिहायला बसलो की कंटाळा येई. मग सकाळीच बाटलीची आठवण होऊ लागली.

मधेच हिचे बाळंतपण येई. मग आणखी एकटेपण. आता तर बाटलीच प्रिय झाली होती. घरात सर्वांना माझे व्यसन माहीत पडले होते. काकींचे बडबडणे. हिने दिलेले समज वजा प्रवचन सगळे हळूहळू थांबत गेले. वर्षे जात होती व बाटल्यांची संख्या वाढत होती.

राघव नंतर माधव जन्मला, त्यानंतर दोन वर्षांतच छोटी मितू आली. काकी म्हणे घर गोकुळा सारखे वाटते. एकच गालबोट आहे, आबासाहेबांचे व्यसन.

माझ्या कानावर पडे. थोडे शरमल्यासारखे वाटे. वाटे पिणे बंद केलेच पाहिजे. पण विचारांचा ताण वाढला की कपाट उघडून बाटली आपसूकच बाहेर काढी.

मितूच्या जन्मा नंतर चार एक महिने झाले असतील. ही एकदम वर आली. मी माडीचे दार बंद करायला विसरलो होतो. मला पिताना पाहून चेहेरा नाराज झाला.

"हे पहा! आजकाल मर्यादा सुटत चालली आहे. सकाळ पासूनच पिणे चालू होते. चार मुले आहेत आपल्याला. त्यांचे शिक्षण, संस्कार याची जबाबदारी आहे तुमच्यावर. मी शिकलेली नाही. कोण आहे त्यांना पहायला? आणि आपल्या चेहेऱ्याकडे पहा. किती काळवंडले आहात. हल्ली व्यापाऱ्यांचे हिशोब होत नाहीत. वेळेवर पैसे येत नाहीत. घर चालवताना कठीण पडू लागले आहे. मी एकटी किती दिवस सांभाळणार? मुलांसाठी, आमच्यासाठी तरी यातून बाहेर पडा. कामात लक्ष घाला. व्यसन आपोआप कमी होईल." ही बोलत होती. शरमेने मला मेल्या सारखे झाले होते. ही निघून गेली. शरमेने मान खाली घालून बसलो होतो. ती खरच बोलली होती पण मला काम करणे जमतच नव्हते. एक पती म्हणून, एक बाप म्हणून मी नालायक ठरलो होतो. इनामदारी म्हणजे छानछौकी हेच मी सिद्ध करीत होतो. मी सगळ्यांना त्रास देत होतो. गोकुळ झालेल्या घराला मी शाप झालो होतो. मी माणूस म्हणून फार खोटा ठरलो होतो. विचार चारी बाजूनी फेर धरून मला खिजवीत होते.

शेवटी डोके भणभणू लागले. उठलो माडीचे दार बंद केले. बाटली व ग्लास काढून पीत बसलो. हळू हळू भान हरपत होते. दुःख विसरत होतो. पिता पिता आडवा झालो. उठलो तर समजेना किती वेळ झाला ते. परत निष्क्रियतेचे विचार मनात भरू लागले. विसरणेच चांगले वाटू लागले. हात आपोआप बाटलीकडे गेले. परत केव्हा भान हरपले ते माहीत पडलेच नाही. चांगले चार पांच वेळ असेच झाले. मग मात्र पोटांत भूक लागल्या सारखे वाटू लागले. धडपडत जाऊन माडीच्या दाराची कडी काढली व परत येवून अंग पलंगावर झोकून दिले.

किती वेळ गेला कुणास ठावूक. थंड पाण्याची घडी कोणीतरी कपाळावर ठेवीत आहे असे वाटले व जाग आली. सगळीकडे लख्ख प्रकाश होता. दुपार झाली होती. डोक्याकडे कोण आहे ते मान वर करून पहायला लागलो. ही उभी होती. चेहरा चिंताक्रांत दिसला. डोळे रडून सुजल्या सारखे दिसत होते. मी उठून बसलो. डोके चक्कर खात होते. एवढ्यात ही बोलली, “जेवणार? जेवण आणले आहे. दोन दिवस झाले पोटात काही नाही. दाराला कडी लावून झोपू नका. आम्हाला काहीच करता येत नाही मग.” आता तिचा आवाज कापरा झालेला जाणवत होता.

मला एकदम धक्काच बसला. दोन दिवस न खाता पिता मी स्वतःला कोंडून घेतले होते? फक्त दारूच पीत बसलो होतो? इतका कसा अमानुष झालो, निर्दय झालो? काय अवस्था झाली असेल घरच्यांची? मुलाना काय वाटले असेल? आता काकी दोष लावणार, जिव्हारी लागेल असे बोलणार. त्यांच्या समोर जाताच नये. किती शरमेची वर्तणूक आहे ही. आपण बदललेच पाहिजे.

ही लगबगीने जेवण घेऊन आली. पोटांत फार जळजळ होती, भूक जोरात लागल्या सारखे वाटत होते. जेवणावर तुटून पडलो. ही खाली जाताना म्हणाली, “माडीच्या दाराची आतली कडी मी खेचून काढली आहे. परत कधी कडी लावून बसू नका.” मला काहीच बोलता आले नाही. सगळेच शरमजनक होते, काय बोलणार?

जेवून झाल्यावर खाली जायचा विचार करून उभा झालो तर धडपडलोच. कसाबसा सावरलो. मग माडीवरच येरझाऱ्या घालू लागलो. हळू हळू चालणे सरळ होऊ लागले. मग माडीवरच्याच माझ्या न्हाणीघरात डोक्यावर थंड पाणी घेत बसलो. मनात ठरवले यापुढे असे प्यायचे नाही.

पुढचे काही दिवस कपाटाला शिवलोही नाही. काकींचे आकांडतांडव, बडबडणे सगळे दोन दिवसात आटपले होते. ही मात्र चेहेऱ्यावर चिंता घेऊनच फिरत होती बोलत काहीच नव्हती. दिवस जात होते आणि एक लक्षात येवू लागले. ही आपल्या पासून दूर होतेय, मुलांबरोबर जास्त रहाते.

मग सगळाच आढावा मनात सुरू झाला. लग्न होई पर्यंत आई व काकींच्या सांगण्याप्रमाणे वागत होतो. लग्ना नतर सगळी इनामदारीची कामे हीच पाहू लागली. पाहू काय म्हणू! रीतसर भागेल्यांना सरळ केलेन. उत्पन्न दामदुपटीने घरात येवू लागले. सगळे नोकर चाकर अतोनात मानत. तिचा शब्द पडू देत नसत. आपण भाऊसाहेबाला घाबरून घरात बसून होतो. ही त्याच्याच घरात शिरून त्याच्यासमोर उभी ठाकली होती.

भाऊसाहेब पळून गेला होता. त्याची बहीण हिची खास मैत्रीण. किती किमया करते ही बाई? नाहीतर मी इनामदारीच्या प्रतिष्ठेच्या बुरख्यामागे दडलेला एक शेळपट, भ्याड माणूस. चार मुलांचा बाप होण्याचा पराक्रम गाजवणारा एक सांड. मग या घरात इनामदार आहे की इनामदारीण?

मी एक भेकड, पळपुट्या माणूस तर ती दुर्गेचा अवतार. आपण कसला पुरुषार्थ दाखवणार तिच्या समोर. काकी तर तिलाच मानतात. भागेली तिच्या कडेच सरळ हिशोब करतात, नोकर चाकर तिचाच हुकूम मानतात. शब्द जरा देखील पडू देत नाहीत. मग मी कोण? एवढी आपल्या पुरुषार्थाची नाचक्की झालीय. इनामदार म्हणून लोक तोंडावर बोलत नसतील पण मागे बोलतच असतील.

आज विचारांचे काहूर जरा देखील शमत नाही. डोके भणभणून गेले आहे. आज पराभव पचवण्याची ताकद नसल्याचे जाणवतेय. एकच उपाय आहे. बाटली. भरपूर पिवून सगळे विसरून जाऊ. नकळत पाय कपाटाकडे गेले. बाटली, ग्लास, पाणी टेबलावर मांडले. मग आठवले, माडीच्या दरवाजाची कडी हिने उचकटून काढली आहे. हिला शिकवलेच पाहिजे. दार बंद केले. टेबल ढकलत नेवून दाराला अडवून ठेवले. बाहेरून दार उघडणे आता शक्यच नव्हते. आता मी पिणार सगळे विसरणार. तोच या दुःखावरचा उपाय आहे.

शांतपणे ग्लासांत बाटली ओतू लागलो. संध्याकाळ होत होती. दोन तास तरी कोणी माडीवर येणार नव्हते. हळू हळू ग्लास रिकामा करीत बसलो. इनामदारीण बाई माझ्या प्रतिष्ठेला धक्का दिलाय तुम्ही. घ्या! आम्ही तुम्हाला शिक्षा करतोय. आमची शांती घालवलीत आम्ही तुम्हालाही शांती लाभू देणार नाही. इनामदाराना अपमान सहन होत नाहीत माहीत नाही?

*****

## १३

## रुक्मिणी-

आज चौथा दिवस. माडीचे दार उघडलेले नाही. काय परिस्थिती झाली असेल यांची? पोटात बाटलीतल्या त्या नशेच्या पाण्याशिवाय काहीच गेलेले नाही. बरे असतील ना? नोकरांची मदत घ्यावी तर सगळ्यांनाच माहीत पडेल. काकीनी तर रडून गोंधळ घातला होता. त्या आता धीर सोडत होत्या. तोंडाची टकळी चालत होती. मग एकदम म्हणाल्या "इनामदारानी वशाड माणसाला दत्तक घेतले. त्यांचाच पोर हा. आजा दारुड्या, बाप दारुड्या मग हा देखील झाला तर नवल काय? काय उपयोग नाय गो तुझ्या मेहेनतीचा. हा घालवणार सगळं. कंगाल करेल घराला. कशी वाचवणार आहेस गो तू आता? चार चार पोरांना कशी सांभाळशील?"

आयुष्यांत पहिल्यांदा पाया खालची जमीन सरकतेय असे वाटले. काकींच्या बोलण्यातून जी भिती निघत होती ती सरळ माझ्या काळजांत घुसून घर करत होती. मग निश्चय केला प्रतिष्ठेचा बागुलबोवा करण्यात अर्थ नाही. दोन गड्यांना बोलावले. माडीच्या दाराला धक्के मारत मारत दार किलकिले केले आणि आतून कण्हण्याचा आवाज ऐकू आला. टेबल फार सरकत नव्हते म्हणून एक गडी मोठा दांडा घेऊन आला. दाराच्या फटीतून आंत घालून त्याने टेबलाला उलथवले. आता दार खूपसे उघडले होते. त्यांतून दोन्ही नोकर आत गेले. टेबल बाजूला करून त्यांनी दार उघडे केले. एवढ्यात एकजण औरडू लागला "बाईसायब आत येव नकोत. घाण झालीय सगल्याच कडे. आमी साप करतोव मंग येवा."

मी न ऐकता आत गेले. आबासाहेब इनामदारनी सगळी कडे ओकून घाण करून ठेवली होती. पलंगावर झोपण्या ऐवजी ते जमिनीवरच पसरले होते. कपडे सगळे घाण झाले होते. तीन बाटल्या रिकाम्या होऊन पडल्या होत्या. मनातील राग, किळस, अपमान, नोकरांसमोर आलेली लाज, सगळे बाजूला ठेवून त्यांना उचलून न्हाणीघरात न्यायला

सांगीतले. एवढ्यात मागून आवाज आला. “वा! काय दिवस दाखवलाय मरता मरता.” मागे काकी दुखऱ्या सांध्यांची पर्वा न करता माडीवर आल्या होत्या. रागाने फुलून गेल्या होत्या. त्यांना मी खाली जायला विनवणी केली पण त्या मुळीच हलल्या नाहीत. थंडपाण्याने आबासाहेबाना कपड्यासकट धुवावे लागले. नोकर धूत होते व मला लाजीरवाणे होत होते. ते न्हाणीघरात देखील धड बसू शकत नव्हते. थंड पाण्याच्या माऱ्याने थोडे सावध झाल्यासारखे वाटले. काहीतरी बडबडू लागले होते. असंबद्ध वाटत होते. “इनामदार ऱ्हायलो नाय, राज्य दुसऱ्यानी बळकावले,” असले काहीतरी ते बडबडत होते. मला समजत नव्हते कसले दुःख होते ते. सर्व तर व्यवस्थित पूर्वी सारखेच चालले होते मग यांची इनामदारी कोणी बळकावली?

नोकरांनी स्वच्छ पुसून नवीन धोतर नेसवले. व खुर्चीत बसवले एवढ्यात खालून निरोप आला, जिल्ह्याच्या गांवाहून कोणीतरी आबासाहेबाना भेटायला आले आहे. मागोमाग एक माणूस माडीवर आलाच. व्यवस्थित कपडे पाहून मला तो सरकार दरबारी वाटला. मग आबासाहेबांची स्थिती पाहून तो म्हणाला “काय आजारी आहेत काय? बोलण्याच्या स्थितीत दिसत नाहीत. हे खोके पाठवले आहे. ते त्यांना द्या. बरे वाटले की पहातील.”

माझे चित्त थाऱ्यावर नव्हते. खोके एका बाजूला ठेवायला सांगीतले व विचारले “कोण आले होते म्हणून सांगू?”

“मी निरोप आणला होता वकिलांचा. व त्यांनीच हे खोके पाठवले आहे. माझे नाव सखाराम ते ओळखतात मला.” निरोप घेऊन तो माणूस निघून गेला. तो निघून गेला. चहापाणी विचारायचं राहून गेलं.

मी यांच्याकडे लक्ष देवू लागले. जेवण, खायला, कमीत कमी लिंबूपाणी, काहीतरी पोटात जायला पाहिजे होते. एकीकडे मन नाही नाही तो विचार करीत होते. काय कमी आहे यांना. माझं माहेर खोतांचं, हे इनामदार, उत्पन्न आमच्या तिप्पट चौपट. घरात माणसे आमच्या पेक्षा चौथ्या भागा एवढीच तरी देखील दुःख? का हे व्यसन? घर हळू हळू गोकुळ बनतय. चार लहान मुले घरात बागडतायत. मग आनंद करायचा की खोलीत कोंडून घेऊन पीत बसायचे? सुपारी नारळाची दोन दोन पाडपे तरी होतात, तांदूळ दोनशे तीनशे मणानी घरात येतो. शिवाय इमारतींचे भाडे नगद रुपयात येते ते वेगळेच. मग दुःख कसले? माझे काही चुकतेय काय? मग सरळ बोलून दाखवावं, की मनात कुढावं? काय केले म्हणजे समजेल यांचे मन.

कमी उत्पन्नात व जास्त माणसांत आम्ही कसे गुण्या गोविंदाने रहात होतो. इथे का नाही तसे? आईला विचारू तरी कशी? सासरच्या गोष्टी केलेल्या तिला चालणार नाहीत. मग आईने काय केले असते? एकदम प्रकाश पडला. आई कित्येक गोष्टी आजोबांकडे बोले व मग काय करायचे ते त्यांच्या मार्फत करे. मला काकीच मोठ्या त्यांना पुढे करावे लागेल.

हे आता हळू हळू शुद्धीवर येत होते. काहीतरी तोंडातच बरळत होते. एक वाक्य स्पष्ट वाटले "आम्ही... कसले... इनाम..दार....पु..पु..र..षार्थ....कुठे....." मग फक्त हं ...हं....असे बरळणे. समजेना का व कुणाबद्दल बोलतात ते. कसेतरी पेजेचा निवळ नोकराने चमच्याने पाजला. मग त्यांना उचलून आम्ही खालीच घेऊन आलो.

एका खोलीत पलंगावर झोपवले व मुलांना तिकडे जाऊ नका म्हणून बजावले. काकी त्यांच्या शेजारीच बसून रडत होत्या, नशिबाला बोल लावत होत्या. थोड्या थोड्या वेळाने लिंबू पाणी, पेज असले काही ना काही आम्ही त्यांना भरवीत होतो.

मी मधेच सगळी कामे बघून येत होते. दुपार होत आली होती. जेवण तयार होत आले होते. लवकर न्हाऊन पूजा करायला गेले. देवासमोर हात जोडून विचारले "काय चुकले बाबा? ती ही शिक्षा देतोयस आम्हाला?" नैवेद्य दाखवून आरती सुरू केली. आवाज कांपरा येवू लागला. पूजा आटपतच होती एवढ्यांत भाऊसाहबांच्या घरी फटाक्यांची माळ लावल्याचा आवाज येवू लागला. कसला सण उजवतायत देव जाणे. आमच्या घरचे सर्व समजले तर नसेल? कसे समजेल? दुसरेच काही असेल अशी मनाची समजूत काढली. पूजा आटपून घरात येत होते. नैवेद्याचं ताट घ्यासला भटीणबाई पुढे आल्या. त्यांच्या नजरेत माझ्या बद्दल खूप सहानभूती व दया दिसली. मी लगेचच सावरले. म्हटले "नैवेद्याचे ताट राघवला ठेवा." आवाज अचानक हुकमी झाला होता. सहानुभूती मला कधीच आवडत नव्हती. माणसाला फार लंगडे करते ती. आता मला काहीच झाले नाही अशाच प्रकारे वागायला लागणार होते.

दुपारी जेवून झाल्यावर मुलाना झोपवले व काकींशी बोलणे सुरू केले.

"काकी! याचा अंत आता तुम्हाला व मलाच आणायला हवा. मला जरा काही गोष्टी जाणायच्यात तुमच्या कडून. काय हो यांना काय दुःख आहे? " मी काकीना विचारले

"कसलं दुःख नी कसलं काय. कोण बोलणारे नाय, मनाचे मालक हे. वर इनामदारीचा बक्कळ पैसा. आजा दारूडा त्याचा पोरगा दत्तक घेतला तो याचा बाबा तो दारूडा. त्यांचेच हे दिवटे चिरंजीव, दारूडा होणारच गो तो. कसलं दुःख काय विचारतेस? उलट

सुखाचा आणि पैशाचा ओढा वहातोय घरात म्हणून असली थेरं सुचतात गो. चार पोरे आहेत, लक्ष्मी सारखी सगळे सांभाळणारी तू बायको आहेस. आणि सुख काय पायजे? पण त्याचंच अजीर्ण गो हे.'' काकी उसासत बोलल्या.

मी काही बोलणार तेवढ्यात आबासाहेब तिथे आले. आता चालत होते. धडपडत का होईना चालत आले होते. मग काकींचा पारा आणि चढला.

''या! आरती ओवाळूया तुमची. इनामदारांचे छानछौक करायला नकोत साजरे? आम्हाला मरताना लागू दे ना आबासाहेब पुरे पक्के इनामदार झाले म्हणून. म्हणजे सुखांत मरेन रे.'' काकी

''काकी थांबा! काही हवंय कां तुम्हाला?'' मी काकीना मधेच तोडून याना विचारले.

''थोडं वरण भात किंवा काही आहे का? पोटांत फार जळजळ आहे.''

''जेवण ठेवले होते खोलीत.'' मी.

''ते थंड झालेय.''

''आणते, गरम करून आणते मी.''

पटकन उठून खोलीतून ताट घेऊन आले. स्वयंपाक घरात जाऊ लागले. पाहिले तर काकी यांची कान उघाडणी करताना दिसल्या. जेवण गरम करून आणले. काकींच्या खोलीतच जमिनीवर बसून इनामदार जेवू लागले. बरीच भूक लागल्यावर माणूस जसा जेवतो तशाच हावभावात जेवत होते. इनामदार आणखी एक पायरी खाली घसरलेले स्पष्ट दिसत होते. नाही हे होता नये. त्यांचा मान, आब, प्रतिष्ठा सगळी जपलीच पाहिजे. काय केले तर ही दारू त्यांच्या पर्यंत पोचणार नाही. एका मागोमाग एक विचार येत होते.

काकी जे बडबडत होत्या ते इतका वेळ ऐकूच नव्हते आले. एवढी विचारात गुरफटले होते. यांनी बोलायला सुरू केले आणि लक्ष तिकडे गेले. हे सांगत होते.

''काय करू? ही इमानदारी बोचते आम्हाला. काहीच करत नाही. काही काम नाही. आईने कधी बाहेर जायला दिले नाही. भागेल्यांचे भाग पण कधी सांभाळले नाहीत. नेहमी दगाफटका होईल ही भिती घालून घरातच बसविलेत तुम्ही. मग देवळयांचा हिशोब तपासणे एवढेच काम. वसुली तेच करायचे. घरकोंबडे केलेत आम्हाला. लग्न करून दिलेत तेही एका अशा बाईशी की तिने सगळीच जबाबदारी उचलली. देवळे काम सोडून गेले. मान मोडून हिशोब लिहीत बसणे जमत नाही आम्हाला. कंटाळा येतो. जिल्ह्याच्या गावी गेलो की विरंगुळा वाटतो. साध्या माणसाला कुठेही जायला मिळते. आम्हाला जीवे मारतील ही भिती घालून घरचा तुरूंगवास. मग हे पिऊन सगळे विसरतो आम्ही. नाहीतर

इनामदारी बोचत टोचत रहाते. दुसरे जे सहजपणे करतात ते आपल्याला का जमत नाही असे मनात येते. सगळयाच बाबतीत नन्नाचा पाढा आमचा. आम्हाला अडवू नका. पिणे हाच एक या दुःखावरचा उतारा आहे, विरंगुळा आहे. समर्थपणे लढायला शिकवायचे सोडून गोंजारत घरात बसवलेत. दोन हात करायला शिकवले असतेत तर मानाने जगतोय असे वाटले असते. आज वाटते स्वयंभूला सोडलेल्या सांडात व आपल्यात फरक काय? आम्हाला अडवू नका. पुरुष व्यसनी असतात. कमीत कमी तिथे तरी पुरुषार्थ दाखवतो."

मी ऐकताना चक्रावत जात होते. किती वेगळीच आणि आत्मघातकी विचारसरणी होती यांची. लग्न झाल्यावर बोलले असते तरी भागेल्यांकडे बरोबर घेऊन गेले असते. शेतीची कामे बघायला भाग पाडले असते. कामात गुंतवले असते. पण माझा समज होता इनामदार असली कामे बघतच नाहीत. ते सर्वांचे राजे असेच वागतात. मला संसार सावरायचा तर सर्व कामे पहायलाच पाहिजे होती. मग एकदम समोर आली ती आई. बोलू लागली.

"रुक्मे! यालाच भोग म्हणतात गो! तू सगळे सांवरलेस तरी इनामदारांच्या घरी भोगच येणार तुझ्या वाट्याला असे वाटायचे. ते हे असे. अजूनही एक कर. बाटल्या घरात यायला देवू नकोस. पाहिजे तर बरोबर जा जिल्ह्याच्या गावी. समजव शांतपणे. मनातली भिती काढून टाक त्यांच्या. फार कठीण आहे गो आता हे करणे पण प्रयत्न सोडू नको. मूळ कुठे आहे, कुणाच्या नादाने हे व्यसन शिकले ते काढ शोधून. असा कोणी मिळाला तर सोडू नको त्याला. मुळापासून उद्धवस्त कर. भागवताचं कीर्तन ऐकलेस ना. श्रीकृष्णाला आठव. ही लढाई तुलाच लढायची आहे. केव्हा प्रेमाने तर केंवा मर्दुमकीने. मला खात्री आहे तू ही लढशील. आता नवऱ्याने दोष दिला तरी मुलांचा विचार कर. पुढच्या पिढीत हे विष, ही दुबळी ऐट, हा नसता अहंकार येणार नाही हे बघ. मी नेहमीच तुझ्या पाठीशी आहे." आई समोरून निघून गेली.

काकी रडत विनवण्या करीत होत्या "बघ रे बाबा चार मुलांचा बाप तू. तुला काय झालं तर त्यांनी कोणाच्या तोंडाकडे पहायचं? शेजारचा नागोबा बसलाय सगळे गिळायला. सोड हे नाद आणि कामांत लक्ष दे. सुटेल रे संवय."

"काकी, प्रत्येकाला स्वतःच्या कर्तव्याची जाण हवी. आपण लोकांना दिलेली वचनं प्राणपणाने पाळायला यायला हवीत. तरच तो माणूस पुरुषार्थाने भरलेला समजावा. कामं करायची संवय कोणी लावीत नाहीत. स्वतःती उचलायची असतात. कर्तव्य समजून मनापासून करायची असतात. प्रत्येक कुटुंबप्रमुख हा एक राजा असतो. चांगला राजा जसं

प्रजेचं हित बघतो तसं, कुटुंब प्रमुखाने आपल्या कुटुंबातील सर्वांचं कल्याण बघायचं असतं. तेच खरं कर्तव्य हो त्याचं. त्यांत चुकला त्याला देव कधीच माफ करत नाही. कर्म फळ म्हणून मग संकटं मागे लागली की माणूस नशीबाला दोष देतो, किंवा दुसऱ्याला बोल लावतो. आपली चूक, कमतरता, दोष माहीत करून घ्यायला त्याला आवडत नाहीत. मला व्यसन करणार नाही म्हणून सांगीतलेले आठवा म्हणते मी. वेळ जात नसेल तर जावे भागेल्यांकडे, पहावा हिशोब त्यांचा, मला तेवढाच घरात वेळ मिळेल. कुटुंबाचं सर्व व्यवस्थित चालावं ही माझी एकटीची जबाबदारी नाही हे देखील ध्यानांत घ्यावे. असा प्रकार, अशी धुण्या करण्याची परिस्थिती परत आली तर आम्ही काही करणार नाही. ज्याने त्याने आपले साफसुतरे व्हायचे व खाली यायचे. मला वाटले नव्हते एवढी लाजीरवाणी वागणूक असेल शिकलेल्या व इनामदार म्हणवणाऱ्यांची. बायको म्हणून जी कर्तव्य आहेत ती करायला कधीच ना नाही पण माणसाने आपली पातळी सोडली, शिष्टाचार सोडले, जनावरांसारखे वागू लागले तर आम्हाला पूर्णपणे इनामदारीण बनावे लागेल. सगळे अधिकार मग मझ्याकडे येतील. अगदी बाटल्या घ्यायचे पैसे देखील माझ्याकडे मागावे लागतील. किती अपमान वाटेल तेव्हा याचा विचार करा. आजनंतर याबद्दल कुठलेच संभाषण होणार नाही. जशी शेजाऱ्याना ठीक करायला बघतेय तशीच घरातल्यांनाही मी ठीक करीन. मला सगळयांचे कल्याण महत्वाचे. कुणाच्या रंग ढंगांमुळे कुटुंबाला दुःख सहन करावे लागणार असेल तर ते मी होऊ देणार नाही. आणि काकी रडून विनवण्या करणे सोडा. ताठर होऊन असल्या गोष्टींचा सामना तुम्हालाही करावा लागेल. असल्या संवयी विनवण्यानी सुटत नाहीत.”

मी शांत आवाजात एक एक वाक्य हळू हळू बोलत होते. नवऱ्या समोर उभी ठाकले होते. असे पूर्वी कधीच झाले नव्हते. पण जे बोलले त्यांत काहीही वावगे वाटत नव्हते. कुटुंब वाचवायचे असेल तर वेळीच कणखर व्हायला पाहिजे हे पूर्ण समजूनच मी बोलत गेले.

आबासाहेब उठले व निघाले काळा ठिक्कर पडलेल्या चेहेऱ्यावर एक चिंतेची रेषा स्पष्ट दिसत होती. खांदे खाली पडले होते. त्यांच्या अवगुणांमुळे आज त्यांना बोल लागला होता. तोही बायकोकडून. हा उपमर्द पचवणे कोणत्याही पुरूषाला जड जाणार हे माहीत होते. मग परत बाटलीचे सख्य होणार हे मी ताडले. नोकराला बोलावून याना खालीच खोलीत नेऊन झोपवायला सांगीतले. ते गेले तशी मी माडीवर गेले. कपाट, टेबलांचे खण, सगळे तपासले. बाटल्या कुठेच नव्हत्या. शांत वाटू लागले एवढ्यांत त्या

सकाळच्या माणसाने आणलेल्या खोक्यावर नजर पडली. खोके फार जड होते. वकीलाने एवढे काय पाठवले? खोके उघडले तर आंत सहा बाटल्या निघाल्या. काय तयारी केली होती यानी! आजच रात्री परत सुरवात होणार होती तर. नोकराला बोलावून खोके घेऊन यायला सांगीतले. खाली मधल्या अडगळीच्या खोलीत एका कोपऱ्यांत दडवले.

मग विचार करू लागले. सकाळी हे खोके आणणारा कोण? नाव काय त्याचे? पहिल्यांदा आठवेनाच मग आठवले सखाराम. सखारामच म्हणाला तो.

मग उज्वलाचे बोलणेही आठवले. भाऊसाहेबानी कोणीतरी सखाराम नांवाच्या माणसाला यांच्या मागे लावलेय म्हणाली होती ती. तोच तर नसेल? कितीतरी वेळ विचार चालला होता. आता ही लढाई शेजारच्या घराचा संशय आणीत होती.

रात्रीचे जेवण झाले व मी विषय काढला. काकी समोर होत्याच.

"सकाळी वकीलांकडून माणूस आला होता. कसले काम होते म्हणाला. काही असेल तर मी जाऊन येते जिल्ह्याला. कशाबद्दल काम आहे सांगा. वकीलांचा पत्ता द्या. जर तुम्हाला चालेल तर करून येईन मी." मी सांगीतले

थोडे विचारात पडले. मग म्हणाले "नको, मी जाईन दोन चार दिवसानी. पण कोण आले होते? वकील कधी निरोप पाठवीत नाहीत. आपल्यालाच तारीख लक्षांत ठेवून जावे लागते."

"सखाराम म्हणून कोणी आले होते." मी रोखून बघत सांगीतले.

त्यांनी चमकून माझ्याकडे पाहिले व मान वळवली. एकंदर हावाभावा वरून मी काय समजायचे ते समजले. तिथून निघून आले. नोकराना पकडून सांगीतले की त्या सखारामने आणलेल्या खोक्या बद्दल त्यांना काही बोलायचे नाही.

आता मुलांच्या मागे कामे होती. मितुची दिवसभर आबाळच झाली होती. इनामदारांच्या रंग ढंगात मुलांची आबाळ करून चालणार नव्हते. इतर कामेही पडली होती. रात्र चढत होती.

कामे आटपून काकींच्या शेजारीच पथारी लावली. मुले तिथेच झोपली होती. मग काकी उसासत असलेले ऐकू आले. उसासून काय होणार कणखर राहून मुलांना योग्य वळण लावले असते तर? भिती पोटी व एकच वंशज म्हणून लाड केले, कामाची संवयच नाही मग ऐदी होणार नाहीतर काय होणार?

"काय गो पारे, नवऱ्याला एवढे कोण बोलते कां? केवढी बोललीस आबासायबाला. डोक्यांत राख घालून निघून गेला तर काय करशील? संभाळ गो बाय." काकी मला

म्हणाल्या. आई होत्या त्या व काकीसासूबाई दोघीच मला पार्वती या सासरच्या नांवावरून पारे म्हणून बोलायच्या.

मी काहीच बोलले नाही. उगीच वाद कशाला. त्यांची विचाराची दिशाच वेगळी. प्रत्येक ठिकाणी भिती च वाटे.

चार सहा दिवस गेले. हे आता बाहेर फिरायला जाऊ लागले होते. घरात बाटल्याच नसल्याने पिणे होत नव्हते हे मला चांगले माहीत होते. मी दडवलेल्या बाटल्यांचा अजून तरी त्यांना सुगावा नव्हता.

एके दिवशी सकाळीच सखाराम हजर झाले. सरळ माडीवर जाऊ लागले. मी देखील मागोमाग माडीवर पोचले पण दारातूनच ऐकू लागले.. सखाराम सांगत होता "सहा बाटल्यांचा खोकाच दिला होता. तीस रुपयांचा होता. तुम्हाला दिला कसा नाही?" आबासाहेब बोलू लागले "ठीक आहे, ठीक आहे, हे घे तीस रुपये. कुठे बोलू नकोस. जा तू लवकर" मी वर गेले. काही ऐकलेच नाहीचा बहाणा करीत म्हणाले "वकीलांकडून आलात ना? काय झालेय कुठली केस चालू आहे?"

"नाही तशी काही केस नाही पण मलाच माहिती हवी होती. ती सांगायला आले होते हे. चला सखाराम निघा तुम्ही. आम्ही जाऊ वकीलांकडे एकदोन दिवसांत" आबासाहेब जरा गडबडून गेलेले दिसले. सखाराम निघाले मी देखील चहाचा पेला घेऊन निघाले. खाली आल्या बरोबर एक आठवले. उज्ज्वलाने सांगीतले होते भाऊसाहेबानी सखाराम नांवाच्या कुणाला तरी यांच्या मागे लावले आहे. तशीच वळले सखाराम वाड्याच्या पायऱ्या उतरत होते. मी जोरांत म्हणाले,

"सखाराम, भाऊसाहेबाना जाऊन सांगा, हे धंदे सोडा. मी पुरी पुरून उरेन त्यांना व तुम्हालाही. परत इथे यायचे विसराच पण बाहेर कुठे भेटता समजले तरी तुम्हाला सोडणार नाही."

सखाराम काहीच न बोलता झपझप पावले उचलत दूर जाऊ लागला. माझा तीर बरोबर लागला होता. हाच तो सखाराम, भाऊसाहेब त्याला गनिमीकाव्याने वापरत होते. आबासाहेबाना व्यसनी बनवून घर उध्वस्त करण्याचा कावा त्यांनी साधला होता.

मी नोकराला बोलावून सखारामच्या मागे पिटाळले. त्याचा पुरा माग काढायला सांगीतले. कुठे रहातो, कोणाला भेटतो, काय करतो सगळे शोध मगच परत ये म्हणून सांगीतले. चार सहा दिवस लागले तरी चालतील पण माहिती पुरी काढ हे मनावर ठसवले.

आता मला सर्व स्वच्छ समजू लागले होते. भाऊसाहेब आम्हाला नेस्तनाबूद करण्यासाठी काहीही करू शकत होते. सावध राहिले पाहिजे.

घरी बाटल्या येणे बंद झाले. एकदा जिल्याच्या गांवाहून येताना यानी चार बाटल्या आणल्या. त्या मी ताबडतोप फोडून टाकल्या. वर भाऊसाहेबांच्या कटाला बळी पडताहेत याची जाणीव दिली. मोजकेच बोलायचे बाकी अबोला असेच वागणे चालू ठेवले. चिडचीड, आदळाआपट काही दिवस चालली होती. भाऊसाहेबानी कसा डाव साधला ते काकीना मी सांगीतलेच होते. त्या सुद्धा आबासाहेबांची कान उघाडणी करत. हळू हळू परिणाम होत गेला. तीन चार महिने काहीच न मिळाल्याने व्यसन सुटायची आशा वाटू लागली. तरीही मी डोळयांत तेल घालून असे. हे जिल्ह्याला गेले की येई पर्यंत अस्वस्थ असे. रिकाम्या हाताने आले की जीव भांड्यात पडे.

................

................

हळू दिवस जात होते. आता धास्तावलेला जीव जरा शांत होत होता. आबासाहेब पीत नव्हते. मुलांशी खेळू लागले होते. काकी हल्ली सारख्या आजारी असत. त्यांच्या बरोबर बसत. गप्पा करीत.

एक दिवशी गुरु व बाबा भेटायला आले. आबासाहेबानी सांगावा पाठवलाय म्हणाले. मला नवल वाटले. मला काहीच न बोलता माझ्या माहेरच्या लोकांना का बोलावले समजेना. ते सगळे माडीवर आबासाहेबांबरोबर बोलत बसले होते. काकी म्हणाल्या “आबासाहेबांचा विचार आहे तुझ्या भावाला हिशोबाचे काम द्यायचे. मागे म्हणे तुझे बाबा म्हणाले होते. गुरुला मदतीला देतो म्हणून.” मी जरा दचकलेच. याना कुठे बोलावले मला विचारायचे तरी.

सगळे खाली आले. फराळ चहापाणी करून ते निघणार तोच मी म्हणाले मी यांना सोडून येते. मग वाटेत बाबाला बजावू लागले “बघ नात्यांत संबंध बिघडतील. तुम्ही हो म्हणाला नाहीत ना?”

“जावई ते, वर इनामदार. त्यांचा हुकूम मानलाच पायजे गो. गुरू येईल आठ एक दिवसानी तुझ्याकडेच आणि मी पण येईन मधून मधून.” बाबा मानभावी पणान बोलत होता व माझा रागाचा पारा चढत होता.

"मग गुरु बरोबर मायलाय पाठव दोन दिवस. भेटायचं वाटतं रे." माझं वाक्य ऐकताच बाबा सावध झाला, म्हणाला, "तिला कशाला? घरची कामे कोण करेल? पाठवीन मग सवड काढून"

"काय नाय रे गुरु, तूच सांग मायला मी बोलावलेय म्हणून. आणि नाय आणलंस तर जेवायला घालायची नाय. मी पण इनामदारीण आहे. बरंय या आता." असं बोलून मागे फिरले.

घरी काकीना धांप लागली होती. हल्ली केव्हा धांप लागेल त्याचा नेम नसे. गरम पाणी दिले, वासाचे तेल नाकाला लावले व वैद्य बुवाना बोलावणे पाठवले. चांगल्या चार पांच घटकांनी श्वास कमी झाला. रात्री त्यांच्याच बरोबर झोपले. सकाळची कामे आटपून त्यांना चहा दिला व बोलत बसले. सांगू लागले, गुरुला हिशोबाला ठेवलं ते काय पटले नाही. काय चूक झाली तर फुकट संबंध बिघडतील. त्या म्हणाल्या "मी बोलले त्याला. तुला विचार मगच ठरव. पण म्हणाला तुलाही सोबत होईल व घरचा माणूस बरा हिशोबाला, तू एवढी कामसू तसा भाऊ देखील असणारच. पण तुला सांगीतले तर तू नाहीच म्हणणार म्हणाला. मला पटले सगळे."

मी मनात म्हटले यांना काय माहीत. मला माझ्या अळवाची खाज चांगलीच माहीत आहे.

आठ दिवसांनी गुरु आला. माय आली नाही. आई म्हणे आजारी असते अधून मधून. पण दोन दिवसांतच आई व शामदादा येवून धडकले. मला फार बरे वाटले. गुरु घरात नव्हता. यांनी वसुलीला पाठवला होता. आई जरा खंगलेली वाटली. मग बोलत बसलो. आम्ही तिघेच होतो. गुरूचा विषय मीच काढला. आईला म्हणाले मला न विचारता परस्पर ठरवले. मला पसंत नाही, माझ्या माहेरच्यांनी इनामदारांची नोकरी करावी. एकतर माहेराला कमीपणा येतो आणि चुकी झाली तर संबंधही बिघडतात. मायला सांगा व काहीतरी कारण सांगून गुरूला परत बोलवून घे. आणि आई मधु येईल कां ग? तो आला तर यांचाही मान ठेवला असे होईल.

"अगो आता वेळ गेली. असं काय केलं तर काका तुझ्या मायला टोचून टोचून मारेल आणि आमच्याशी भांडण काढेल. तुला माहीत आहे त्याच्या मनासारखे होते आहे. तो ही संधी जायला देणार नाही. आता तुलाच लक्ष द्यायला पाहिजे." आई.

ती म्हणत होती ते खरेच होते. घरे वेगळी झाली होती. प्रत्येकाचे निर्णय जो तो घेत होता. मायच्या घरच्या निर्णयात आईच्या घरचे कसे पडतील? एकत्र कुटुंब ऱ्हायलेच

नव्हते. मी मात्र पूर्वी सारखाच विचार करीत होते. विचार केला, सांभाळूया सगळे होईल तेवढे.

मग काकीना भेटून आई व शामदादा निघून गेले. आता बस सुरू झाली होती. तासाभरात घरी पोचत होते. बैलगाडीचे दिवस संपले होते.

संध्याकाळ होत आली होती देवाजवळ दिवा लावायला गेले तर लगबगीने उज्वला आली. म्हणाली “अर्धा तासच मिळेल बोलायला लवकर या.” मी दिवा लावून देवघरा समोरच्या खोलीत गेले. ती वाट पहातच होती.

“वैनीताई, सखाराम मिळाला ना तावडीत तुमच्या? काल आला होता यांच्याकडे. कामाचे पैसे मागत होता. हे कधी कोणाला पैसे देतात? पाने पुसली तोंडाला. जोरात भांडण केलेन वर धमकी दिलीन इनामदार असाल आपल्या गावचे, आम्ही जिल्ह्याच्या गावचे आहोत लक्षात ठेवा म्हणाला. जागोजागी अडवीन तुम्हाला, दामदुपटीने पैसे वसूल करीन म्हणाला. तो जात होता तर यानी एक दगड की काय त्याच्या पायाकडे भिरकावला व तोंडाने आवाज केला. एक नाग साप सरसर करीत त्याच्या मागे लागला. तो पळून गेला खरा. पण मला हे केवढे गारूडी झालेत ते समजले. सांभाळा हो.” उज्वला भरभर सगळे ओकीत होती.

मी विचारांत गेले. भाऊसाहेबाने साप माझ्या लोकांवर सोडले तर कसे करायचे. मी विचारले “अशा सोडलेल्या सापाला परत कसे बोलवतात ते?”

“दोन्ही वेळेला शिटीनेच काम करतात पण पहिली शिटी हळू व लांब लचक असते. मग दगडासारखे कायतरी टाकतात तिकडे साप एकदम जोरात जातो. परत बोलावतात तेव्हा तुटक तुटक अशा शिट्या वाजवतात मग तो सरळ आपल्या पिंजऱ्यात जातो. पहिले चार साप होते. दोन मेले. आता दोन आहेत.” मी थक्क होऊन उज्वलाचे ऐकत होते. हे सगळे करताना त्यांनी आपलाही जीव धोक्यांत घातला होता.

मी घरी आले तर काकी जवळ हे बसले होते. बोलणे बहुतेक माझ्याबद्दल असावे. मी जाताच हे गप्प झाले.

उज्ज्वलाने सांगीतल्यावर मी पांच दातांचे भाले बनवून मागवले. प्रत्येक खोलीत दारामागे एक एक भाला ठेवला. व नोकराना सांगून ठेवले घरात साप दिसला तर ताबडतोप मारून टाकायचा. ते आश्चर्याने माझ्याकडे बघत होते. पण मी जास्त काही बोलले नाही. त्या दिवसापासून माझी नजर सगळीकडे भिरभिरत फिरू लागली.

घरची लढाई संपली होती. आता शेजारची सुरू होत होती. पण मधल्या दिवसांत भाऊसाहेबांना आपली शस्त्रे तयार करायला पुरेसा वेळ मिळाला होता. सापांचे जालीम शस्त्र त्यांनी तयार केले होते. कसे वापरणार होते समजत नव्हते. खूप दिवस गेले पण काहीच झाले नाही. जीव शांत होऊ लागला.

घर आता सुरळीत झाले होते. गुरू कामाला येई, चार दिवस आमच्या कडे राही मग घरी जाई. घरचे काम दोन तीन दिवस पाहून मग परत येई. असे चालले होते. इनामदार त्याच्यावर खूष होते. हिशोब तपासीत. फार छान लिहीतो म्हणत. पैन् पैचा हिशोब लिहीतो. वसुली बरोबर करतो असे सांगत मला हायसे वाटले. गुरू सुधरला तर हवेच होते. एक दिवशी एकटाच सांपडला. तो माझ्या समोर कधी येतच नसे. आज सांपडला. म्हटले "गुरू थांब. तू छान काम करतोस म्हणत होते हे. असाच करत रहा. नात्यात आहे. दोष लागेल असे काही करू नको. आणि काय रे पगार किती घेतोस तू मागीतला नाहीस ना? आपण न मागीतलेलाच बरा."

"मला माहीत आहे. तुझ्याच कडे रहातो जेवतो खातो, बाहेर जातो तेव्हाचा खर्च सगळा मान्य करतात इनामदार. काही खाल्ले प्याले तरी चालेल म्हणालेत. मग पगार काय मागायचा. ते म्हणत होते महिना दोनशे रुपये घेत जा पण मीच नाही म्हणालो. दोनशे फार झाले. सरकारी नोकरीत पण दीडशे रुपये मिळतात कारकुनाला. मग सांगीतले पगार नको दिवाळी अगोदर तीन चारशे द्या. कपडा लत्ता करीन घरच्याना. मला वर्षाचा पगार दिला समजा. तर हंसू लागले."

मला बरे वाटले शेवटी गुरू सुधारला. हिशोब बरोबर होऊ लागले, वसुली होऊ लागली आणि घरातल्या अडचणी दूर पळू लागल्या. मी खूप शांत झाले.

*****

## १४

## गुरूनाथ-

रुक्मीतायच्या घरी हिशोबाचे काम बघायला मला ठेवायचे म्हणून बाबाने सांगीतले आणि माझ्या पोटात गोळाच आला. कामासाठी नाही पण रुक्मीतायला मी खूप घाबरायचो. मनातले अगोदरच ओळखायची ती. बारीक लक्ष असते तिचे सगळीकडे. मोठ्या आई आणि रुक्मीताय एकदम सारख्या होत्या. बाबाला घरच्या वांटण्या पायजे होत्या. आपण वाटण्या करून गपचुप मोठा भाग घशात घालायचा हे त्याने ठरवले होते. मोठा काका व लहान काका दोन्ही काम करणारे पण त्यांना डोकंच नाय म्हणायचा बाबा. मला बाबा म्हणूनच मोठा वाटायचा. मी त्याच्याच बरोबर रहायचो. पण सगळ्यावर मोठ्या आईने पाणी फिरवले. तिने बाबाला अगोदरच हेरले आणि आजोबांना मधे घालून भाग करून टाकले. पावहिश्या ऐवजी तिसरा भाग मिळाला याच्यावरच खुषी मानावी लागली. या सगळ्यात मी व बाबा एका बाजूला व सगळे घर दुसऱ्या बाजूला असे झाले होते.

पण भाग झाले मूळ घरापासून लांबचे घर आम्हाला मिळाले. बाबा खूष. शेती शेजारी मोठी नदी होती. पाणी भरपूर मिळणार मग काय त्याला आनंदच झाला. सगळेच बिनडोक म्हणाला. पण तरी देखील एकत्र रहात होतो. आजोबा असे पर्यंत तरी वेगळे व्हायचे नव्हते.

रुक्मीतायचे लग्न बाबाने परस्पर ठरवले. मला बाबाचा अभिमान वाटला. एवढे मोठे श्रीमंत घर कुणाला नको होईल? पण नाही घरचे सगळे तोंड उतरवून बसले होते. मोठ्या आईचाच वावर चालायचा. आजोबा पण तिच्याच सांगण्या प्रमाणे वागायचे. बाबा हुशार होता पण त्याला कोणी ऐकतच नसे. सगळे म्हणत तो स्वार्थी आहे. म्हणजे कसा तो मला समजत नसे.

रुक्मीतायच्या लग्नानंतर मला इनामदारांकडेच ठेवायचं म्हणत होता. मोठ्या माणसांबरोबर राह्यलं की आपल्यालाही पैसे कमवायची अक्कल येते म्हणायचा. खोत असून दोन्ही काका ढोरांसारखे काम करतात कसले खोत असेच बडबडायचा. मला ते पटे. बाकी कुणालाच पटत नसे. तो म्हणायचा मी खोत मी काम नाय करणार, काम करवून घेणार. भाग मिळाला की बघा म्हणावं कामं कशी करवून घ्यायची ती.

मी शिकत होतो म्हणून रुक्मीताय कडे गेलो नाय. मग भाग झाले. आम्ही नव्या घरात गेलो. आमची शेती पहिल्या वर्षी फारच कमी पिकली. बाबाला पैरेकरीच मिळेनात कामाला. त्याला कामाची संवयच नव्हती. मायची घर चालवताना पंचाईत होऊ लागली. बाबा बोलला, पहिलंच वर्ष होतं म्हणून झालं, या वर्षी बघा कशी शेती करतो ते. पण परत पैरेकरी मिळेनात एकाच गड्याच्या जीवावर किती शेती करणार? पण यावेळी माय आईकडे गेली. आईने चार पैरेकऱ्याना पाठवले. मायने सगळी शेती पेरली जाते हे बघीतले. बाबा एकादी फेरी मारू लागला. दोन्ही काकांची शेती जोमांत व्हायची. आमचीच कां नाही? मला वाटे बाबाचे चुकतेय. एकदा विचारले तर म्हणाला “तुलाय रोग लागला इतरां सारखा? आपण खोत वतनदार, काकांसारखा मजुरी करणारा होणार तू? पैरेकऱ्यांत आणि तुझ्या काकात फरक काय. कामं करवून घ्यायची रे. कामं आपण करायची नसतात.”

मला पटले. पण बाबा पैरेकऱ्यांवर ओरडे दमबाजी करे. म्हणून त्याला माणसे मिळत नसत. माय मग एकएकाला समजावे व शेती करवून घेई. आता घराची घडी बसली होती. माय घर सांभाळतानाच शेती पण बघू लागली. बाबावर व माझ्यावर वैतागे म्हणे “दोन वेळ गिळायला बसतात नी गाव ऊंडरतात बाप लेक कामं कोण करणार? भाग करून काय झालं? माझं कंबरडं मोडायला आलं.”

मायचं मला पटत नसे. आम्ही खोत. आम्ही कामं थोडीच करायची? असेच दिवस गेले व एक दिवशी बाबा म्हणाला “गुरू, रुक्मीच्या घरून इनामदारांचा सांगावा आलाय. तू त्यांचे हिशोबाचे व वसुलीचे काम बघशील?” मी हो नाय म्हणायच्या आतच माय ऊसळली,

“आता कुठे गेली तुमची खोती? पोराला पैरेकऱ्यासारखे जावयाकडे नोकर म्हणून पाठवताय? घरी खायला प्यायला मिळतेय ना? मग हे भिकेचे डोहाळे कशाला? आणि नात्यांत ही भानगड कशाला?”

"तू गप ऱ्हा गे! तुला काय समजतंय नोकर म्हणून कोण पाठवतोय त्याला. इनामदाराबरोबर ऱ्हायला तर चार गोष्टी शिकेल. पगार नाय मागणार. जावयांना मदत म्हणून जायचे रे. पगार द्यायला लागले तर घ्यायचा नाय. तुमच्याकडून पगार कसा घेणार म्हणायचे. हिशोब वसुली बरोब्बर करायची. पुरा विश्वास बसला पायजे. मग बघ कसा वर येशील तो." बाबा म्हणाला.

मग मला घेऊन निघाला रुक्मीतायकडे. वाटेत सांगत होता, "एकदा विश्वास बसला की बघ इनामदार सगळे तुझ्यावरच सोपवतील. पगार नाय घ्यायचा पण चारपांच वर्षांत एक आपली नारळ सुपारीची बाग करायची. कशी ते मी समजवेन तुला मग. अरे नारळ सुपारीत मेहेनत नाय पाडप झाले की बक्कळ पैसा येतो. बघ तू जमवशील सगळे. पण हे तू रुक्मेकडे बोलू नको हां. ती हुशार आहे."

रुक्मीतायला मी पण घाबरायचो. मोठ्या आई सारखीच होती ती. नजरेनेच सगळे टिपायची. पण भिती वाटण्याचं कारण वेगळंच होतं. तिने एकादी चूक पकडली की हसत हसत अशी समज द्यायची की काहीच बोलता येत नसे. ते मला फार लागे. ती माझ्यावर लहानपणापासूनच डूख धरून आहे असे वाटे. कामचुकार म्हणून सगळयांसमोर म्हणे. मला राग येई. पण खरेच असे. सगळी मुले काम करू लागली की मी गावात नायतर जंगलात निघून जाई.

आता तिच्याकडे रहायचे म्हणजे तिच्या एकटीच्या तावडीत सापडायचे नाही असे ठरवूनच रहात होतो. घर म्हणजे इनामदार वाडा खूप मोठा, त्यामुळे तिला भेटणे फक्त जेवतानाच होई. पण सगळेच असल्यामुळे ती काही बोलत नसे.

मला काम तसे सोपे होते. कुठल्या व्यापाऱ्याला किती सुपारी घातली, कुणी किती नारळ नेलेत ते लिहायचे मग ठरलेला भाव इनामदारांना विचारायचा. त्याप्रमाणे किती रुपये झाले ते त्याच्या खात्यांत लिहायचे. वसुलीला जाताना ही वही बरोबर न्यायची. त्यांनी पैसे दिले की खात्यांत जमा करायचे. वजाबाकी करून पक्के येणे किती ऱ्हायले ते दरवेळी पुढच्या रकान्यांत लिहायचे. महिन्यातून एकदा वहीवरून सगळा हिशोब एका मोठया लाल बुकांत लिहायचा.

पहिल्यांदा कोणाचे किती येणे हा हिशोबच नव्हता लिहीलेला. इनामदार म्हणाले "ते व्यापाऱ्यांना विचारूनच लिहूया." मग एका मागून एक व्यापाऱ्यांना बोलावणे पाठवले. त्यांनी इनामदाराना हिशोब सांगीतला. त्यांनी सांगीतलेली बाकी रक्कम मी त्यांच्या खात्यांत लिहून हिशोब नव्याने पुढे चालू केले. इनामदारांचे काम फार मोठे वाटत नव्हते.

आठवड्यातल्या दोन तीन दिवसांत संपायचे. मग त्यांना म्हटले. चार दिवस तुमच्याकडे व दोन तीन दिवस घरी जाईन म्हणतो. तिकडे बाबालाय मदत होईल. तुमचे काम बाकी रहाणार नाही. इनामदार हसत हसत म्हणाले “तुम्ही हिशोब चांगले ठेवताय. जात जा घरी आमचे काही म्हणणे नाही. वसुली व्यवस्थित झाली, हिशोब झाला की मग तुम्ही काहीही करा. नाहीतरी तुम्ही घरचेच आहांत.”

इनामदारांचा विश्वास खूप लवकर बसला. मी घरी जाई तेव्हा बाबा सर्व विचारी. किती बागा आहेत. नारळाची झाडे किती, सुपारीची किती. एका पाडपात किती नारळ ऊतरतो, सुपारी किती, ऊतरते, त्याचे वर्षभरात किती पैसे मिळतात.

मी सांगे पाडप, सुपारीचा, नारळाचा भाग हे सगळं रुक्मीताय बघते. मी बागेत जात नाय. घरी सगळं आलं की इनामदार व्यापाऱ्याना भाव ठरवून देतात. तिथून माझं काम सुरू होतं. वसुली व हिशोब हे माझं काम. भागेल्यांचे हिशोब रुक्मीताय बघते.

बाबा खूप विचारांत पडला मग म्हणाला “असं नाय चालणार. भगेल्यांचे भाग तूच गोळा करायला घे. बागा बघ. झाडांची मोजदाद कर. नारळ सुपारी किती येते ते बघ. नायतर काय ऊपयोग नाय तुला तिथे ठेवून. हे सगळं तुला लवकर समजलं पाहिजे.”

“हात्! मग सोपं आहे हे बाबा. रुक्मीतायला विचारलं की पटकरून समजेल सगळं. ती हिशोब ठेवतच असणार सगळ्याचा.” मी

“रुक्मी काय हिशोब ठेवणार लिहायला कुठे येतं तिला?” बाबा

“बाबा, माहीत नाय तुला. ती चित्रे काढते व हिशोब लिहीते. इथे पैरेकऱ्यांचे पण ती ठेवायची. शामदादाचा आणि तिचा हिशोब बरोब्बर जुळायचा. ती नाय चुकायची हिशोबात.” मी

“मग तर तिला मुळीच विचारायचं नाही. वेळ बघ आणि सांग. भागेल्यांकडे तूच जाशील. बाईमाणसाला कशाला पाठवता. असे बोल इनामदारांना.” बाबा सांगत होता. मला समजत नव्हते बाबाच्या मनात नक्की काय आहे. बाबा हुशार होता कायतरी बडं काम इनामदारांच्या मदतीने करणार असे मला वाटू लागले.

काही दिवस गेले आणि मला आयती संधी मिळाली. जेवताना रुक्मीतायच म्हणाली “पाडपे होऊन दोन दिवस झालेत. काकींची तब्येत बरी नाही. मला जायला मिळाले नाही. भागेल्यांना घरीच बोलावू?”

मी लगेच संधी ऊचलली म्हणालो “मी गेलो तर चालेल रुक्मीताय. कसा व किती भाग ते सांगा मी करून येईन सगळे. भागेल्यांची नांवे द्या मग करतो मी हे काम. दुसरे नारळ सुपारींच्या बागांत जायला बरे वाटेल मला.”

रुक्मीताय पटकन म्हणाली “त्यांची हरकत नसेल तर मला चालेल. ऊलट मला बरेच होईल”

“अरे वा! आम्ही कशाला नाही म्हणू? ऊलट त्यांचा हिशोब भागेल्यां समोरच होईल. बहिणीचे काम भाऊ हलके करणार आम्हाला कां नाही आवडणार?”

मग काय बाबाला पायजे होते ते झाले. आता घरी गेलो की बाबाला सांगता येईल. पुढे काय करायचे तेही विचारता येईल.

पुढच्या दिवसांत रुक्मीतायने भागेल्यांची नांवे, त्यांचे भाग करायची पद्धत, मोठ्या बागा कुणाकडे, लहान बागा कुणाकडे हे सगळ समजावले. लहान बागावाल्यांचे भाग झाले की आपल्यातले नारळ सुपारी जरा ऊजव्या मापाने त्यांना द्यायची. मोठ्या बागावाल्यांना पिशवीभर सुपारी व दहाबारा नारळ द्यायचे सगळे समजावलेन. वर म्हणाली गोड बोलून ऱ्हा सगळयांशी. माझा भाऊ म्हणून शोभला पायजेस. एकट्या मांडवकराचा हिशोब बरोबर बघ. तो जरा नाठाळ आहे. त्याच्या जास्त नादी लागायचं नाही. गोड बोलेल, मैत्री करेल व मग गळा कापेल असा माणूस आहे.

मग माझे वसुलीचे नवे काम सुरू झाले. काही भागेल्यांकडे वेळच लागला नाही. त्यांनी भागाचे दोन ढीग करूनच ठेवले होते. मी सुपारीची पोती व नारळ बैलगाडीत भरून घरी आलो. प्रत्येक पोत्यावर भागेल्याचे नाव लिहीले होते. मलाच समजायला सोपे म्हणून प्रत्येकाचे खाते ऊघडून सुपारीचे वजन व नारळ किती ते जमा लिहीले. आता मालाची खाती तयार झाली. इनामदारानी पूर्वी कधीच अशी खाती लिहीली नव्हती.

मला सगळी माहिती हळू हळू मिळत गेली. बागेचे नाव, बाग कोणता भागेली बघतो, बागेचे क्षेत्रफळ किती. नारळ सुपारीची झाडे किती हे सगळे त्या त्या खात्याच्या पहिल्या पानावर लिहीले. ही वही मात्र मी माझ्या कडेच ठेवली. इनामदारांना नाहीतरी ही माहिती जरूरीची नव्हती. ही बाबाला पाहिजे होती.

मग मला छंद लागला. प्रत्येक भागेल्याच्या बागेतील नारळांची झाडादीठ सरासरी काय पडते. मीच आश्चर्य चकीत झालो. एक नारळाचे झाड जवळ जवळ २०० ते २२५ नारळ वर्षाला देत असे. सुपारीचे झाड दोन ते अडीज मण सुपारी देत असे. इनामदारांना खूपच उत्पन्न होते. बाबाला हे समजले तर बाबा वेडा वेडा होऊन जाईल. मलाच छान

वाटत होते. मनात आले आपली सुद्धा अशीच ५० , ६० नारळांची व ६०, ७० सुपारीची झाडे असलेली बाग असेल तर. बाबा म्हणतो ते खरेच आहे. एकादी बाग मिळवलीच पहिजे.

वसुली छान झाली. व्यापारी येऊन भाव करून सगळा माल घेऊन गेले. हिशोब खात्यावर चढला व इनामदारानी तारीफ केली. रुक्मीताय खूश झाली. आता बाबापण खूश होणार होता. तेवढ्यात गांवाहून माणूस आला. आई खूप आजारी आहे. लवकर बोलावलेय.

रुक्मीताय रडवेली झाली. जेवण करणाऱ्या बाईंना बोलावून चार दिवस जाऊन येते म्हणाली. मी, ती, माधव व मितु गावी निघालो. तासाभरात गावी पोचलो. रुक्मी म्हणाली, "आईकडेच जाऊया." पोचलो तर आई कण्हताना ऐकू येत होते. काका म्हणाला पायाखालचे झालेय. कोंकणांत फुरशी खूप. कोणाला केव्हा चावेल समजणार नाही. असेच एकादे तिच्या पायाखाली आले असणार. फुरसे, साप असले काही चावले की 'पायाखालचे झाले' असे म्हणायची प्रथा आहे. विष चढत नाही म्हणतात. मग वैद्य मांत्रिक वगैरेना बोलावून विष ऊतारा केलाय म्हणाले.

रुक्मीताय बाहेर येवून म्हणाली "गुरू, तू जा. मी येईन नंतर. आईकडेच रहाते जरा. मायला पाठवता आले तर बघ विचारून बाबाला."

चार दिवस रुक्मीताय आईकडेच होती. माय जाऊन आली. मग एक दिवसासाठी आमच्याकडे आली. आम्ही परत निघालो.

आईची तब्येत हळू हळू सुधरत होती. काळजी नाही म्हटल्यावर आम्ही परतलो.

दुसऱ्या दिवशी मांडवकरकडे गेलो. पाडप झाले होते. भाग पहायचे होते. या वेळी मांडवकरच्या खळ्यांत चार चार ढीग दिसत होते. मी विचारले चार ढीग कसले. तर म्हणाला "तुमच्या एका बागेवर चालत नाय. म्हागाई केवढी झालीय. मग भाऊसाहेबांची एक बाग ठेवली भागाने. तो ढीग त्यांचा." मला मनात पटले नाही. म्हटले "मांडवकर, हे बरोबर नाही. तुला माहीतच आहेत आबासाहेब व भाऊसाहेबांचे संबंध. मग पाडपांतच घोळ नाही हे कसं ठरवणार रे. आता काय पाडपाला येवून बागेत ऊभे ऱ्हायचे मी?"

"आबासाहेब इनामदारानी तुम्हाला इनामदार केले काय? भागेल्याना जाब विचारताय जोरांत? नोकराने आवाज चढवू नये उगाच." मागून आवाज आला. वळून पाहिले तर सफेद पेहेरावात टेचांत उभी असलेला माणूस दिसला. मांडवकर धांवतच खुर्ची घेऊन आला "बसा मालक, बसा मालक" म्हणत त्यांच्या मागे मागे करू लागला. मला आता

महत्व नव्हते. त्यांचे भाग त्यांना दाखवले. चहापाणी झाले व ते निघाले. जाता जाता मला म्हणाले "खरे इनामदार आम्ही आहोत. गिळलेल्या इस्टेटीतले आठ दहा नारळ आम्हाकडे आले तर राग मानू नये. फुकटचे मिळालेय तेच पहा."

मला संताप आला होता. भाग मोजून ताबडतोप गाडीत भरायला लावले. गाडी निघाली मग मांडवकरला म्हणालो "वाड्यावर ये. इनामदारांच्या पुढ्यात काय ते होऊ दे. मला मग काम कसे सांभाळायचे ते समजेल."

रुक्मीतायला सगळी हकीगत सांगीतली. आबासाहेबाना पण कानावर घातले. त्यांनी रुक्मीतायलाच पुढे केले. "भागेल्यांचे सर्व काही तीच बघते. ती बोलेल मांडवकरशी."

मांडवकर सकाळी सकाळी आला. रुक्मीतायने त्याला हसत हसत विचारले "काय इसापनिती शिकवतोस मला? दोघांचं भांडण नी तिसऱ्याचा लाभ? बघ कोणातरी एकाचाच भागेली होशील तू. भाऊसाहेबांचा होणार असशील तर आमची बाग आत्ता मी दुसऱ्याला देते. नाहीतर तबडतोप त्यांची सोडून दे. नाहीतर असे कर त्यांचीच बाग ठेव तू. आमची बाग मी पवाराना देते. चांगले भाऊ आहेत दोन्ही."

"नाय नाय वैनीबाय, मी कायय धोका नाय करणार. म्हागाय केवढी झालीय. परवडत नाय. खर्च पाणी चालायला पायजे ना? म्हणून ठेवली बाग वो. आसं करा मला आणखी एक बाग द्या. त्यांची सोडतो." मांडवकरने रुक्मीतायवर वार केला.

"माझ्या सगळ्या बागा दिल्यात मी कोणाचीय परत मागणार नाही. सगळे इमानदारीत वागतात माझ्याशी. तुझीच कायतरी कारस्थानं चालू असतात. तुझ्यासारखा भागेली गेला तर मला शांतीच लाभेल रे. रख्या आठवतो ना? तसले काय परत होणार नाय. आणि तुला पयल्या पासून ते इनामदार गोड. हो की त्यांचाच भागेली. आज मी पवाराना पाठवतेय ताबा घ्यायला. या वर्षी सहामहिने तू निगा केलीस बागेची, त्याचा हिशोब पुढच्या पाडपाला देईन. पण तू बाग गपचूप सोडलीस तर. मला माहीत आहे, तुला चढवायला ते इनामदार बसलेत. काय कटकट झाली तर बागही जाईल व भाग पण जाईल." रुक्मीताय पुरी हुकमात बोलत होती. मग मला टेंबावरच्या पवाराना बोलवायला पाठवले. आता मांडवकर गयावया करत बसला होता.

मी पवार भावाना घेऊन आलो. रुक्मीतायने मांडवकरच्या पुढ्यातच त्यांना सांगीतले "तरीवरची मांडवकर बघतो ती बाग तुम्ही बघत जा. आत्तांच जाऊन ताबा घ्या. त्याचे सामान काय असले तर त्याला द्या. भाग मी तुम्हाला देते तसाच देणार. तयार आहात ना?"

पवार भाऊ गडबडून गेले. दोघांच्या डोळ्यांत पाणी तरळले. “वैनीबाय देव भलं करो तुमचं. विसरणार नाय वो तुमाला.” असे बडबडत मांडवकरा बरोबर निघाले. मंडवकर काळा ठिक्कर पडला होता. सोबत मला जायला सांगीतले. सर्व व्यवस्थित होते बघायसाठी माझी हजेरी लावली.

मी मात्र रुक्मीतायला मानली. केवढी हुशार होती. एका झटक्यांत तिने मांडवकरकडून बाग काढून घेतली. दुसऱ्याला देऊनही टाकली. मला वाटले होते मांडवकर सहजासहजी बाग देणार नाही. त्याने सहज कशी दिली समजेना. ताबा घेऊन झाल्यावर मी सहज विषय काढला तर पवार लगेच म्हणाले, “मांडवकरची दोनच घरे. आमची पवारांची सतरा घरे आहेत. आमचे तरणे ताठे लोक मांडवकराचा खुर्दा करतील माहीत आहे त्याला. गप ताबा दिल्याशिवाय जाईल कुठे! आणि गावालाय म्हाईत आहे मांडवकर किती खोडीचा आहे तो. वशाडी करण्यात एक नंबर. कोण ऊभं नाय ऱ्हाणार त्याच्या बाजून. आणि वैनीबाय तर देवी सारखी आम्हाला. तिच्या समोर कोण आलं तर गाव चालवून नाय घेणार.”

सगळे गाव केवढा मान देत होते रुक्मीतायला. रुक्मीताय पुरी इनामदारीण झाली होती.

*****

अरुणा कुळकर्णी

## १५

## रुक्मिणी-

आईकडे गेली ती जीव मुठीत धरून. कसले आजारपण होते? कशी असेल हजार शंका मनात येत. माझा देव म्हणजे आई. सरळ तिकडेच गेली. मायला काय वाटेल, बाबा केवढा चिडेल कशाचा विचार नाय केला. चार दिवस ऱ्हायले. ऊतार पडला व निघाले. व्यवहार म्हणून एक दिवस मायकडे गेले. मायने रोवाची भाजी केली होती. मला फार आवडते माहीत होते तिला. तिचं प्रेम चांगलं चुंगलं करून घालण्यातच दिसून यायचं.

रात्री शेजारी पडली तर रडू लागली. म्हणाली "गुरू तिकडे तुझ्याकडे, आणि हे शेतीत कायपण बघत नायत. माझा जीव दमतो ग. जयंतची शाळा संपली. पुढे शिकतो म्हणत होता तर नाही म्हणाले. तो बघतो शेती. करतो मदत थोडी. पण ऊदास असतो. शिकायची हौस तर हे नाय म्हणतात. शाम म्हणाला शिकवा त्याला तर हे ऊलटेच शामला शिव्या घालतात. काय करू सांग?"

"मी बोलू बाबाशी? आणि तुम्ही गुरूला कशाला पाठवलात एवढी अडचण करून. आम्ही ठेवला असता कोणीतरी." मी

"ते काय मला नाय समजलं. पण एवढं खरं, पयल्यापासूनच यांच्या मनात गुरूला तुझ्याकडे ठेवायचं हे होतं. मग इनामदारांचा निरोप आला. गेले ते गुरूला तुझ्याकडे ठेवूनच आले. मला विचारतात काय कधी? व्यवहार छान शिकेल म्हणतात." माय

"एक खरं ग माय. गुरू काम चांगलं करतो म्हणायचे हे. मग मी भागेल्यांचा हिशोबही त्यालाच सांगीतला. तोही बरोबर करतो तो. चांगला तयार झाला तर राहील माझ्याच कडे. इनामदार देतील मेव्हण्याला जमीन जुमला. अशीच इच्छा असणार बाबाची दुसरं काय?" मी.

"आमची काय थोडी आहे? दुसऱ्याच्या इस्टेटीवर कशाला आशा ठेवायची?" माय.

मग इकडच्या तिकडच्या गप्पा करून पेंगुळलो व केव्हा झोपलो समजलेच नाही. सकाळी उठून निघालो. मायने मुलांसाठी लाडू करून दिले. पहिली गाडी पकडून घरी निघालो. वाड्यावर पोचलो तेव्हा दिवस चांगलाच वर आला होता.

दिवस जात होते. काकी अंथरूण पकडून होत्या. आणि गुरूने मांडवकरची तक्रार केली. भाऊसाहेबांची बाग पण त्याने भागाने ठेवली. हे चालणार नव्हते. याला जर असे करू दिले तर दुसरे भागेली पण दुसऱ्यांच्या बागा ठेवतील. मग कुणाच्या बागेचे किती उत्पन्न काहीच समजणार नाही. लबाडीला वाव मिळेल. मग मांडवकरला मोडून काढलाच पाहिजे. त्याला बाग सोडायलाच लावायची. पण तो सहजा सहजी सोडणार नाय. मग ध्यानात आले पवारांचे नी मांडवकरांचे वाकडे. पवाराना बाग देऊ. तसे आपल्याशी पवार इमान जपतात. एक बाग छान जपतात. पण दोन भाऊ, त्यांची बायका मुलं, पुरे पडत नाही उत्पन्न. लगेच तयार होतील आणि मांडवकराची कटकट कायमची मिटेल. भाऊसाहेबाला चांगलाच शह बसेल.

माझा होरा बरोबर ठरला. पवाराना बाग दिली व मांडवकरची कटकटही संपवली आणि भाऊसाहेबाना माझे पाणीही दाखवले. समजेल कसा काय वार लागलाय तो.

चारच दिवस गेले आणि उज्वला भेटली. विचारू लागली "वैनीबाय काय केलेत हो तुमी? तुमच्या नावाने खूप शिव्या शाप चालू असतात. कोणतरी मांडवकर भागेली आहे तो येतो. सारखा सांगतो. त्याची चांगली बाग गेली. यांच्यामुळे गेली. आता दुसरी द्या म्हणतो. हे टाळाटाळ करतायत. काल तर दम मारूनच गेला. दुसरी बाग द्या नायतर एक नारळ की सुपारी देणार नाय भागाची. कुटुंबाचे पुरे पडले पाहिजे. जर मग ऊरले तर देईन ऱ्हायलेले. काय वो काय केलंत तुम्ही?"

"काही नाही भाऊसाहेब आमच्यावर डाव टाकायला गेले. मी पुरा ऊलटवला. मांडवकरला हाताला धरून काय भले होणार? भाऊसाहेब पुरे फसलेत त्यांच्याच खेळांत." मी.

"सांभाळा हो. म्हणत होते. राखणदार पुरे तयार झालेत. सोडतोच आता त्यांना. संपवतो सगळ्यांना. बघा हो! काय तरी घात करतील तुमचा रागाच्या भरांत." उज्वला.

"पाहू! प्रारब्धात काय असेल ते होईल. मी सगळ्यांना सांभाळायचा आटोकाट प्रयत्न करीन. बाकी जे व्हायचे ते वरच्याच्या मर्जीनेच. हे काही परमेश्वर नाहीत आमचा अंत लिहायला." मी.

दिवस जात होते. माली, राघव, माधव व मितु शाळेत जात होती. माली जरा आढ्याताखोरच वाटे. राघव अतिशय प्रेमळ, लाघवी व अभ्यासात हुशार होता. माधव फार मस्तीखोर व हसतमुख होता. भावा बहीणींच्या कळी काढायला त्याला फार आवडे. मितुला खूप सतवी. तरी देखील मितुचे आणि त्याचे खूप जमे. शाळेत जाताना येताना राघव माधव व मितुला सांभाळायचा, व्यवस्थित लक्ष ठेवायचा. माली मात्र आपल्याच विश्वांत असायची. भावंडात मिसळतच नसे. मितु कधी बोलायला खेळायला गेली तर पळवून लावे. कधी गाणी ऐकत बस, कधी कागदावर चित्रे काढत बस असले धंदे करी. राघव सकट सगळी भावंडे तिला घाबरत. हळू हळू कोणीही तिच्याकडे जाईना. मला वाईट वाटे. खेळण्या बागडण्याच्या वयात ही एकटेपण कां भोगतेय? काय आनंद मिळतोय तिला? काही तरी करून हिला बोलती खेळती केले पाहिजे.

मग कामात मदतीला बोलावू लागले. दोन दिवस आली मग सरळ सरळ मला टोकलेन. म्हणाली “मला काय पैरेकरीण समजतेस? मी नाय असली कामे करणार. मी इनामदारांची मुलगी आहे. मी त्या प्रमाणेच रहाणार.”

मी थक्क झाले. हिला समजवायचं कसं तेच समजेना. काकींच्या कानावर हे बोलणे पडले आणि त्याही ओरडल्या “कशी बोलतेय बघ गो. आवर आत्ताच तिला. बरे नाय दिसत असले पोरीच्या जातीला. लगीन बघताना काय इनामदारच मिळणार काय हिला?”

ती रागातच बाहेर गेली. त्या दिवशी पासून तिने काकींशी बोलणेच सोडले. मग तिला व मितुला घेऊन मी रात्री निरनिराळ्या गोष्टी सांगू लागले. श्रावणबाळ, राम सीतेच्या, सत्यवान सावित्रीच्या गोष्टी सांगे. मला तिच्या मनावर ठसवायचे होते. बाई ग साधी संसारी बाई हो, इनामदारीण हो की राजाची राणी हो. मनुष्याचे भोग काही कमी होत नाहीत. जेवढे मोठेपण जास्त तेवढ्या यातनाही जास्त. पण परीणाम पडताळता येत नव्हता. मालीनी फार अबोल झाली होती.

काकींचे दुखणे हळू हळू वाढत होते. त्या अंथरूण पकडूनच होत्या. सगळे जागच्या जागी द्यावे लागत होते. पण मालिनी कधीच त्यांना काय पाहिजे नको बघायला येत नव्हती. नागपंचमीचा दिवस होता. काकींचे जरा जास्तच झाले होते. आबासाहेबांनी वैद्यबुवांना बोलावले. त्यांनी कसल्या कसल्या मात्रा ऊगाळून पाजायला सांगीतल्या. पावसाची संतत धार चालू होती म्हणून मुलाना शाळेत पाठवले नाही. दुपारी काकी विव्हळू लागल्या मी शेजारी बसून त्यांना शांत करीत होते. एवढ्यात म्हणाल्या “पार्वते, सगळयांना सांभाळलेस गो. पण तुला ऊसंत नाय मिळाली. आजपासून माझा भार कमी

होईल तुझ्यावरचा. पण या इनामदारीच्या भाऊबंदकीचा भार काय कमी होणार नाय. तो भाऊसायबच नाही पण दुसरेय तुला सतवणार गो. सापासारखे मागे लागणार तुझ्या. मी पुढे सगळे होणारे हाल बघतेय तुझे. सगळया सापाना ठेचून काढ गो बाई. फार कठीण दिवस आहेत गो तुला.''

मनात चर्रर झाले. काकी असं का बोलतायत. धाप लागतेय तरी बोलतायत. मी हळू शांत करत म्हणाले ''काकी, शांत पडा हो तुम्ही. माझ्या प्रारब्धात आहे ते होणारच. शांत व्हा.''

''आता कायमची शांत होणार गो. पण डोळयासमोर कोणतरी येवून सांगतोय तुझं भविष्य. तेच सांगतेय तुला. आपले आणि परके दोन्ही टपलेत तुला छळायला. जीव तुटतोय गो तुझ्यासाठी. बघ मी आता जातेय पण तू आबाला आणि मुलांना जप गो. जप .. जप ..'' मग धाप लागली. मी मात्रा चाटवली. थोडे पाणी पाजले. पण आता श्वास मंद होतोय वाटले. आबासाहेबांना भेटायला बोलावले. ते आले तसे काकीने डोळे ऊघडून हात वर केला. श्वासांत मधुनच घरघर येत होती. माझ्या तोंडून मृत्युंजयाचा जप चालू झाला तसा त्यांच्या तोंडावर शांतपणा पसरत गेला. एक मंद हसणं चेहेऱ्यावर पसरलं. आणि हळू हळू श्वास मंद मंद होत गेला. घरघर थांबली.

माझ्या एकटीच्या डोळयातून पाणी सुरू झाले. निपुत्रिकाला एकाचे तरी डोळयांतले पाणी मिळत होते. काय अर्थ होता त्यांच्या आयुष्याला. कुठल्या इच्छेने त्या जगत होत्या? जगण्यासाठी काहीतरी कारण जरुरी असते ना? मग काकींना असले कुठले कारण होते? सगळ्यांवर प्रेम माया वाटत जगल्या. आज जाताना माझी केवढी काळजी करीत होत्या? लग्न होऊन आले तेव्हापासून त्यांनी मला एकही वाईट शब्द ऐकवला नव्हता. केले ते प्रेम आणि माया. कानउघाडणी केली ती यांची. आज एक मायेचा वहाता झरा माझ्या आयुष्यातून कायमचा आटून गेला.

घर लवकरच स्थिरस्थावर झाले. पण मी मात्र ऊदास होते. समजत नव्हते ही ऊदासी कां. महिनाभर तरी सैरभैर विचारातच वावरत होते. आणि एके दिवशी बाबा हजर झाला. म्हणाला ''रुक्मे इनामदार आमालाय एक बाग देतील काय गो? शेती पेक्षा बागाईत बरी. मेहेनत करून पण काय मिळत नाय शेतीत. पैसे ठरवा. उत्पन्नातून आणि गुरूच्या पगारातून फेडू. आणि नाय फेडले तर बाग परत घ्या.''

मी आश्चर्यात पडले. हा काय मनात ठेवून आलाय? जावयांकडे येवून बाग मागतो कसा? पहिल्यांदा गुरूला पाठवले, पगार देत होतो तरी नको म्हणाला. आता बाग मागून

भीड घालतोय इनामदाराना. यांच्या पर्यंत जायच्या आधीच याला मलाच उत्तर द्यावे लागेल. मग बोलले,

"बाबा! तुझी शेती कमी आहे कां? वतनदार आपणही आहोत. जावयाकडे मुलाला नोकरीला ठेवायचे इथेच पहिली चूक केलीस. आता बाग मागतोस. मुलीच्या संसारात दखलगीरी करू नये रे. संबंध बिघडले तर दोघानाही त्रास होतो. कसे समजत नाही तुला. इनामदाराना मी काही असले सांगणार सुचवणार नाही. कमीपणा वाटतो मला. आणि तू सांगतलेस तरी मी नको म्हणायला लावेन इनामदाराना."

"अगो असं काय करतेस? वतनदारी आता कूळकायद्यात जातेय गो. अर्धी पण जमीन नाय ऱ्हाणार गो. मग खायचे काय? कुळे पण हळू हळू माजायला लागलीत. खंड नाय घालीत बरोबर. आणि आमची नांगराखालची शेती काय बाकी दोन भावांसारखी पिक पाण्याची नाय. मला बघून नापीक शेत दिले गो. डाव साधला मोठीन." बाबा

आईला दोष देताच मी उसळले, "मला सांगतोस हे. अरे नदी जवळची सगळयात चांगली शेती तुला मिळाली. कामाची सवय नाय तुला. दुसऱ्याने दोन दोन पिकं घेतली असती. तू बसलायस आळस काढत. मला माहीत आहे. माय कष्ट करते आणि तू असा फिरत बसतोस. आईला तर काय बोलूच नकोस. ती देवी आहे रे. तिला बोलशील तर देवाचा कोप होईल कुटुंबावर. तुझ्या बरोबर सगळयांनाच भोगायचे येईल."

"मग काय नायच म्हणतेस? पण बघ मग दोष लावू नको. भाऊसाहेब भेटलेले. ते बाग देतायत मला. पण म्हटले पहिल्यांदा आबासाहेबांचा शब्द सोडवूया. जावयाच्या दुश्मनाची बाग कशी ठेवायची. पण आता काय तूच नाय म्हणतेस तर पोरांसाठी काय तरी तजवीज केलीच पाहिजे." बाबा मानभावी पणाने बोलत होता. मनात राग राग झाला होता. भाऊसाहेब सरळ शांत जगायला देत नव्हते. आणि माझाच बाबा त्यांना जाऊन मिळत होता. राग मनातच दाबत शांतपणे बोलले,

"बाबा रे तुला पायजे ते कर. कोणाचीय बाग ठेवेनास. मला काय फरक नाय पडत. पण एक लक्षात घे. गुरूला आत्ताच बरोबर घेऊन जायचं. आणि परत कधी माझ्याकडे पाय ठेवायचा नाही. मी माहेरी आले तर ती आईकडे तुझ्याकडे नाही. लक्षांत ठेव."

आता मात्र बाबाचा चेहेरा पडला होता. काही न बोलता ऊठला व जाऊ लागला. मी हटकले "गुरूला घेऊन जातोयस ना? त्याला येऊ दे मग दोघेही जा."

"त्याला कशाला तो करील काम इनामदारांचं. मी काय बाग ठेवली नाय अजून." बाबा

“बाबा, मला विषाची परीक्षा नाय घ्यायची. तू त्यांची बाग ठेवणार? आणि तुझा मुलगा माझ्याकडे हिशोब बघणार? वेडे समजतोस काय आम्हाला तू? घेऊन जा बरोबरच त्याला.” मी.

एवढ्यात इनामदार आले. विचारू लागले. काय गडबड आहे. आवाज वर पर्यंत येत होता. मी सर्व सांगीतले व वर म्हणाले “हिशोब लिहायला दुसरा कोणीतरी ठेवा. गुरूला जाऊ दे त्याच्या घरी. त्याला इथे ठेवण्यांत अर्थ नाही.”

इनामदार परत माडीवर गेले. काही रुपये पाकीटात घालून घेऊन आले व मला देत म्हणाले “हे तुम्हीच द्या भावाला. त्यांनी घेतले नाहीत तरी मी बाजूला ठेवत असे त्याचा पगार. दोनशे रुपयाने मोजलाय सांगा. आपणास कोणाची मदत नको असे असेल तर. आणि तुम्ही मनाला लावून घेवू नका यात तुमचा दोष नाही.”

गुरू अम्मळ दोन घटकानी आला. बाबा गप्प भिंतीला टेकून बसला होता. गुरू येताच त्याला म्हणाला “गुरू चल. सामान घे तुझं नी चल घरी.” गुरूने एकदा माझ्याकडे व एकदा बाबाकडे नजर केली. आणि निघून गेला. दहा मिनीटांत सगळे सामान गोळा करून आला व दोघे निघू लागले. मी गुरूला म्हटले “हे पाकीट यानी दिलेय. तुझा एवढ्या दिवसांचा पगार.”

“आम्ही खोत ना गो. मग पैसे कसे घेणार?” बाबाने कुजका शेरा मारला पण माझ्या हातातले पाकीटही घेतले व निघाले.

त्यांच्या पाठमोऱ्या आकृतींकडे पहात विचार करू लागले. हे माझे बाबा व भाऊ कसे वागतात? हे असे कसे? यांना मायेपेक्षा स्वार्थ जास्त जवळचा. बाग ठेवायला नाही म्हणाले तर भाऊसाहेबांचे नाव घेतो. आमच्या जीवावर ऊठलल्या एका भेकड माणसाला साथ देणार म्हणतो बाबा आहे की शत्रु?

पण खरंच जर भाऊसाहेबानी त्याला बाग दिली तर आपले माहेर कायम तुटणार. माय व लहान भावंडे यांचा सहवास तुटणार. काय करता येईल? आईने काय केलं असतं? कितीतरी वेळ विचार चालला होता. मग दुपार होत आली म्हणून प्रसाद, आरतीच्या तयारीला लागले.

दुपारी जेवंणे झाल्यावर यांच्याकडे विषय काढला. भाऊसाहेबांनी जर बाग बाबाला दिली तर आपला सबंध त्यांच्या बरोबर रहाणार नाही, ठेवायचाही नाही म्हणून सांगीतले. ते म्हणाले “अहो वडील आहेत ते तुमचे. असे सबंध तुटतील कसे?”

"हे पहा, बाबा जर आपल्या समोर उभा झाला तर काय सबंध ठेवणार? आपल्या कुटुंबाचं संरक्षण जास्त महत्वाचं. बाबाला स्वार्थ दिसतो. आपले आणि भाऊसाहेबंचे संबंध दिसत नाहीत?"

चार सहा दिवस गेले व शामदादा आला. मला म्हणाला "आईचा जीव राहीना म्हणून भेटायला आलो. मधल्या काकांचे आणि गुरूचे भांडण झाले गो तुमच्याबरोबर? गुरू परत आला. काका तुझ्या नांवाने खडे फोडत फिरतो गावभर. मुलगी मला मेली, नावपण घेणार नाही म्हणतो. काय वेडे वांकडे केलेन गो गुरूने?"

मग त्याला सगळी हकीगत सांगीतली व म्हटले "म्हणू दे त्याला मी त्याच्यासाठी मेले म्हणून. मला तुम्ही आहांत की. मायला सांग आता गावी आले की आईकडे येणार तिकडेच भेटत जा. मी काही बाबाच्या घरी जाणार नाही."

शामदादा विचारात पडला. मग इतर गोष्टी बोलून निघून गेला.

दिवस जात होते. कित्येक महिने ऊलटले. बाबा काही भाऊसाहेबांची बाग करायला आमच्या गावी आला नाही. काय चाललेय ते समजत नव्हते. उज्वलाला मी विचारे पण तिलाही काही समजत नसे. ती एवढेच सांगे की भाऊसाहेब सापांनाच खेळवत असतात. हल्ली ते सापांना रात्री सुटे सोडतात. फार भिती वाटते घरात. रात्री कुठे पायात आला आणि चावला तर अशी धास्ती वाटत ऱ्हाते. पण भेटायला कोणी येत नाहीत. म्हणजे बाबाने फुकट धमकी तरी दिली असेल, किंवा भाऊसाहेबांना माझ्या बाबांना जवळ करणे धोक्याचे वाटले असेल, असे मला वाटले.

आता दिवस भरभर पळत होते. मुले मोठी होत होती. शिकायसाठी मालिनी व राघव जिल्ह्याच्या गावी गेले होते. आणि एक दोन वर्षांत माधव व मितू पण जाणार होते. मग मात्र कसे होईल याची काळजी मला लागली होती.

हे म्हणत राघवला वकील करायचे. घरच्याच जमिनींचे तंटे नव्या कायद्यांमुळे वाढत होते. घरचा वकील असला तर सर्व बरोबर होईल म्हणायचे. मालिनी तर माझ्याशी फटकूनच बोले. मी शिकलेली नाही म्हणून तिला माझी लाज वाटते. असे एकदा तिने राघवला सांगीतले होते. माधव खोड्या करायचा, गाणी म्हणत बसायचा, अभ्यासात मात्र मागेच असायचा. मितू एकदम हंसरी मन मनमिळावू आणि सगळयांची आवडती होत होती. अभ्यासांत फार पुढे नव्हती पण दहा बाराव्या नंबरवर पास होत होती.

हल्ली भाऊसाहेबांचा त्रास वाटत नव्हता. कदाचित मुलबाळ नसल्यामुळे ते अडचणीत आल्यासारखे वाटत होते. आहे तीच इस्टेट कुणाला द्यायची हा प्रश्न त्यांना

सतवत असणार. पण एक दिवशी उज्वला रडत म्हणाली. भाऊसाहेबांनी केव्हाच दुसरा घरोबा केलाय. त्यांना एक मुलगा पण आहे. तिला हे दोन दिवसापूर्वीच समजले.

"अगो पण लग्नय गुपचुप केले काय? कुणालाच काही माहीत नाही." मी

"लग्न केले असेल तर समजाणार? तो कोणी वाणी भागेली होता एका बागेवर. साप चावला त्याला आणि मेला. त्याची बायको चांगली तरूण आणि नीटस होती. मुल नव्हते तिला. बाग तिच्या ताब्यांतच दिली आणि हे जायला लागले तिच्याकडे झाली असतील सात आठ वर्षे. कोणाला काय समजणार. सगळ्या गांवाला हळू हळू माहीत पडले. परवाच मला समजले. मला संशय आहे. यांनीच पाळलेल्या सापाने मारले असेल त्या भागेल्याला. पण आता माझ्यावर आरोप सिद्ध करतील वांझपणाचा." ऊज्ज्वलाला एकदम हुंदका फुटला. तिच्या पाठीवर हात फिरवत होते, शांत करत होते. पण मन सैरभैर झाले होते. का एका आयुष्याची वाट लावली या माणसाने. किती क्रूरपणा.

मग एकदम विचार आला. हे साप मारून टाकले तर. दुसऱ्या क्षणी तो विचार पळवून लावला. घरात आले आणि परत विचारात गेले. साप वापरून कसे काय मारतील ते एकाद्याला? साप एवढे हुकमांत आणता आले असतील त्यांना? पण माझ्या घरातल्या कोणावर सोडायचे असतील तर त्यांना आमच्या घरात यावे लागेल ते असे कधीच करणार नाहीत. काय योजले असेल? माझी मुले बाहेरगावी आहेत त्यांना सांभाळायला सांगीतले पाहिजे. तिकडे जाऊन तर हे काही करणार नाहीत ना? जीवाचा थरकांप झाला.

रात्री यांना म्हणाले "मुलांना दोन दिवस बोलवा. नाहीतर आपण भेटून येऊ दोघेही जाऊया."

ह्यानी आता मला काहीही विचारायचे नाही असेच ठरवलेले दिसले. कां? एवढे काय काम निघाले मुलांकडे? कधी जायचे? काहीच विचारले नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळीच तयार झाले व म्हणाले चला. मी लवकर तयारी करून निघाले. मुले भेटणार म्हणून बरे वाटत होते. माधव व मितूलाही बरोबर घेतले.

राघव व मालिनी समोर दिसताच जीव भांड्यात पडला. मी त्यांना घेऊन बसले. राघव सगळ्यांना पाहून खूष झाला होता. मालिनी मात्र जसे काहीच झाले नाही अशी वागताना दिसली. थोड्या गप्पा आणलेला खाऊ दिल्यावर चहा पिऊन हे बाहेर निघाले. वकिलाला भेटून येतो म्हणाले.

मी राघव व मालिनीला म्हणाले "जरा सांभाळून ऱ्हा. घरात बारीक लक्ष ठेवा. एकादा साप दिसला तर घरातून बाहेर पडा व लोकाना गोळा करा."

राघव विचारू लागला “आई असे काय बोलतेस? हे शहर आहे. ईथे आजूबाजूला झाडेच नाहीत ईथे कशाला साप येईल?”

“मी सांगीतले ते लक्षात घ्या. सगळेच साप काही रानातूनच येतात असे नाही. काही माणसे साप पाळतात व दुसऱ्यांच्या अंगावर सोडतात. मी सांगते ते ऐका. आणि भाऊसाहेब कधी चुकून दृष्टीला पडले तर त्यांना कुठे रहाता ते समजू देऊ नका.” मी

“आई तुला काय वाटते? भाऊसाहेब त्यांचे साप घेऊन आम्हाला मारायला इथे येतील? इनामदार कधी असे मागून वार करीत नाहीत. ते साप पाळतात ते शौक म्हणून. लोकांना मारायला नाही. असले शौक इनामदारच करतात. बाकीचे नाहीत.” मालिनी पहिल्यांदाच एवढी बोलली. पण बोलण्यांत इनामदारकीचा खोटा अभिमान ठासून भरला होता. तिला काय माहीत, इनामदाराना शौक करायची सूट दिली तर काय होते ते. मी सोसलेय आणि सुधारलेय हिच्या बाबाना. पण हिला बोलेल कोण. तिच्याकडे पहात मी एवढेच म्हणाले “अजून लहान अहात तुम्ही. जगाचा अनुभव नाही तुम्हाला. म्हणून हे सांगायला आलेय इथवर. माले वेळ सांगून येत नाही. पण जगाकडे डोळस नजरेने बघितले तर माहीत पडते गो. अंदाज बांधता येतो काय होईल त्याचा. मला काही गोष्टी सरळ दिसतायत, म्हणून तुम्हाला सावध करायला धावत आलेय.”

तेवढ्यात त्यांना जेवणखाण करून घालायला ठेवलेल्या जोडप्यातला माणूस म्हणाला “मालकीणबाय नको काळजी करू. मी हाय इथे. आम्ही बारीक ध्यान देऊ सगळयांवर. मला आणि बायलेला सवय हाय किरडूवं, साप मारायची. आमी रातच्याला पण हितेच असताव. काळजी नको करू.”

आता मन थोडे शांत झाले. हे जोडपे दिवस रात्र इथेच असते तर? आबासाहेबांनी चांगली सोय केली होती मुलांची. मग राघव, माधव, मितु घरभर खेळू लागली. एवढ्यात हे परत आले म्हणाले, “चला पहिल्यांदाच आलात शहरात. काही खरेदी करणार असाल तर करा.”

निघाले खरी पण आयुष्यात कुठल्याच दुकानात न गेलेली मी काय खरेदी करणार होते? एवढ्या वर्षां नंतर इनामदार मला पहिल्यांदाच खरेदीला दुकानात नेत होते.

शहरात दुकानांची गर्दी होती. एका रेषेत भांड्यांची दुकानं नंतर किराणामालाची थोडीफार दुकानं. मग कसलेतरी जाळया, पाईप, घमेली असलेली दुकानं, मग मिठाई आणि खाऊची अशा सगळया आळया फिरत होतो. थोडी मिठाई घेतली, मग भाजी बाजारानंतर कापड दुकानांची आळी सुरू झाली. एका मोठ्या दुकानात हे शिरले

मागोमाग मी पण गेले. साड्यांच्या भागात एका गादीवर आम्हाला बसवून दुकनदाराने साडया दाखवायला सुरवात केली. सुंदर साडया पहाण्यांत मी गुंग होते. तेवढयात यांचा आवाज आला "चला! चला! निघूया. आवडल्यात त्या घ्या आणि निघा." मी वर पाहिले तो भाऊसाहेब एका बाई आणि मुला बरोबर दुकानात शिरत होते. मी क्षणभर चमकले. मनात येते ते कां घडते? हे इथे कसे? आणि तेही आजच? माझे भाकीत खरे तर ठरणार नाही? माझ्या मुलांचा माग काढत तर आले नाहीत ना? हजारो प्रश्न मनात ऊभे राहिले. मग ताठर झाले. म्हणाले "आपण का पळून जावं? आपण पहिल्यांदा आलोय. बसा तुम्ही काय करतात पाहू दे मला."

भ्यालो दाखवून त्यांचा विश्वास वाढवायचा कशाला? त्यांनी आपल्याला पाहिल्यावर काय करतात पाहू. आल्या पावली परत जातात की निर्लज्जा सारखे समोर येतात पाहू तरी. आणि बरोबर आहे ती काही उज्ज्वला नाही, नवे अंगवस्त्र वाटतेय. समजेल काय ते. आणि हा मुलगा वाटते, नवा अनऔरस इनामदार.

त्यांचे लक्ष आमच्यावर गेले आणि ते एकदम गडबडले असे वाटले. त्या बाईच्या कानांत काहीतरी कुजबुजले व स्वतः दुकानदाराशी बोलू लागले. ती बाई आणि मुलगा आमच्या समोरच येवून बसले. मी तिच्याकडे निरखून बघत होते. ती बोलत होती ती भाषा अगदीच गावची वाटत होती. मुलगा हट्ट करून काय काय घ्यायला लावत होता. ती त्याला ओरडत होती. पाठीत धपाटेही घालत होती. एकंदर सरळ वागणे वाटत नव्हते. आता भाऊसाहेब दुकानातून गायब झाले होते. यांचे लक्ष माझ्यावर असावे. मधेच म्हणाले "साड्या पहा, जाऊया लवकर." मी मानेनेच थांबा म्हणाले. त्यांच्या चेहेऱ्यावर हसू पसरले. बहुतेक ते माझ्या मनातले ओळखू लागले असावेत.

ती बाई आम्हाला ओळखत नसावी. कारण ती आम्हाला पाहून जराही चमकली किंवा ओळखल्याचा भाव दिसला नव्हता. मला ही संधी बरी वाटली. मी आता तिच्या बाजूला सरकायला लागले. दोन साड्या बाजूला करून मी मुलींच्या फ्रॉकची कापडे काढायला सांगीतली. व वेळ पाहून तिच्याशी बोलायला सुरवात केली. कापड केवढं महाग झालंय म्हणताच ती हंसून बोलू लागली व आबासाहेब सारखे दुकानाच्या दाराकडे पाहू लागले. मी पुढे घोडे दामटत त्या मुलाला विचारले "शाळेत जातोस रे बाळा?"

"हो जातंय ते साळेत. यांनी घातलाय गांवावरल्या साळंत" तिनेच उत्तर दिले.

"हो! छान! नाव काय रे तुझं?" मी

"गजानन" तो

"बस् एवढंच? अरे सबंध नाव सांगावं रे." मी

"गजानन श्रीकांत इनामदार." तो जरा घुश्यांतच उत्तर देत होता.

श्रीकांत इनामदार म्हणजे भाऊसाहेब इनामदार. म्हणजे अनौरस मुलाला भाऊसाहेबांनी इनामदारी बहाल केली होती. आता त्याची आई बोलू लागली. "आम्ही इथलेच भैरववाडीचे गुळगुळे वो. इनामदार हाईत हे. तुम्ही कुठच्या? गाव कुठचं?"

"आम्हीही भैरववाडीचे गुळगुळे इनामदारच. हे माझे पती आबासाहेब इनामदार." मी एवढे बोलताना तिचा चेहरा बदलत गेला. ती पुरी गडबडून गेली. काय करावं हे काही तिला समजत नव्हते असे वाटले. तिने नजर वळवून एक दोन साड्या माणसाला बांधायला सांगीतल्या. मुलाचे बखोट पकडून उभा केला व तरा तरा दुकानातून बाहेर पडली. मला हसू आले. मी शांतपणे माझी खरेदी संपवली. एवढ्यांत भाऊसाहेब दुकानात शिरताना दिसले. बहुतेक खरेदीचे पैसे भागवून सामान न्यायलाच आले होते. ते निघून गेले व आम्ही ऊठलो. चांगली पंधरा वीस मिनीटे लागली होशोब करून सामान बांधायला. मला एवढा वेळ घालवायचाच होता. मग जरावेळ भांड्यांच्या दुकानांत व बाजारात ऊगीचच फिरून वेळ काढला. नजर सारखी ती बाई किंवा भाऊसाहेब दिसतात कां यावरच होती. बराच वेळ कोणीच दिसले नाही. तेव्हा घरी परतलो.

सारखा एकच विचार येत होता. कोणी जर वावगे वागला असेल तर किती भित्रा बनतो. तो प्रसंगाना तोंड देण्यास कसा असमर्थ होतो. याचेच हे ऊदाहरण होते. भाऊसाहेबाना कायम पळ काढावा लागत होता.

संध्याकाळी बस मधे बसल्यावर हे म्हणालेच "तुम्हाला बरे सुचते, एकाद्याला पळवायचे कसे ते. तेही आवाज न चढवता. धन्य आहे."

"मी कुठे काय केले? फक्त ओळख विचारली व आपली दिली. मला खात्री होती. एवढ्या साध्या गोष्टीमुळे ती भांबावणार निघून जाणार. जगासमोर ऊजळ माथ्याने ऊभे रहायला स्वच्छ चाल असली पाहिजे. गुण ऊधळलेले लोक नाही ऊभे राहू शकत सज्जनांसमोर." मला ऐकताना यांच्या चेहेऱ्यावर कौतुक, आश्चर्य, असे अनेक भाव भरू लागले.

घरी पोचलो त्या रात्री बरेच दिवसानी उज्ज्वलाचे मार खाणे व रडणे ऐकू आले. मी देवघराच्या ओसरीकडे धांवले. समोरच्याच खोलीत भाऊसाहेब काठी घेऊन उज्ज्वलाला मारीत होते वर शिव्या घालत होते. मी तिकडे जाणार असे दिसताच मला ओरडून म्हणाले "आमच्यामधे पडू नका. परिणाम वाईट होईल." मी ऐकलेच नाही असे दाखवत सरळ

त्यांच्याकडे निघाले. खोलीच्या दारात पोचले तर ते काठी भिरकावून देऊन तरातरा निघून गेले. त्यांना माझ्या समोर ऊभे राहाणे किती कठीण जात होते?

उज्ज्वलाला जवळ घेऊन विचारले “आता काय झाले गो. आणि तुला सांगीतलेय ना मार खायचा नाही म्हणून? मग?”

“ताई तुम्हाला ते कुठे भेटले? त्यावरूनच बोलायला लागले. मला काही माहीत नाही म्हणाले तर मारायलाच लागले. सारखे बडबडत होते सगळे तुम्हाला सांगते म्हणून. मला अजूनही काही समजलं नाही हो कां मारत होते ते.” रडता रडता उज्वला सांगत होती. मला माहीत पडले. आमची शहरांत पडलेली गांठच याला कारणीभूत होती.

“काय गो त्यांची बाहेरची बाई आहे, तिला मुलगा आहे असं तू मला बोलली होतीस. तुला हे माहीत आहे हे त्यांना माहीत आहे काय?” मी विचारले.

“नसेल. कसं माहीत असणार? तसा विषय कधी आलाच नाही. मला ती गोष्ट एका काम करणाऱ्या बाईने सांगीतली. पण त्याचे इथे काय?” उज्ज्वला.

“बाई काल आम्ही जिल्ह्याला गेलो होतो. तिथे आले होते तुझे तिला आणि मुलाला घेऊन. आमच्याशी बोलली ती. मुलगा तर रीतसर भाऊसाहेबांचे नाव लावतो. आमची ओळख दिल्यावर त्या बाईने पळ काढला. म्हणून तुला आज मार पडला. हे बघ असल्या संबंधांना शक्ती नसते. ते खऱ्या समोर कोलमडतात. काही झालं तरी या वाड्यात तिला आणि त्या मुलाला थारा देवू नकोस.” मी तिला सगळे सांगून टाकले वर सल्ला दिला.

घरी आले तर हे वाटच पहात होते “कशाला त्यांच्या भांडणात पडायचे? पाहिलेत ना कसल्या लायकीचे आहेत ते.”

“मला ती बाई आणि तिचा मुलगा वाडयात घुसायला नकोत. फार जड जाईल आपल्याला. त्यांचा बंदोबस्त करणार होते पण आजच अनायासे संधी आली.” मी यांना समजावले.

एक पाहिले होते भाऊसाहेब माझ्यासमर कधी आले की मग चार सहा महिने थंड पडत. कशामुळे ते समजत नव्हते. कमीत कमी थंड पडलेत असे वाटे. मागून काही करीत असतील तर माहीत नव्हते. पण त्रास  नसायचा.

मी एवढी वर्षे हळू हळू कां होईना पण भाऊबदकी नाहीशी कशी होईल हे पहात होते. मला भेटणारे सगळे थोडे बोलल्यावर मैत्री करीत. पण भाऊसाहेब जरा देखील थंड पडत नव्हते. देवानेही औरस पुत्र न देता त्यांना शिक्षा केली होती. पण ते जराही नीवळत नव्हते. भाऊबंदकी ते प्राणपणाने जोपासत होते. काय केले असते म्हणजे भाऊसाहेब नीवळले

असते याच विचारात रहायची मी. ह्या बाईला गाठू कां? तिला थोडी सहानुभूती दाखवली की कदाचित आपले म्हणणे मानील देखील ती. पण तिची सगळी माहिती काढायची कशी? पाहू येईल संधी परत.

.............

.............

वर्षे उलटत होती. माहेरी एकएकाची लग्ने, बाळतपणे चालली होती. मी चारपांचदा माहेरी जाऊन आले. आई आणि माय आता थकत चालल्या होत्या. आईचे घर मात्र परत गोकुळ झाले होते. शामदादा, मधुकर यांच्या बायका आई बरोबर मदतीला होत्या. शामदादाची तीन मुले आणि मधुकरची दोन अशी पांच मुलांची भर कुटुंबात पडली होती. परत घर भरून गेले होते. माहेरी जायचे म्हणजे आईकडे, हाच नियम केला होता. मायकडे मी फक्त भेटायला जात असे. माय मला कवटाळून रडे. म्हणे "घर मोडले गो रुक्मे, माझी मुलगी पण माझ्याकडे येत नाय. केलं कोणी आणि भोगतं कोण असं झालंय गो."

मला फार वाईट वाटे. मी गेली की बाबा आणि गुरू घरांतून बाहेर पडत. गुरूची बायको अबोल होती. आईला मदत करी. गुरूला एकच मुलगी होती. चुणचुणीत होती. घरात माय, वहिनी, मुलगी व कधीमधी जयंत एवढेच असत. जयंतने शेतीत छान लक्ष घातले होते. शिकलाही चांगला होता. पुढे शिकायचे व मुंबईला जायचे म्हणायचा. गोपिकाचेही लग्न झाले होते.

जयंत एकदा भेटला. मी विचारले तर म्हणाला "रुक्मीताय तुला माहीतच आहे. इथे ऱ्हायलो तर हाती धुपाटणेच येणार. आयुष्यभर यांचीच शेती करावी लागणार. माझे असे कायच नाही. बाबाला आणि गुरूदादाला तू ओळखतेसच. मला ते काय देतील कां? मग भांडणे. त्यापेक्षा इथून मुबईला गेलो तर माझे काय तरी बरे होईल. भांडणेही नाहीत." मला सगळे पटले. खरंच त्याची परवड केली असती या दोघानी. मायला मी सांगीतले, तो म्हणतो ते खरे आहे. पाठव त्याला मुंबईला. करू दे सगळी शेती बाबाला आणि गुरूला. मायला नाइलाजाने पटलेले दिसले. म्हणालीच "तो आहे म्हणून शेती घरात येते. हे दोघे काय करणार नाहीत. आमचा जीव वर येणार सगळे करताना. पण जयंतला का मजूर बनवून ठेऊ , जाऊ दे त्याला. कामसू आहे. काढील नाव बाहेर गेला तर."

माझी मालिनी व राघव आता कोल्हापूरला कॉलेजमधे होते. सर्वानी एकत्र असावं म्हणून माधव व मितूलापण तिथेच शाळेत घातले होते. वाडयात आता आम्ही दोघेच होतो. मी व आबासाहेब इनामदार.

अशी वर्षे ऊलटत होती. कुटुंबे बदलत होती. आणि एक दिवशी माझ्यावर कुऱ्हाड कोसळली. आबासाहेब इनामदार दिवस वर आला तरी खाली ऊतरलेच नव्हते. म्हणून बघायला गेले तर आबासाहेब बिछान्यावर विचित्रपणे पडले होते. सगळे शरीर काळे निळे पडले होते. ते निवर्तले होते. काय झाले कसे काय गेले काहीच समजत नव्हते. मी सगळ्या नोकरांना गोळा केले. मुलांना बोलवायला पाठवले. आईकडे सांगावा धाडला. गावात वैद्याला आणायला पाठवले. आणि मग पायातले त्राण जाऊन खाली कोसळले.

*****

अरुणा कुळकर्णी

## १६

## आई (सविताबाई)

रुक्मीकडून नोकरगडी आला होता. सांगावा फारच भयानक होता. आबासाहेब इनामदार झोपेतच गेले होते. फार भयानक बातमी ऐकून जीवाचा थरकांप झाला होता. रुक्मीची मुले शिकत होती. ती कोल्हापूरला होती. अजून मोठी व्हायची होती. आता घरी रुक्मी एकटी झाली होती. ताबडतोप जायला पाहिजे होते. तिच्याजवळ कोणीतरी असणे जरूरी होते.

बातमी ऐकताच शाम सायकलवर स्वार होऊन बाहेर पडला होता. मी समजले तो मधलीला बोलवायला गेला होता. मी अर्ध्या तासात सगळी जाण्याची तयारी केली. तोच धाय मोकलत मधली आली. ती गळ्याला मिठी मारून बसली. दोघीनाही रडू आवरत नव्हते. शाम मग म्हणाला

"चला निघुया लवकर. रुक्मी एकटीच आहे तिकडे. काय करील ती एकटी." शेवटच्या वाक्या बरोबर त्याला हुंदका फुटला. बससाठी पोचलो तर तिथे मधले व गुरू आलेच होते. बस यायला चांगला अर्धा तास होता. मग धाकले दीर व छोटी पण आली. कुणाला नको म्हणणार? सगळे निघालो.

रुक्मीच्या घरी तर हलकल्लोळ उडला होता. काम करणाऱ्या बाया धाय मोकलून रडतही होत्या व रुक्मीला सांभाळतही होत्या. आम्ही पोचताच मायने टाहो फोडत रुक्मीला मिठी मारली. आम्हाला पहाताच रुक्मी परत बेशुद्ध झाली. तिला शुद्धीवर आणत होतो. शाम व मधले वर जाऊन पुढच्या तयारीला लागले होते. नंतरच्या बसने आमचे व छोटे हजर झाले. काळे निळे पडलेल्या आबासाहेबाना खाली आणले. मग मधले बडबडू लागले. काय तरी धोका वाटतो. माणूस फिका पांढरा पडतो, असा काळा नीळा नाय. शामने मग सगळे आपल्या ताब्यात घेतले. आमच्याकडे येऊन म्हणाला "जरा बाजूला या. बघा काका म्हणतायत धोका आहे. मी त्यांना पुरे तपासले. कुठेच जखम

नाही. म्हणजे कोणी चावलेले पण दिसत नाही. ते काळे नीळे पडलेत म्हणजे कोणीतरी विष पाजले किंवा ते स्वतः प्यालेत. रुक्मीला विचारा काल संध्याकाळी कोणी भेटायला आले होते का. सगळे समजल्या शिवाय तक्रार करायला पोलीसात गेलो तर रुक्मीला त्रास होईल. घरात ते दोघेच असतात गे. रुक्मीला पोलीस हैराण करतील. तेव्हा काय करुया?."

मी मधल्याना बोलावले परीस्थिती सांगीतली. वर म्हटले "तुम्ही स्वतः तपासून खात्री करा, काही चावले तर नाहीना याची. मगच ठरवा काय ते. नाहीतर फुकटचा घोळ घालून बसू व रुक्मीला त्रास होईल."

त्यांनी थोडावेळ विचार केला. मग गुरू आणि शामला घेऊन गेले. सगळया माणसाना बाहेर काढून भाऊसाहेबांचे कपडे बदलताना परत सर्व तपासले. मग येऊन म्हणाले "गेलेला गेला गे तो काय परत येणार. पोरीला त्रास नको. आता मुलांवर सोडू. काय म्हणतात बघू."

मुलांना आणायला एक भागेली परस्पर गेला होता. मुले दुपार टळल्यावर बरेच घटकानी आली. परत एकदा बोंब उठली. रुक्मी सगळ्या मुलांना कवटाळून आता रडत होती. बऱ्याच वेळाने त्यांना शांत करून पुढच्या कामाला सगळे लागले. राघव, माधवला घेऊन सर्वांनी स्मशानाची वाट धरली. थोड्या वेळात घरात स्मशान शांतता पसरली. मधुनच रुक्मी व मितुचा हुंदका निघत होता. सगळेच दुःखात बुडालो होतो. अंमळ रात्र पडू लागली आणि मंडळी घरी परतली. राघव व माधव रुक्मीकडे येवून हुंदकून हुंदकून रडत होते. मधली तर रुक्मीच्या बाजूला जमिनीवरच झोपली होती. कुणाच्याही हुंदक्या बरोबर गदगदून हलत होती. आवाज फुटत नव्हता.

आता मात्र नको ती जबाबदारी माझ्यावर पडली होती. सर्वांच्या पोटात काहीतरी जायला हवे होते. एवढी वर्षे इनामदारांकडे इमाने जेवण करणाऱ्या बाई होत्याच. डाळ तांदळाची खिचडी शिजवायला सांगीतली. मग एकएकाला समजावत दोन दोन घास पोटात जातील हे पाहिले. पण रुक्मीला कोण भरवणार? कसे समजवणार? पायात कांपरे भरले. शामला माझी अवस्था समजली होती. तो पुढे आला. अजून तोही जेवला नव्हता. माझ्या हातून थाळी घेत रुक्मी जवळ जाऊन बसला. हळूवार डोक्यावर हात फिरवत म्हणाला "रुक्मीताय, मी काय समजूत काढणार गो? पण पोरांकडे बघ. त्यांना कोण गो? ल्हान आहेत गो ती. म्हणून दोन घास खा.......चल मी भरवतो..........होय गो तुझं दुःख काय कोण घेणार आपल्यावर? पण पोरांसाठी उभी हो गो लवकर. आम्ही आहोत

तुझ्यामागे. एका हांकेवर धावणार गो तुझ्यासाठी. चल दोन घास खा." रुक्मीचा रडायचा कढ वाढला. शाम तिला थोपटत शांत करीत होता. हळू हळू त्याने तिला भरवायला सुरवात केली.

भावा बहिणींच्या प्रेमाचे सुंदर चित्र मी बघत होते. शाम होता म्हणूनच रुक्मीच्या पोटात दोन घास जाऊ शकले होते.

रात्री हुंदके आणि सुस्कारे ऐकत चालली होती. मध्य रात्रीनंतर जरा शांतता पसरली. थोडा वेळ जातो न जातो तोच ती शांतता चीरत फटाके फुटत असल्याचा आवाज येवू लागला. परत एकदा एक दोन हुंदके व सुस्कारे निघाले. मग सगळेच शांत झाले.

सकाळ उजाडली ती मात्र आश्चर्य घेऊनच. मी उठले तेव्हा रुक्मी उठून बाहेर गेलेली दिसली. मी बाहेर आले आणि पहाते तर काय रुक्मी आपल्या रोजच्या कामाला लागलेली दिसली. पदर खोचून ती गोठ्यातल्या गाई, म्हैशींचे दूध काढायला नोकराला सांगताना दिसली. मग सगळीकडे फिरत कामे कशी होतात हे पहात फिरत होती. मी कितीतरी वेळ हे पहात मागच्या दारातच उभी होते. ती परतली माझ्याकडे आली तेव्हा डोळे डबडबले होते. म्हणाली "इनामदाराना दुःख देखील करत बसायला वेळ नसतो गे. रात्रीचे फटाके ऐकलेस ना तू? भानावर आणले ग त्या आवाजाने. ही भाऊबंदकी मी माझ्या मुलांपर्यंत पोचू देणार नाही. जास्त रडत बसले तर आणखी फटाके फुटतील. ही सगळी भाऊबंदकी इथेच संपवायचीय मला."

हे रूप, हे बोलणे आता मला घाबरवून टाकीत होते. पोर एवढ्या वर्षात बोलली नव्हती पण खूप सोसले होते असणार. त्यातूनच ही निश्चयी भावना आली असणार. सासरचे माहेरी काही सांगायचे नाही ही माझीच शिकवण. आता विचारू तरी कसे? पक्के माहीत होते ती काहीच सांगायची नाही.

आता मधली उठली होती. माझ्या मागेच येऊन उभी होती. तिचे तोंड आ वासून उघडे पडले होते. मग हुंदकत मला बोलली "बरी आहे ना हो रुक्मी? वेडबीड नाय ना?" तिची पोटची माया वेडा विचार करीत होती. मला रुक्मी किती कणखर झालीय ते दिसत होते.

हळू हळू सगळे उठले. मग सगळ्यांचे चहापाणी रुक्मीच पाहू लागली. नोकर बाया जेवण करणारी अचंब्यात पडलीच पण तिचे हुकूम सर्व अगदी अलगद उचलू लागले. मधली हे बघून अजून रडू लागली.

"ऐन चाळीशीत नवरा गेला हो तिचा. आणि ही अशी काय करतेय? जिव्हारी लागणारे हे दुःख असं सहज पचवलं हिने?" माय रडता रडता विचारत होती.

"इनामदार सोयरीक आठवते तुला? धाकले सासरे काय म्हणाले होते आठवते तुला? अगो एवढ्या वर्षात धड माहेरी पण नाही आली. घरची भावा बहिणींची लग्ने पण लांबूनच ऐकली, पाहिली पण नाहीत. त्यावेळी विचारलंस मनाला असं का? भरपूर श्रीमंत इनामदार घर मिळालं ग पण सुखाचे दरवाजे बंद असलेलं घर होतं असं वाटतं आता. खूप भोगलं असणार. भोगणार पण आहे पुढे. हे तिला चांगलंच समजलंय. म्हणून पदर खोचून धीराने उभी झालीय ती. तू आवर तुला. नाहीतर तिला दुबळी करशील तू." मला हे बोलताना सुद्धा गळा भरून येत होता.

खरंच लग्न झाल्यावर तिची खरी बातमी मिळतच नसे. गुरू तिथे होता पण विशेष काही लक्षच दिले नसेल किंवा फक्त बाबालाच बोलला असेल. शाम फक्त एकदाच म्हणाला होता. आबासाहेब इनामदार जरा गैर मार्गावर जातायत का बघायला पाहिजेत. रुक्मीला त्रास होईल मग. काही बातम्या मिळतात गावांत वसुलीला जातो तेव्हा.

मी जास्त लक्ष दिले नव्हते. मला रुक्मीची खात्री होती. छोट्या मोठ्या गोष्टी लक्षात आल्या की ती बरोबर सांभाळणार. आता समजत होते. तिने किती सांभाळले असेल आणि किती सहन केले असेल ते.

दिवसकार्य होई पर्यंत थांबलो व दुसऱ्या दिवशी जायचे आले. आता रुक्मी घरात एकटी होणार मुले पण शिकायला जाणार. कसे होईल हिचे? ह्याच विचारात होते. आणि मधले म्हणाले "रुक्मे मागचं विसर. आता गुरूला ऱ्हावदे तुझ्या सोबतीला इथेच. कोणतरी हवे बरोबर. आणि हिशोब ठिशोब बघायलाय होईल. आठवड्यातून दोन दिवस येत जाईल घरी."

रुक्मीच्या चेहेऱ्यावर एक विषण्ण रेघ उमटून गेली. पण मानेने ठीक एवढेच दाखवले. मला मात्र मनात चर्र झाले. रुक्मीला परत घरातूनच त्रास सुरू होणार का? गुरू धडपणाने रहाणार का? शाम फार माया ठेऊन आहे. पण तो घरी सगळे सांभाळायला लागलाय. त्याला कसे जमणार? मनात देवाचा धावा केला. आता तरी अजून त्रास नको रे बिचारीला.

घरी निघून आलो. येताना मधली माझ्याबरोबर होती. मधले दीर अगोदरच निघून गेले होते. गाडीत मधली मला म्हणाली "मधून मधून मी आले तर चालेल काय वो. गुरू धड ऱ्हायला हवा ना? म्हणून म्हणते. ती कोणाकडे मन उघडे करील आता?" हिला पण

आपल्या मुलाचा आधार वाटत नव्हता. पाहू ग पुढे. येवू दोघी भेटायला. रुक्मीलाच विचार मग तू. ती विचारी आहे सांगेल काय करायचे ते.

सुस्कारा देत ती गप्प झाली. शाम पुढ्यातच बसला होता. मागे वळून म्हणाला "माय मी भेटत जाईन या बाजूला आलो की. नाहीतरी महिन्यातून एकदा तरी येतोच इकडे मी."

मला बरे वाटले. तेवढीच खुशाली तरी समजेल. ती दुःख काही सांगणार नाही.

इनामदाराना जाऊन महिना झाला होता. आणि गुरूने मधलीला सांगीतले "आबासाहेबांनी देखील कोणी एक बाई ठेवली होती. एक बाग तिला दिली होती. त्या बाईने म्हणे रुक्मीला भेटून सांगीतले की थोडी शेतीपण दे नाहीतर पोलीसात तक्रार करेन तूच इनामदाराना मारलेस म्हणून."

मधली घाबरून धावत माझ्याकडे आली होती. हे ऐकून आम्ही सगळे घाबरलोच. शाम शांतपणे म्हणाला "आपण उद्याच निघू. रुक्मीला विचारल्या शिवाय काही कुणाला सांगू नका. मला वाटत नाही असे काही असेल. मी बोलेन त्या बाईशी गरज पडली तर."

दुसऱ्या दिवशी आम्ही पोचलो तर रुक्मी बोललीच "माहीत होते मला तुम्ही धावत येणार ते. अग असं काही नाही. आबासाहेब असल्यातले नव्हते. ही बाई लग्ना पासूनच मला माहीत आहे. काकींनीच सांगीतले होते. ती बाई खरेतर आबासाहेबांची बहीणच म्हणायची. मधल्या काकानी ठेवलेल्या बाईची मुलगी. ते गेले, त्या काकी पण मागोमाग वारल्या. दोन्ही काकांचे भाग आबासाहेबाना मिळाले होते. माझ्या लग्नानंतर या दुसऱ्या काकी नेहमी म्हणायच्या अरे इनामदारांची पापं फेड नायतर रसकस लागतात रे. मग आबासाहेबांनी ती बाग तिच्या नावावर करून दिली. मला सगळे माहीत होते. बागांची वसुली मीच बघायची. ती बाग नावावर करायच्या अगोदर भागातच होती. पण काकींच्या सांगण्या वरून मी कधी वसुलीला गेलेच नाही. तिच्याशी कुठलाच सबंधही नव्हता आमच्या घराचा. आता तिला कुणीतरी चढवलेय असे वाटते. मी बोललेय तिच्याशी."

आमचा जीव खूप विसावला. तरी सुद्धा तिची धमकी सतवत होती. पोलीसात तक्रार केली तर नसता त्रास रुक्मीला झाला असता. मग शामने विचारले "रुक्मे, तू बोललीस खरी पण तिने मानले काय? नाहीतर परत बसेल अडून."

"शामदादा, खरा त्रास तिच्याकडून नाही रे. कोणीतरी भरवलेय तिला. मी सरळ सांगीतले, अगो तू यांची बहीण. लोकानी तुझा संबंध यांच्याशी लावलाय. पटते तुला ही बदनामी? अगो तू आमच्याच कुटुंबातली. काकांची मुलगी तू म्हणून तुला बाग दिली ना? मग मानाने जग. या घाणेरड्या कटात कशाला पडतेस? तुझी बदनामी होते यात.

आबासाहेब गेलेत आता त्यांची तर बदनामी ऐकायला नाहीत ते? वर माझ्याकडे बक्षिसपत्राचा कागद आहे. त्यांत लिहीलेय तू काकांची अनौरस मुलगी म्हणून तुझ्या भरण पोषणासाठी ही बाग तुला देत आहोत म्हणून. मी हे कागद सगळ्यांसमोर ठेवले तर लोक तुझ्याच तोंडात शेण घालतील गो. कोण सांगतो म्हणून उगीच भरीला पडू नको. बदनाम होशील. आणि तुला जर काय कमी पडले तर ये माझ्याकडे. माझ्याने होईल तेवढे करीन मी तुझ्या साठी.'' रुक्मीने काय झाले ते सविस्तर सांगीतले.

''अगो पण तिने यातले काय मानले कां?'' शामदादाने परत विचारले.

''शामदादा तिला सल्ला देणारा माणूस हादरलाय रे. मांडवकर सल्ला देत होता. मागे भाऊसाहेबांचे बळ होते. हिने बक्षिस पत्राचा मजकूर सांगीतल्यावर गडबडले दोघेही. तरी उसने अवसान आणून भरीला घालत होते. मग मी तिला सांगीतले, विचार तुझ्या सल्ला देणाऱ्यांना की पोलीसानी तिलाच पकडले तर? दोघांतले कोण येणार सोडवायला ते. दोघेही गप्प झाले. तिला बरोबर समजले. मला सांगून गेली, परत नाय नादी लागणार त्यांच्या.'' रुक्मीचे बोलणे ऐकून मला परत एकदा वाटले. कशी हुशारीने सगळे सांभाळते ही. एकटीने सगळे मिटवले होते. आम्ही धावत आलो खरे पण तिने सगळे अगोदरच निकालात काढले होते.

मग मधलीला म्हणाली ''माय, पण मला एक ढग तुझ्यावर येताना दिसतोय. ती इथे यायची, तिची नजर गुरूवर पडलीय. गुरू तिच्याकडे जाऊन आलाय एकदा. बाबानेच त्याला ठेवलाय इथे. काय झाले तर मला दोष लावू नकोत. त्याची बायको तिकडे आणि हा इकडे हिच्याकडे जायला लागला तर बघ काय होईल ते. मी त्याला जायला तरी कशी सांगू? बाबानेच ठेवलाय ना इथे.''

आता चित्रच पालटले. मधली अस्वस्थ झाली. काहीतरी पुटपुटू लागली. ती असहाय्य होती. नवऱ्याशी बोलायची तिची हिम्मत नव्हती. शाम माझ्याकडे बघत होता. मी काय करणार होते? घराचे भाग झाल्यापासून सगळे व्यवहार वेगळेच झाले होते. मी गप्पच राहिले. आम्ही मग एक दिवस ऱ्हायचे ठरवले. शाम एकटा परत गेला. संध्याकाळी गुरू आला. मग मधली त्याच्याशी बोलायला उतावळी होत होती. मी तिला रोखत होते.

मग विचार आला. रुक्मीला सगळे माहीत होते म्हणून ठीक. नाहीतर केवढ्या मोठया मनःस्तापाला तोंड द्यावे लागले असते तिला. पूर्वीच्या इनामदारांनी आपले गुण उधळले होते आणि आबासाहेबांना बदनामी आली असती. वर रुक्मीला ताप झाला असता.

दुसऱ्या दिवशी सकाळी ती बाई अचानक हजर झाली. रुक्मीने तिला मायेने आत बोलावून बसवले. मग गोड आवाजात चौकशी करून येण्याचे कारण विचारले.

“काल मांडवकर आले होते. पंचायत बोलवून गावातून हाकलवू म्हणून धमकी दिली मला. आता काय करू ताई?” ती रडकुंडीला येवून विचारत होती.

“हे बघ, तू आमच्या संबंधातली. आम्ही तीन भागाचे इनामदार. आमचे भागेली जास्त. घाबरू नकोस तशी वेळ आली तर मी तुझ्या मागे आहे. परत मांडवकर आला तर त्याला सांग. त्या दुसऱ्या इनामदारांच्या अनौरस मुलाला ओळखते म्हणून. ती बाईपण माहीत आहे म्हणावं. त्यांना अगोदर काढा बाहेर. मग मला बोला. आणि म्हणावं तू कोणाबरोर रहात नाय. एक दिवस लग्न करणार तू. आईची सजा तुला का? विचार बेधडक. बघ सगळे शांत होतात की नाही ते. मी आहे ठाम तुझ्या मागे. आणि एक बघ तू माझ्या बरोबर चांगली ऱ्हायलीस तर मी पण चांगली. नाहीतर तुझं नशीब. माझ्या घरातल्यांकडे नजर नाही करायची. चांगला कोणतरी बघ आणि लग्न कर. एवढी बागेची मालकीण आहेस तू आता.” रुक्मीचे समजावणे मी ऐकत होते. सगळ्याच प्रश्नांचा तिने निकाल लावला होता. कदाचित मलाही एवढं जमलं नसतं.

ती बाई रुक्मी पेक्षा आठ दहा वर्षांनी तरी लहान होती. अजूनही काही ती बोलली व चहा घेऊन निघून गेली. मधली मग कडकडत बोलू लागली,

“काय गो हे रुक्मी, चांगली हातात आली होती. चांगला दम मारायला हवा होतास. गुरूला भेटायचे नाही म्हणून सुनवायला पाहिजे होतेस.” रुक्मी हसत बाहेर गेली.

मी मधेच बोलले “अगो सगळे प्रश्न भांडून नाय सुटत. रुक्मीन शांतपणान सोडवलान गो तुझा गुंता. आता गुरूला नाय उभे करणार ती. तू ऐकत काय होतीस तर?”

“मी सगळं ऐकलं. हे कधी सांगीतलं तिने? आणि तिने हो म्हटलं? मी नाय ऐकलं.” मधली

“सगळ्याच गोष्टी सरळ नसतात बोलत कोणी. ती बाई समजली काय ते. तुझी पोरगी एकदम हुशार आहे. खरी इनामदारीण शोभते बघ.” मी मधलीला बोलत होते. रुक्मी तेवढ्यात आली. म्हणाली “आई, मुलं असली की पंचाईत होते. असलं काही बोलता येत नाही. मुलं मोठी झालीत. पण इनामदारांची लढाई गनिमीकाव्याची गे. जीव थकतो विचार करून.”

खरं होतं तिचं किती विचार करीत असेल? शांतपणा कसा टिकवत असेल? असल्या परिस्थितीतून ती कधीच गेली नव्हती. इथेच शिकली काय सगळं? इनामदारांच्या घरात

मोठेपणासाठी दिली खरी तिच्या बाबाने पण तिच्या नशिबी त्यांचा उकीरडा उपसणेच आलेय.

आम्ही दुपार नंतर निघालो पण मन मात्र रुक्मीकडेच घोटाळत होते.

वाटेत मधलीने जीव खाल्ला. सारखी म्हणत होती, घरी गेल्यावर यांना सांगून गुरूला कायमचा बोलावून घेणार. विषाची परीक्षा नको. काय बाय या पुरुषांचा भरोसाच नाय. अवदसा आठवते यांना. असे काय काय बडबडत होती. मग मी तिला चापले. म्हणाली, बघ रुक्मीने सगळं सांभाळलंय व्यवस्थित. तू उगीच मधे पडू नकोस. ती बरोबर सरळ करील गुरूला. मग गप झाली.

घरी पोचून दोन दिवस झाले तर मधली दुपारला माझ्याकडे आली. रडतच होती. सांगू लागली “हे चिडून भांडत होते. कलागती लावायला रुक्मीच्या घरी गेले होता काय विचारत होते. गुरूने येवून काय तरी सांगीतले त्यांना. रुक्मीलाय शिव्या घालत होते. एक बाग मागीतली तर आम्हाला नाय दिली आणि कुठल्या कोण बाईला फुकट दिली. आम्ही काय पैसे देणार नव्हतो? असलं काय तरी बडबडत माझा जीव खातायत. आमची शेती काय कमी आहे. ती धड करीत नाहीत आणि दुसऱ्याच्या इस्टेटीची हांव धरतात. काय करू सांग? जीव कंटाळून गेलाय कटकटीला.”

मला सगळे पटत होते. पण मी काय सल्ला देणार? त्यांच्या कुटुंबातले भांडण मी काही बोलले तरी आगीत तेल घातल्यासारखे झाले असते.

तू नको लक्ष देऊ. आणि पहा काय होते ते. रुक्मीवर विश्वास ठेव. ती काही वावगं खपवून घेणार नाही. मग जरा शांत झाली.

आता गुरू चार दिवस रुक्मीकडे व दोन तीन दिवस इकडे अशा फेऱ्या करत होता. तो इकडे असला की मधेच एकादा दिवस मधले रुक्मी कडे जाऊ लागले. पोरीची माया बोलण्यातून दाखवीत मग गावभर भटकत. मला मात्र पोटात भिती  वाटे. हे आणखी काही उलटे सुलटे तर करणार नाहीत तिथे? अशी शंका कायम येई.

मी शामला सांगीतले, रुक्मीने बोलावले तरच तिच्याकडे जायचे. तुझे काका व गुरू बघतात ना, आता आपली लुडबुड नको. तो हसला. मला समजले, त्यालाही याची कल्पना आली होती.

दोन तीन वर्षे गेली आता मालीनी, राघव, माधव शिक्षण पुरे झाले म्हणून परत आले होते. मितू पुढच्या वर्षी येणार होती. आणि मला रुक्मीचा सांगावा आला. मालिनीसाठी

चांगले स्थळ शोध. मी सुखावले. माझ्या मुलीने माझ्यावर केवढा विश्वास टाकला होता. पण हे मधल्यांना पटेल  का अशी शंका मनात येवून गेली. मी मग कामाला लागले.

जग झपाट्याने बदलत होतं. मुली शिकून विचारी झाल्या होत्या. मालीनीला मुंबईचाच मुलगा पाहिजे होता. कोणीतरी सरकारी हुद्देदार पहावा असा स्पष्ट सांगावा घेऊन राघव आला होता. आणि नशीबही जोरावर होते. नांदगावच्या खोतांचा मुलगा नव्या सरकारात हुद्देदार होता. मुंबईत नुकतीच बदली होऊन आला होता. मी शब्द टाकला आणि लगेच चक्र फिरू लागली.

मालिनी दिसायला उजवी व गोरीपान होती. कॉलेज शिकून पुरे केले होते. झटपट लग्न ठरले. मालिनी देखील खूष झाली. मनासारखे सगळे मिळाले होते. पण मधले खट्टू झालेले समजले. रुक्मीशी वाद घालायला गेले. त्यांची नात, त्यांना नाही विचारले याचा राग आला. रुक्मीने सांगीतले म्हणे “स्थळ शोधणे आईचेच काम ती छान जमवते. तिलाच करू दे.” मला हे सगळे मधली येवून सांगे. जीवाला समाधान वाटे. मुलांचे आपल्यावरचे प्रेम, विश्वास पाहिले की समाधान वाटे. वयाबरोबर थोडा हळवेपणा मनात रुजू लागला होता.

रुक्मीच्या मालिनीचे लग्न माझ्यासाठी समाधान देणारी गोष्ट होती.

*****

## १७

## रुक्मीणी-

मुलांची शिक्षणे पुरी होत आलीत. राघव व माधव आता हातात येतील. त्यांची इनामदारी ते सांभाळतील. गुरूला आता त्याच्या गावी पाठवले तरी चालण्यासारखे आहे.

मधल्या काळात उत्पन्नातही खूप घट झालीय. गुरू म्हणत होता कूळ कायदा आलाय. भातशेतीचे भागेली खंड देत नाहीत. नव्या सरकारने कायदा केलाय म्हणे कसेल त्याची जमीन. मग आमची जमीन त्यांची होणार. असं कसं? आपलं सरकार आलं म्हणतात. तेच सरकार असं अन्याय करणार? हे वकिलाकडे जायचे, काय व्यवहार केलेत काहीच माहीत नाहीत. कसं सांभाळायचं सगळं? इनामदारांच्या इस्टेटीच्या कटकटीच वाढत होत्या. उत्पन्न घटत होतं.

आज ती बाई आली. मला नोकरांकडून कुजबूज आलीच होती. मांडवकर सगळीकडे आवई उठवत होता. “आबासाहेब गेले पण त्यांनी ठेवलेल्या बाईचे काय? एक बाग दिलीय तिला नावावर करून. उगीच कोणी बाग देतो का?”

मला या बाई बद्दल माहिती होतीच. आबासाहेबांच्या मोठ्या काकांनी बाई ठेवली होती तिची ही मुलगी. धाकट्या काकीनी मला सर्व माहिती दिलीच होती. व आबासाहेबांच्या मागे लागून तिला एक बाग द्यायला लावली होती. तिच्या पालनपोषणाची जबाबदारी इनामदारांचीच हा ठाम समज होता त्यांचा. मलाही तो पटायचा.

ती बाई जरा ताठ्यातच आली होती. म्हणाली “माझे पुरे पडत नाही एका बागेवर. भातशेती नाही. सगळं विकत आणायचं. दोन एकर भातशेतीची जमीन द्यायला लागेल तुम्हाला.”

मला हसू आले. चार नारळाच्यां झाडांवर चार माणसाच्यां कुटुंबाचा संसार चाले गावात. नारळी पोफळीची झाडे नगदी उत्पन्नाची. आणि ही एकटी बाई तीस नारळाची

झाडे आणि साठ सत्तर पोफळी असलेल्या बागेची मालक, पुरे पडत नाही म्हणत माझ्याकडे भातशेती धमकावत मागत होती. कोणी चढवल्या खेरीज ही नक्कीच बोलणार नाही. मांडवकर हिच्या बद्दल आवई उठवतो. मांडवकरने आमची बाग सोडली आणि भाऊसाहेबांकडे गेला. म्हणजे या मागे भाऊसाहेबही असतील. सर्व मनासमोर स्वच्छ दिसू लागले. मग मी तिला म्हणाले,

"हे बघ, तसं बघायला गेलं तर तू माझी नणंदच. कशाला इनामदारांच्या भाऊबंदकीत पडतेस? तू पोळशील यात. तुला चढवणारे मांडवकर आणि त्याचे धनी मजा बघतायत गो तुला चढवून, भांडण लावतायत गो आपल्यात. आता तूच ठरव तुला या भांडणांत पडून होरपळायचय की, आहेस तशी सुखांत ऱ्हायचंय? मी काय धमकावलेस म्हणून जमीन देईन ही आशाच सोड. तू काहीच करू शकणार नाहीस. पण उद्या मांडवकर तुलाच गावाबाहेर काढायला बघेल, तेव्हा कुठे जाशील? सरळ ऱ्हायलीस तर आम्ही पण आहोत आधाराला तुला. ठरव तूच काय ते."

माझे सरळ शांत बोलणे तिला पटले होते. काय बोलायला जागाच नव्हती. तरी बसून ऱ्हायली. मी चहा दिला व परत म्हणाले "तू आमच्या जास्त जवळची म्हणून समजावले. परत समजावणार नाही. भेटायला आलीस तर दार उघडे आहे. असली जबरदस्तीची मागणी घेऊन आलीस तर जवळ करणार नाही मी. मांडवकर ऱ्हातो का माझ्यासमोर उभा? आमची बाग सोडलीन त्याने, त्याची परिस्थिती सुधरली की खालावली ते बघ. मग समजेल तुला"

न बोलता उठली म्हणाली "येते मी." तिच्या आवाजानेच मला सांगीतले परत जिंकलीस गो तू.

दुसऱ्याच दिवशी आई, माय, शमदादा सगळे हजर झाले. त्यांना गुरूने उलटीच बातमी पोचवली होती. मी सविस्तर समजावले. पण मला हेही माहीत होते की गुरूच तिच्या बागेवर जातो. आमच्याकडे येणाऱ्या व्यापाऱ्याना तिच्याही नारळ सुपारीचा सौदा करवून देतो. तिची वसुली पण बघतो. पहिल्यांदा समज झाला की यांनीच पूर्वी सांगीतले असेल म्हणून पहात असेल सर्व. पण मग एक एक बातम्या येत होत्या. गुरूचे लग्न झाले होते. हा संबंध वाढता नये हे पहायला हवे होते.

आई आणि मायच्या पुढ्यातच तिला बरोबर समजावता आले. माय गुरूला परत न्यायचे बोलू लागली. मी तोच सूर पकडून तिला म्हणाले "दोन महिन्यांत मुले परत येतायत. राघवला सगळा व्यवहार गुरू समजावेल मग घेऊनच जा. मलापण मनावर ओझे

नको. गरज लागलीच तर राघवला पाठवीन गुरूला विचारायला." माय शांत झाली. आई मात्र न बोलता संतोषी चेहेऱ्याने बसली होती.

असेच दिवस जात होते. वर्षे उलटत होती.

मुले शिकून सवरून परत आली आणि घर परत गोकुळा सारखे झाले. मितु एकटी अजून शिकत होती. ती वर्षाने येणार होती.

मी राघवला गुरू बरोबर राहून सगळे व्यवहार पहायला सांगीतले. तो लवकरच सगळे समजत होता. समज चांगली, शिकलेला व जबाबदारीची जाणीव असलेला राघव खूप गोड बोले.

मालिनी मात्र जरा वेगळीच राही. तोऱ्यातच बोले. माधव तिला फार चिडवत असे. माधव मनमौजी वाटायचा. कामात जास्त लक्ष नसे. मैत्री खूप. भटकायला फार आवडे. मी त्याला खूप समजावे. पण त्याला काही फरकच पडत नसे.

मनात येई मालिनीचे लग्न घेतले पाहिजे. एक एक जबाबदारीतून हळू हळू मुक्त व्हायला पाहजे. आणि डोळ्यासमोर आई उभी ऱ्हायली. आईलाच सांगूया का चांगले स्थळ पहायला? हे मनातले मी राघवकडे बोलले. तो म्हणाला अगोदर मालिनीला विचार. तिला न विचारता काही ठरवायला गेले तर भडकेल ती. मालिनीला मी विचारताच ती तोऱ्यातच म्हणाली "मला कोणा गावच्या खोता बीताशी लग्न नाही करायचे. इनामदार आहोत आपण. कोणीतरी चांगला सरकारी हुद्देदार बघा. मुंबईकर असेल तर जास्त बरे."

मी हे अचाट बोलणे ऐकून भांबावलेच. आम्ही कधी मोठ्याना कोणाशी लग्न हे विचारलेच नाही. ते आपले चांगलेच पहाणार हा विश्वास होता. पण ही शिकली, जग फिरून आली. काय मिळवायचे याच्या पक्क्या कल्पना आहेत मनात. मग एवढा चोखंदळपणा ठेवला तर तसे स्थळ देखील मिळायला हवे. पण एक होते. मालिनी गोरीपान, दिसायला सुंदर होती. धारदार नाकावरचा तोरा मात्र ठशठशीत पणे जाणवायचा. आता तर हे काम आईकडेच सोपवूया तरच निभाव लागेल वाटले. राघवला समजावून आईकडे पाठवला. मायकडेही जाऊन भेटून ये म्हणून सांगीतले. पण निरोप फक्त आईलाच सांगायचा. मायच्या घरी नाही. मी बाबा लुडबूड करणार नाही याची काळजी घेत होते. आई बरोबर शोधून काढणार याची खात्री वाटत होती. आणि झालेही तसेच आठ दहा दिवसातच आईचा सांगावा आला. "येत्या मंगळवारी मुलगा मुंबईहून आठ दिवसा साठी येणार आहे जवळच्याच गावचा आहे. फार शिकलेला आहे. मुंबईत मोठ्या सरकारी हुद्यावर आहे. नोकरी बदली होणारी आहे. मालिनीला चालेल का विचार. हो

असेल तर कळव म्हणजे पहाण्याचा कार्यक्रम ठरवीन." मी सगळे मालिनीला सांगीतले ती पहातच बसली. मग विचारात पडली. जवळ जवळ तासाभराने येऊन म्हणाली होकार कळव.

आता चक्र लवकर फिरू लागली. मधला दिवस बघून पहाण्याचा कार्यक्रम झाला. आई आलीच होती.

चहा पोहे झाले तसे मग मालिनी म्हणाली, "आम्ही थोडे बोलतो, बागेत फेर फटका मारून येतो." मी तर बावचळून गेले. हे काय बोलतेय ही असा विचार करतेय तोपर्यंत पहायला आलेला मुलगाच म्हणाला "हो मी सुचवणारच होतो पण अजून गावाकडे अशी रीत आलेली नाही म्हणून थांबलो." मग मात्र मी न राहावून म्हणाले "हो जा तुम्ही पण माधवलाही घेऊन जा बरोबर. बागेत किरडुवं फार आहेत."

किरडुवं कसली? माझ्या पोटात आलेल्या गोळ्याने काहीतरी वदवले. मालिनी थोडी रागावली पण मुलगा म्हणाला "हो जरूर पाठवा. मला काहीच हरकत नाही." चांगले अर्ध्या तासाने ते फिरून आले. मी पाहिले तो मालिनी खुषीत दिसली. मुलाचा चेहेरा हसरा होता. मी ताडले मालिनीचे लग्न जुळणार.

रात्री माधव सगळ्यांच्या पुढ्यात त्यांचे संभाषण आम्हा ऐकवीत होता जोर जोरात हसत होता मालिनीची उडवत होता. पहिल्यांदाच मालिनी हे ऐकूनही हसताना पहात होते. माधव सांगत होता.

"अग आई ह्या मालीताईनेच त्याला प्रश्न विचारले. सरकारी नोकरी म्हणजे कुठल्या सरकारात राज्यात की केंद्रात? हुद्दा काय? बिचारा सगळी उत्तरं शांतपणे देत होता. ही काय त्याच्याशी लग्न नाय करीत, त्याच्या हुद्देदार नोकरीवर करतेय." मग जोरात हसला. परत सांगू लागला "तो म्हणाला नोकरीत बदली होत राहाणार. दोन वर्षांत तर दिल्लीलाच जावे लागेल असे आहे. मग माहेरी यायला मिळायचे नाही दोन दोन वर्षे. चालेल? तर ही म्हणते कशी गावढ्यात येऊन काय करायचेय? इनामदारांचे वैभव सरताना बघून मलाच त्रास होतोय. गावापासून दूरच बरे. म्हणजे आई, लग्ना नंतर ही काही येणार नाही बघ."

सगळे ऐकताना आईची आणि माझी एक दोनदा नजरा नजर झाली पण तिच्या डोळ्यातले खूप प्रश्न मला समजले.

चार दिवसांत निरोप आला. मुलगी पसंत आहे. महिन्या भराने कार्तिकात लग्न घ्यावे. मागण्या काहीच नाहीत. लग्न मुलीच्या घरीच होईल. आठच दिवसांच्या रजेवर येणार तेव्हा सर्व विधी तेवढ्या दिवसातच करा.

मी गारठलेच हे कसले लग्न? इकडे लग्न पंधरा पंधरा दिवस चालते. आठ दिवसात कसं बसवायचं? राघवने माहिती दिली आता शहरात लग्न एका दिवसातच होतात. आठ दिवस खूप झाले. लग्ना नंतर ताबडतोप परतावन घेतले म्हणजे झाले.

तयारीला माय आली. बाबा ठाण मांडून होताच. बहिणी व आई लग्नाच्या आदल्या दिवशी आल्या. आई फार थकली होती. माझ्याकडून गेली ती तापाने आजारी झाली होती.

आई म्हणाली "रुक्मे उद्या तुझ्या पोरीचे लगीन गो. समजावलेस ना तिला व्यवस्थित?"

मला समजले तिला काय म्हणायचे ते. मी सांगीतले "आई बोलवले गे मी तिला बरोबर झोपायला आणि विषय काढला तर ताडकन् उठून निघून गेली. तणतणत म्हणाली "आम्हाला माहीत आहे लग्नाचा अर्थ."

आईने सुस्कारा दिला. म्हणाली "होय गो! मायेचे बंध कमी होतायत. आयुष्याचे विचार शिक्षण आधीच ठरवतंय. आपणच बदलायला पाहिजे. त्यांच्या कलाने घ्यायचं दुसरं काय!"

लग्न झाले. मानपान व्यवस्थित केले. दरवेळी जावई नाही नाही म्हणायचे. या प्रथा बंद करा म्हणायचे. मला समजायचेच नाही. लग्नाच्या पांचव्या दिवशीच मालिनी नवऱ्याबरोबर मुंबईला निघाली. पोचवायला आम्ही गेलो होतो. मालिनीला जवळ घ्यावे वाटत होते. पण तिच्या डोळ्यात जराही पाणी नव्हते. मी कढ दाबत होते. तिने व जावयांनी एकदम नमस्कार केला. डबडबलेल्या डोळ्यातून पाणी मी निकराने परतवीत होते. रडून माया व्यक्त करणं आता इतिहासात जात होतं. मालिनी अगदी हसत हसत सर्वांचा निरोप घेत होती. पाया पडल्यानंतर गळ्याला मिठी मारली नाही ते बरंच झालं. नाहीतर माझे सगळे बांध फुटून डोळ्यातून धारा लागल्या असत्या.

घरी परत आलो. गोतावळा एक एक करीत कमी होत होता. दोन दिवसात घरी आमचे आम्हीच झालो. परत होता तसा राम रगाडा सुरू झाला.

आठ एक दिवस गेले व राघव मला एकटे गाठून म्हणाला, "आई! तुझ्याशी बोलायचे आहे. कुणाला समजता नये अशी गोष्ट आहे. लग्न होते म्हणून बोललो नाही. सांगू?" त्याचा चेहरा बघून मला चर्रर् झाले. मी मान लववताच तो म्हणाला "आई, गुरूमामा केव्हा पासून हिशोब बघतोय?"

"ह्यांच्या वेळपासूनच आहे तो. का रे? का रे काय झालं?"

“आई! तो तुझा भाऊ आहे. मी बोललो तर वाईट नाय ना वाटायचं तुला?”

“बोल तू. मी सगळ्यांना ओळखते. काय आहे ते स्पष्टच बोल.”

“मला हिशोबात गडबड वाटली म्हणून मी एक एक वर्ष मागे मागे जात सगळे हिशोब तपासले. अगदी बाबा असताना पर्यंतचे. मग काही व्यापाऱ्यांकडून आपली खाती लिहून आणली. अगदी सर्व वर्षांची. त्यांत दिसले की कित्येक येणी लिहीताना नंतर कमी केलीत व खरोखर आलेले पैसे कमी करून दाखवलेत. व्यापाऱ्यांची खाती व आपली खाती यात खूप तफावत आहे. मग भागेल्यांकडे तू किती वसुली केलीस ते पहायला गेलो तर त्याचा ताळमेळ लागतच नाही. मामाला कसं विचारायचं समजत नाही. तुलाच लक्ष घालावे लागेल.” राघव

“सगळा मिळून किती घोळ घातलाय त्याने ते काढलेस काय? ते सांग मग बोलते”

“आई पण अशाने भांडणाला तोंड फुटेल. मला दोष देईल मामा. आपले संबंध बिघडतील. तसे काही होऊ नये वाटते. सगळे मिळून गेल्या आठ वर्षांत लाखाच्या वर पैसे कमी झालेत.”

राघव कडून रक्कम ऐकली आणि तोंड उघडेच पडले. एवढी रक्कम मला मालिनीच्या लग्नाला पण लागली नव्हती. संताप झाला. माझा सख्खा भाऊ आम्हाला लुटत होता. अगदी यांच्या वेळपासून. यांनी व्यवस्थित लक्ष दिले असते तर असे झाले नसते. विचार करून काय उपयोग. काकींचे बोलणे आठवले. घरात येईल ते आपले. गेले त्याचे दुःख नाही करायचे. मग मनाशी ठरवले. गुरूला म्हटले, “आता घरी जाशील तेव्हा बाबाला बोलावलेय सांग. नाहीतर बरोबर घेऊनच ये. मला निकडीचे काम आहे.”

दोन तीन दिवस गेले व बाबा आणि गुरू आले. चहापाणी झाल्यावर विषय काढला.

“बाबा! एवढे दिवस गुरूने खूप सांभाळले आमचे. आता राघव आलाय. चांगला शिकून सवरून आलाय. तो सांभाळील आता. त्यालाही सांभाळू दे. करील चुका पण टक्के टोणपे खाऊनच शिकणार ना? शिवाय मायलाही मदत होईल गुरूची. थकतेय बिचारी दिवसे दिवस.” मी

“अगो, अजून लहान आहे तो. एवढ्यात कशाला सगळेच अंगावर टाकतेस पोराच्या. गुरू बघेल की दोन चार वर्षे अजून.” बाबा.

मला लोचटगिरी पुरी समजत होती. चीडपण येत होती. ती दाबली व म्हणाले “काय मदत लागली तर बोलवूच रे. पण आता राघवलाच सांभाळू दे. तू फक्त सांग गुरूला

हिशोबाचे किती देवू? हे असते तर त्यांनी केला असता हिशोब. राघव म्हणतो मामाचा हिशोब करायला जड पडतय. मलाच बघितलं पाहिजे रे.''

आता त्यांना नक्की समजले की मी काही बधणार नाही. माझा स्वर निर्णयी होताच पण लागटही नव्हता. बरोबर अडचणीत आले होते. मला फार वाटत होते चांगली समज द्यावी. पण मग भांडणाला सुरवात झाली असती.

''तुम्हालाच नको तर मग काय जाईल परत. हिशोब सगळा घेतलाय ना बरोबर. हो नायतर मागाहून ठपका नको आमच्यावर. मुलगी म्हणून आधाराला आलो आणि बदनाम झालो. असं नको व्हायला.'' बाबा मानभावी पणाने बोलला.

मग मी पण बोलले ''अरे तूच म्हणालास ना ल्हान आहे राघव अजून. काय समजलं तेवढं माहीत त्याला. आणि म्हणालेच ना मी गरज पडली तर बोलवूच. संबंध तोडायचे थोडेच?'' मी.

''बरं तर येतो आम्ही. आता गुरू काय यायचा नाही. मी येईन गरज पडली तर. त्याला अपमान वाटणारच. एकदम नाय म्हणतेस त्याचे.'' बाबा

''अरे पण वाईट वाटायला तो काय नोकरी करीत होता? तो तर मदत करीत होता ना? मग आता माझा मुलगा बघेन म्हणतो, शिकून तयार झालाय तर त्याला सुटे नको का करायला? यात अपमान काय करतोय रे? त्याला किती पैसे देऊ ते तर सांग.'' मी

''आबासाहेब २०० रुपये महिना म्हणाले होते. आता सहा सात वर्षाचे किती होतात बघ.'' बाबा

''मधे काय दिलेच नाही काय रे? त्याचा हिशोब ठेवलाय की नाहीस रे गुरू? तो सांग राघवला आणि मग पुढच्या आठवड्यांत ये. देईन सगळा हिशोब एकदम.'' मी

बरंय म्हणत दोघेही निघाले. लांब गेले तसे राघव बोलला ''आई, बरे सांवरलेस. काही हरकत नाही. २०० रुपयाप्रमाणे सात वर्षाचे सोळा हजार आठशे होतात. देऊन टाक सगळे. गळती थांबेल कायमची. आणि भांडण काढायला जागा तरी राहाणार नाही.''

मी विचारात पडले. आता मायला काय वाटेल. ती गैरसमज करून गुरूला काही बोलणार नाही ना? त्यांच्या घरात काही बोलाचाली तर नाही ना होणार? चार एक दिवसानी माय जयंतला घेऊन आली. मला म्हणाली ''काय झाले गो रुक्मे? काही गडबड तर नाही ना केली गुरूने? एकदम येवू नको म्हणालीस? हे तर तुला शिव्याच घालत बसलेत. मला म्हणाले जा पोरीकडे आणि गुरूचे जे काही पैसे देईल ते घेऊन ये. म्हणून आले गो.''

“माय काही झालेले नाही. आता राघव आलाय बघेल तो म्हटले तर चुकले का? आणि गुरूला काय कायम इथे ठेवणार काय? एवढे दिवस मदत केलीन तेच खूप झाले.” मी मायला समजावले. मग शांत झाली. माय सरळ विचार करणारी पटकन विश्वास बसला. मग इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्या. मायपण रोडावली होती. सांधे दुखतात म्हणत होती. रात्री ऱ्हायली आणि दुसऱ्या दिवशी गेली. जाताना राघवने पैशाचे पाकीट मायच्या हाती दिले. वर म्हणाला आत हिशोब लिहीलाय. मायने पाकीट बघितले व म्हणाली “ पाकीट जाडजूड आहे. एवढे कसले पैसे? तो तर पगार म्हणून दर महिन्याला दोनशे अडिचशे आणून मला द्यायचा. बाबाला द्यायचा ते वेगळेच मग आता एकदम एवढे कसले?”

“तुम्ही द्या मामाला. त्याला समजेल हिशोब. आणि तुम्ही तर आमचेच आहात. तुम्हाला चार पैसे जास्त गेले तर वाईट थोडेच वाटणार आम्हाला?” राघव हसत बोलला.

मी इनामदारांच्या घरात पहिल्यांदाच मनाची श्रीमंती असलेला इनामदार पहात होते. समाधान पावत होते.

पुढच्या वर्षातच खूप काही समजू लागले. एकतर सगळे उत्पन्न घरात आले तेच मुळी गुरूच्या वेळेपेक्षा दीडपट होते. काही भागेली हळू हळू बोलू लागले होते. इनामदारांचा भाग काढला की त्याचे चार भाग करायचे. तीन भाग वाडयावर पाठवायचे व एक भाग गुरूचे बाबा येवून घेऊन जायचे. बापलेक मिळून आम्हाला खात होते. मलातर जराही पत्ता लागला नव्हता. मुलीच्या घरीच डाका घालत होते.

राघव आता सगळे व्यवहार सुंदर सांभाळू लागला. माधवला तो वसुलीसाठी व भागेल्यांकडे पाठवू लागला. माधवला मात्र सगळ्याचा कंटाळा. मग राघव त्याला रागवे. माधव राघवला सांगे. दुकान काढतो, मला नाय मजा येत हा व्याप काढण्यात. मी खूप समजावे. पण माधव शहरात दुकान काढायच्याच गोष्टी करी.

भाऊसाहेब गारुडी तर झालेच होते. पण आता सरळ रहात असावेत असे वाटत होते. उज्ज्वला कधीतरीच भेटे. आता भेटली की वाटे ही पूर्वी सारखी बोलत नाही. काहीतरी दडवते आहे. एकदा मग मीच विषय काढला. म्हणाले “असे शांतपणे आपआपला व्यवहार सांभाळत राहिलो तर केवढी शांती. तुझ्याकडेही हल्ली शांत असते. बरे झाले भाऊसाहेब सुधारतायत.”

“ताई भ्रमात राहू नका. ते काय करतील याचा तुम्हाला अंदाज नाही. मागून वार करतात. तुम्ही बेसावध झालात की वार करणार. फार पाताळयंत्री आहेत. आता तर वार

केलेला समोरच्याला समजतही नाही. जास्त काही बोलले तर आजचा दिवस शेवटचा ठरेल माझा. मी म्हणूनच हल्ली फार येत नाही बोलायला. एवढेच सांगते तुम्ही सावध रहा, सांभाळा खास करून मुलाना सांभाळा. ते पुढचे इनामदार ना?" उज्ज्वला एका दमात बोलली आणि निघून गेली.

मला वाटले तिला अजून बरेच काही सांगायचे होते. पण घाबरून आवरते घेतल्यासारखे वाटले. मुलांना सांभाळा हे मात्र मला फार काही सांगून गेले. मी विचारात पडले. काय करतील मुलांना? कुठे गाठतील?

काही दिवस गेले आणि माधव हटून बसला. व्यापार करायचाय त्याला भांडवल लागणार ते मागत होता. राघव त्याला समजावीत होता. अनुभव नाही, आपण बागा सांभाळल्या तरी भरपूर आहे. कशाला दगदग करतोस धंदा काढायची. पण माधव ऐकत नव्हता. कोल्हापूरला असताना कोणी वर्गातला मित्र तंबाखूचा व्यापारी होता. शिवाय त्याची तंबाखूची शेतीही होती.

माधवला गांवापेक्षा शहराची ओढ फार. म्हणून शहरात दुकान टाकायचा हट्ट धरला होता. नाहीतरी इनामदारीची अर्ध्याहून अधिक जमीन नव्या सरकारी कायद्या प्रमाणे कुळाना गेली होती. जी हाती होती त्यांत कामाला नोकर मिळायचे बंद झाले होते. माधव तर शेतीत लक्ष घालतच नव्हता. राघव कोणाला तरी पकडून थोडी फार शेती करे. पण बरीच शेती पडीक होत चालली होती. शेवटी राघवने पंचवीस हजार रूपये देऊन माधवची दुकान काढायची इच्छा पुरी कली. माधव आता दररोज आठ मैल सायकल चालवीत तालुक्याला जाऊ लागला. दुकान रात्री आठ वाजता बंद करून तो परत येईपर्यंत दहा तरी वाजत. मला मात्र तो रात्री घरी येईपर्यंत चैन नसे. भिती वाटे वाटेत कोणी डाव साधला तर? भाऊसाहेब बसलेतच वाईटावर.

पण व्हायचे वेगळेच होते.

दोन वर्षे झाली तरी माधवच्या दुकानाने काही जीव धरला नाही. मग सारखे राघवकडे तगादे लावू लागला. पैसे खूप जाऊ लागले. राघव मायेने सगळं करी. पण मलाच वाईट वाटे. त्यापेक्षा दुकान बंद करून माधवने राघव बरोबर रहावे असं वाटे.

आता माझ्या माहेरी पण दृष्ट लागली असावी. मोठा काका गेला. महिन्यात आई गेली. मी दोन्ही वेळा गेले. माय आली होती पण तिऱ्हाईतासारखी वागत होती. सगळे काही छोटी काकी शामच्या बायकोला समजावत होती. मग मला समजले. माझ्या बाबाने सगळयांशी भांडण सुरू केले होते. जंगल जमीन समाईकीत होती तरी त्याने कब्जा करून

दोघा भावाना काहीही उत्पन्न द्यायचे नाकारले. बाबा बंदूक घेऊन आला होता. सगळ्याना बंदूकीची धमकी द्यायचा.

मी मायकडे बोलायला गेले तर तिला कढ आला. म्हणाली “सगळे संबंध संपवले गो रुक्मे. असल्या प्रसंगात पण यायची लाज वाटते. आलं की गप्प कोपऱ्यात बसायचं. जीव तुटतो गो. तुला पण शिव्या घालतात. तू मुळीच येऊ नको. फुकटचे वाद नकोत, भाऊ गेला पण आलेत का बघ. घर मोडले गो यांनी.”

मला समजले माझे माहेर तुटले, संपले आता यायचे ते व्यवहारा पुरते.

महिना नाही झाला तो आई गेली. परत गेले. यावेळी मात्र माय हुंदकून हुंदकून रडली. तिची आईवरची भक्ती रडू आणीत होती. छोटी आणि मी तिची समजूत काढीत होतो. मग म्हणाली ते ऐकून थक्क झालो. ती रडत बडबडत होती “मी देवाला सांगतेय मला ने तर नाय ऐकत. चांगल्याना कुठे उचलतोय हा देव. मला उचल सुटेन तरी. करतील संसार त्या रांडेबरोबर.”

मला धक्का बसला बाबाचे हे काय नवीन. मग समजले. बाबाने कोणीतरी बाईशी संबंध जुळवले होते. ती नारळ सुपारीची बागवाली होती. मुलबाळ नव्हते. बाबाने तिला आपल्यात का गुतवले ते सहज समजले. तिच्या मागे तिची बाग घशात घालणार होता. बाबाची चीड मनात अजून वाढली.

घरी आले ती माहेर संपल्याच्या विचारातच. पण शामदादा आणि वहिनीने जवळ बसवून सांगीतले होते. “आम्ही आहोत. अंतर नाही देणार. कधी वाटले की येत जा.” पण मलाच लाज वाटली असती. माझा बाबा यांच्याशी असा वागला, कुठल्या तोंडाने जाऊ त्यांच्याकडे?

आता हळू हळू माणसांचा उबग येवू लागला. लहानपणी पाहिलेलं प्रेम, एकोपा, आदर सगळं हळू हळू कमी झालं होतं. जो तो स्वार्थाचाच विचार करत होता. प्रेमाने राहात होतो, सगळे एकत्र होतो तेव्हा केवढी मजा होती. आता सगळं विस्कटून गेलं होतं. मन आणखी वैराग्यात जात होतं.

रोजची कामे आता आंगवळणी पडल्या सारखी करीत होते. त्यांत जीव नव्हता. राघवचे लग्न पुढच्या वर्षी करायचा विचार मनात यायचा. आता आई नाही. छान मुलगी कोण शोधणार असे वाटायचे. कधी कधी अगदीच निराधार झाल्यासारखे वाटायचे.

आणि परत एकदा आमच्या घरावर आभाळ कोसळले. राघव काम करीत उशीरा पर्यंत माडीवरच बसला होता. आम्ही सगळे खालीच झोपलो होतो.

पहाटे पहाटे राघवची किंचाळी ऐकल्याचा भास मला झाला. माधवला उठवले. दोघे माडीवर गेलो. पहातो तर काय राघव काळा निळा होऊन पडला होता. श्वास जोरात चालला होता. श्वास घ्यायला त्याला फार जड जात होते. तोंडातून शब्दपण फुटत नव्हता. मी त्याला काय झाले विचारत होते. तो हाताने खूण करून काही सांगत होता. पुढच्या चारपांच मिनीटांत त्याचा श्वास आणखी जड झाला. आणि तो करीत असलेली खूण मला ध्यानात येऊ लागली. पण काही उपयोग नव्हता. पुढच्या क्षणी राघव गतप्राण होऊन पडला.

माधव धांवत खाली गेला पाणी आणि मितूला घेऊन वर आला. पाणी मारून राघवला जागं करायचा प्रयत्न करू लागला. त्याला काय माहीत आमचा हिरा हरवला होता कायमसाठी.

*****

अरुणा कुळकर्णी

## १८

### माधव-

राघवचा अचानक मृत्यु, आईची पहाटेच्या शांततेला चीरणारी किंचाळी माझे काळीज हलवून गेली. असा कसा प्रसंग आला? राघवदादा वर का झोपला? तो हात उभा डोलवून, नाकाकडे खूण करून काय सांगत होता? अचानक असं काय झालं की डॉक्टरकडे न्यायला पण वेळ मिळाला नाही.

आई रडत होती. तिच्या बरोबर मितु पण हुंदकत होती. मालीताई लांब दिल्लीला होती काय करू मी? अगदी भांबावून गेलो होतो. दोन नोकराना वैद्यबुवा व भटजीना बोलवायला पाठवले. वैद्यबुवा तपासून म्हणाले "विष प्रयोग आहे. कोणी चावल्याचे शरीरावर दिसत नाही. पण एकंदर लक्षणे सर्पदंशाचीच वाटतात. वडील असेच वारले हा ही तसाच गेला. काही तरी गोम आहे. काय ते शोधायला लागेल तुम्हाला."

मला राघवने केलेली खूण आठवली. हात डोलवून तो सापाचीच खूण करीत असावा पण मग नाकाकडे का हात दाखवत होता? सगळे शरीर तपासले तर कुठेही चावल्याची खूण दिसत नव्हती. मग विषबाधा कशी झाली? बाबाही असेच गेले होते. कोण करीत असेल हे सर्व? मी एकदम उठलो त्याच्या निष्प्राण देहाकडे गेलो. अगदी जवळून नाकाकडे पाहू लागलो. काहीच वेगळे वाटत नव्हते. हळू हळू हात नाकाकडे नेणार तेवढ्यात आई मागून आली. ती रडत होती. पण आपले दुःख आवरून माझ्यापर्यंत पोचली. माझ्या अगदी कानाजवळ म्हणाली "गेलाय रे तो. कसा ते समजलेय मला. तू बाजूला हो. यात पडू नकोस."

मी मागे परतलो पण कित्येक प्रश्न मनात उभे झाले. आईला काय माहीत पडलेय? कोणी केलेय हे सगळे. मी बाहेरच असतो दिवसभर. काल कोणाबरोबर भांडण तर झाले नाही ना?

आता लोक जमायला लागलेत. मालीताईला तार पाठवली आहे. पण तिच्यासाठी थांबणे शक्य नाही. तिला पोचायलाच तीन दिवस लागतील. शाममामा आला, मग त्यानेच सगळे पहायला सुरवात केली. गुरूमामा, आजोबा, मायआजी कोणीच आले नव्हते. तासाभराने आम्ही निघालो. मलाच पुढचे विधी करायचे होते. भडभडून येत होते.

सर्व आटपून घरी आलो तर आई एका कोपऱ्यात शून्यांत नजर लावून बसली होती. शाममामा तिच्या जवळ गेला. म्हणाला “रुक्मे, दोघेही असे कसे गेले? काय आहे माडीवर पहायला लागेल.”

“काही मिळणार नाही. गारुड्याचा साप आहे तो. दोघानाही मारलेत गारुड्याने.” आई बडबडू लागली. मला भrती वाटली. आईवर परीणाम नाहीना झाला? कसला गारूडी, कोण गारूडी? मामाने पण तेच विचारले “गारूडी? कोण गारुडी? काय बोलतेस तू हे? काय ते सरळ सांग. कोण असेल त्याला पुरा धडा शिकवतो.”

“तुम्ही काहीच करू शकणार नाही. ऐकलेत तर मलाच वेड्यात काढाल. ही लढाई आता वेगळ्याच तऱ्हेने लढायची आहे, मलाच लढावी लागणार.” आई पुन्हा बडबडली.

आता मात्र मामा गप्प राहिला. जास्त बोलले तर आईची बडबड वाढेल म्हणाला. थोडे दिवस गेले की पाहू म्हणाला. मग मला घेऊन माडीवर गेला. सगळे बारकाईने तपासू लागला. पण काहीच सापडले नाही.

मला म्हणाला “कोणी आले होते का रे काल? रात्री कोणी गपचुप शिरले नाहीना घरात?”

सगळे दरवाजे बंद होते, दादा काम करीत बसला होता वर. आम्ही खाली झोपलो होतो. पहाटे किंचाळी ऐकू आली म्हणून मी व आई वर आलो तर दादा बोलू शकत नव्हता असा झाला होता. दहा मिनीटात खेळ संपला रे. फक्त हात डोलवत नाकाकडे घेऊन काहीतरी खुणेने सांगायचा प्रयत्न करीत होता. मामा विचारात पडला. मग पाण्याची बाटली, ग्लास, सगळ्याचा वास घेत सुटला. तो काय शोधत होता देव जाणे.

मग दोघेही खाली आलो तर आई एकदम म्हणाली, “काही सापडणार नाही रे शामदादा. मोठा हुशार गारुडी आहे तो.”

मामाने विचारले “रुक्मे, मग सांग ना कोण कुठला गारुडी तो. देऊया पोलीसांकडे.”

“हो! आणि पुरावा काय देणार? हे फार सोपं नाही. आता मात्र माधवला जपायला हवे.” आई.

मी बुचकळ्यात पडलो. काय बोलतात ते समजत नव्हते. कोण गारुडी? कधी आलेला दिसला नाही तो? मग गप्प बसलो. आता राघवदादाचे विचार येत होते.

राघवदादाचे दिवस कार्य झाले व मला आईने दुकान बंद करायला सांगीतले. सात वाजल्या नंतर घरीच रहा म्हणाली. बहुदा आईला आता माझीच चिंता लागली होती. मी पण मनात म्हटले, आता बागांचे व्यवहार, हिशोब सगळे मलाच तर बघायचे, मग दुकानासाठी वेळ कुठून मिळणार?

दिवसकार्या अगोदर मालीताई आली होती. या मालीताईचे मला फार आश्चर्य वाटायचे. विशेष बोलायची नाही. नेहमी टर्ऱ्यांतच रहायची. आताही आली ती गप्प आई बरोबर बसली. डोळ्यातून टिपूस आला नव्हता. मग दुसऱ्या दिवशी एकदम मधेच म्हणाली "इनामदारां सारखे वागत नाहीत तुम्ही. कोणी डोळे मोठे करून पाहिले तर फोडायची हिम्मत बाळगा. जीवावर उठला तर त्यालाच संपवा. तुम्हाला तर कोण करतंय तेही माहीत पडत नाही."

आई आणि मी पहातच बसलो. कार्य आटपल्यावर म्हणाली "मी निघते उद्याच. मुलांना ठेऊन आलेय. शाळा चालू आहेत त्यांच्या. ह्यांना अजिबात वेळ नसतो. सेक्रेटरी झालेत रेव्हेन्यु खात्यांत. तुमची जमिनीची काही कामं नडली तर कळवा. चुटकी सरशी करतील."

आईने फक्त मान हलवली.

परत एक मोठेपणा मिरवायची नवीन लकब तिने उचललेली दिसली. कुठेच आपलेपणाचा ओलावा, मायेची फुंकर, जिव्हाळा काहीच जाणवलं नाही. नाहीतर मितू. बाबा गेले तेव्हा व आता दादा गेला तेव्हा रडून रडून डोळे सुजवून घेतले होते. दोन दिवस ताप येत होता. इतर वेळी गडगडाट हसणारी, सगळयां बरोबर खेळणारी, कामवाल्या बायकांबरोबर पण दंगा करणारी मितू एक टोक तर मोठी मालीताई दुसरे टोक वाटे.

आईचा चेहेरा निग्रही होत चालला होता. रात्री झोपत नव्हती. एक दिवशी माडीवरचे सगळे सामान तपाशीत बसली होती. काय शोधत होती देव जाणे. मग बंदूक घेऊन खाली आली. मला म्हणाली "गंज लागतोय याला. थोडे तेल पाणी करता येईल का रे तुला? आणि याचे परमिट पण तुझ्या नावावर करून ये. आणि याची दहा एक काडतुसे पण आण रे. कधी तरी वापरली तर चांगली राहील."

मी होकार भरला. ती आता एक एक सगळा व्यवहार पाहू लागली. मला बरे वाटले. अगदी तरूण मुलाच्या मरणाचे दुःख ही कशी पचवेल याचीच मला काळजी होती. पण

ती लवकरच सांवरलेली दिसली. फरक एकच होता. पूर्वी कधीच न पाहिलेली एक करारीपणाची रेषा तिच्या चेहेऱ्यावर कायम दिसू लागली होती.

आठ पंधरा दिवस गेले तिने सांगीतलेली सगळी कामे मी केली. बागांतही जाऊ लागलो. बंदूक नावावर करून आलो. पन्नास काडतुसांचा खोकाच घेऊन आलो. बंदूक घेऊन रानात बार काढून आलो. बंदूक माडीवर भिंतीला लटकवली व खाली आलो.

आता आई रात्री जागीच असायची. घरभर येरझाऱ्या घाली. विचारले तर म्हणे "आता मी धोका नाय खाणार. रात्री, ऐन पहाटे मारेकरी येतो त्याला पकडणार मी."

आठ एक दिवस गेले असतील. पहाटेला बंदूकीचे एका मागोमाग दोन बार ऐकून मी धडपडत उठलो व मधल्या चौकाकडे धाव घेतली. त्याच वेळी शेजारच्या काकांच्या घरात गडबड उडाली. त्या काकीने जोरांत ओरड मारली होती.

आई बंदूक बाजूला टाकून भिंतीला टेकून बसली होती. एवढेच म्हणाली "दोघानाही संपवले. गारुडी आणि त्याचा साप दोन्ही संपले बरोबर भाऊबंदकी पण."

मी भांबावून गेलो होतो. एवढ्यात शेजारच्या काकी धांवत आल्या. म्हणाल्या "वैनीताई सगळेच सुटलो. पण तुम्ही पकडले जाल. मला दोन काडतुसे द्या. मी करते पुढचे काय ते. आमच्याकडे आहे बंदूक." आईने बसली होती तिथूनच मागून खोका काढला. काकी दोन काडतुसे घेऊन गेल्या. मला काहीच पत्ता लागत नव्हता. या दोन बाया बंदुकी उडवून कसली दिवाळी करतायत.

अंमळशाने परत दोन बार ऐकू आले पण ते काकांच्या घराच्या मागच्या बाजूला झाले होते. परत त्यांच्या घरात काहीतरी हालचाल दिसत होती. आई अजूनही स्तब्ध बसली होती. निर्विकार चेहेरा करून बसली होती.

सकाळ होत आली आणि एक एक गोष्ट हळू हळू समजू लागली. मधल्या चौकात एक आठ नउ फूटाचा पिवळा धम्मक नाग मरून पडला होता. काकांच्या घरी बरीच मंडळी आलेली समोरच्या खिडकीतून दिसत होती. त्यांनी मग काकाना उचलताना मी पाहिले आणि सर्व लक्षात आले. काका गारुडी व तो साप दोघानाही आईने मारले होते. माझे पाय आता लटपटू लागले. डोळयां समोर निरनिराळी चित्रे उभी राहू लागली. पोलीस, तुरुंग, कोर्ट सगळे डोळया समोर आले. आईला पकडायला केव्हाही पोलीस येणार असेच वाटू लागले. मी बंदूक व काडतूसांचा खोका उचलला. व माडीवर नेऊन जागच्या जागी ठेवले.

आईला म्हणालो "चल सकाळ झालीय. चहा करून देतो तुला. बरे वाटेल."

आईने हसून पाहिले. व काही न बोलता निघाली. मितू केव्हाची जागी होऊन सारे काही पहात होती. ती स्वयंपाक घराकडे पळाली चहा करायला घेतला.

आता जेवण करणाऱ्या बाई, नोकर सगळे काकांच्या घरापर्यंत जा ये करू लागले. न विचारताही एकएक माहिती आम्हाला मिळत होती. दहा वाजता पोलीस पाटील पोलीसांना घेऊन आलेला समजला आणि माझा थरकांप झाला. कोणत्याही क्षणी आता आईला पकडायला पोलीस येतील असे वाटू लागले. मी अस्वस्थ होत येरझाऱ्या घालीत होतो.

एवढ्यात एक नोकर सांगत आला "त्यांनीच पाळलेला साप उलटला त्यांच्यावर. त्याला गोळी घातली भाऊसाहेबानी पण चवताळलेला तो परत अंगावर धावला. भाऊसाहेब धडपडले. बंदुकीतून गोळी सुटली नी त्यांनाच लागली. पोलीसानी बंदूक रिकामी काडतुसं सगळे ताब्यात घेतलं. वैनीताईनीच सगळं बगीतलं होतं ते त्यांनी सांगीतलं. मेलेला साप पण तिथेच होता."

मी ऐकतच राहिलो. काकींनी अशी कशी जबानी दिली. तिने आईला वाचवले? त्यांचा व आमचा कायम उभा दावा. मग असं कसं. आई आणि त्यांची मैत्री होती? पण एवढी कशी असेल? त्यांच्या नवऱ्याला आईने मारले होते. तरी ते त्यांनी दडवले? का? डोक्यात हजारो प्रश्न थैमान घालीत होते. आईकडे नजर गेली. तिच्यात काहीच फरक पडला नव्हता.

दोन दिवस गेले. आई बोलतच नव्हती सगळी कामे पहाणे पण सोडून दिले होते. विचारात होती की खंत करीत होती समजत नव्हते. चेहेरा निर्विकार होता.

चार दिवस झाले. आईत जराही फरक पडत नव्हता. मग मीच मनाचा हिय्या करून विचारले "आई, त्या काकींनी असं कसं सांगीतले गे?"

"प्रारब्ध!" एवढेच बोलून ती गप्प झाली. मी मात्र सगळे जाणायला अधिक उतावळा झालो. कसे समजेल नक्की काय आहे ते.

चार पांच दिवसानी एक भागेली आला. मांडवकर नाव सांगून आईला भेटायचे म्हणाला. आईशी बोलताना अगदीच घाबरला होता

"आम्ही पापी! भाऊसाहेब इनामदार गेले. त्या वैनी म्हणतात पोर टोर नाही. आता इनामदार फक्त तुमचा मुलगा. आमचे अपराध पोटात घाला. बाग काढून घेऊ नकात. सगळे मरू." मग ढसाढसा रडू लागला.

“तुझे प्रारब्ध.” आईची नजर वर छता कडे होती. बोलण्यांत एक वेगळीच छटा होती? म्हातारा मांडवकरने आता जमिनीवर लोळण घेतली होती. आईच्या पाया पडून गयावया करीत म्हणाला “सगळी पापे उघडी झालीत. आम्ही पापी. पण आता शपत घेतो. आजपासून सरळ वागेन. कधी वाकडा वागलो तर आम्हाला पण भाऊसाहेबां सारखेच वर पाठवा.” हे ऐकताच मला धस् झाले. याला काय माहीत? अजून धोका टळला नाहीतर. हे बाहेर समजले तर परत पोलीस येतील.

आई काहीच बोलली नाही. तिच्यावर कोणताच परीणाम झाला नव्हता.

मी मग बोललोच “काय हो काय बडबडताय तुम्ही? काय म्हणायचे तुम्हाला?”

तो बोलला ते मात्र डोके फिरवून टाकणारे होते. तो सांगत होता “माझ्याकडे बोलले होते भाऊसाहेब इनामदार. गेले त्याच्या अगोदर संध्याकाळी आले होते. सांगत होते. आज मोठा घाव घालणार. बाईलाच संपवणार. पण सारखे वाटत होते त्यांना. घाव उलटणार तर नाही? बाई हुशार आहे. देवाने शक्ती दिलीय तुमच्या आईला म्हणाले. जिंकले तर तेच इनामदार होतील. नाहीतर तो दिवस त्यांचा शेवटचा. खराच शेवटचा ठरला हो. बाई देवी आहेत पटलं आमाला. घरात झोपल्या असताना पण डाव उलटवला.”

माझा जीव भांड्यात पडला. म्हणजे याला खरे काय ते माहीत नव्हते. तरी आईच्या चेहेऱ्यावरची सुरकुतीही हलली नाही. ती आपल्याच विचारात असल्यासारखी राही. मी तर तिला बोलताना एकदा ऐकले तेवढेच. ती मौनातच होती. आता मला भिती  वाटत होती. एवढे दिवस झाले ही काहीच बोलत नाही, डोक्यावर परीणाम तर झाला नाही ना?

उज्ज्वलाकाकी तिच्या भावाला घेऊन आल्या. भाऊ सांगत होता “इनामदारीणताई माझी बहिण सुटली कायमची. ही इनामदारी नकोय तिला. ती म्हणते सर्व तुम्हालाच द्यावं. नाहीतरी तिचं खाणारं कोणीच नाही. ती आमच्याकडेच येवून राहायचं म्हणते. ह्या शापीत इस्टेटीचा संपर्क सुद्धा नको म्हणतेय. मला समजलेय, ते तुम्हालाच मारायला निघाले होते. पण स्वतःच गेले. स्वतःच्याच हातांनी. कसला अपघात! देव तारतो हो सगळ्याना.”

इथे आईने मान उचलून काकीकडे पाहिले. काकीनी मान खाली घातली. त्यांचा भाऊ पुढे बोलतच होता “तुमच्या आबासाहेबांचा व मोठ्या मुलाचा घात त्यांनीच केला हे देखील तिला माहीत आहे. ती म्हणते अशी जीव घेणारी इस्टेट नकोच. मग करू का तसे कागद पत्र? नाहीतरी आज ना उद्या ती तुमच्याचकडे येणार. मग आत्ताच केलेली काय वाईट.”

आईने मान वर करून म्हटले “उज्ज्वला, मी काही इस्टेटी साठी नाही मारले त्यांना मी माझे कुटुंब वाचवत होते. मी कधीच इस्टेटीवर नजर ठेवली नाही. आमच्याही इस्टेटीचा लोभ मला नाही. तुम्ही कोणालाही द्या, दान करा नाहीतर त्यावर पाणी सोडून तसेच जा. मी किंवा माझी मुलं कोणीही ती मिळाली तरी घेणार नाहीत. पाहीजे तर आमचीही इनामदारी दान करा नाहीतरी ती तुमचीच आहे. आमचे लोक त्यावर नागासारखे बसले होते. ”

“वैनीताई, तुम्ही मला वाचवलेत. मी का असा विचार करेन. पण दुसऱ्या कुणाच्या हाती गेली तर परत तुम्हाला त्रास. म्हणून हा मार्ग शोधला मी.” काकी बोलत होत्या.

“तू मला वाचवायच्या फंदात पडलीसच कशाला? मी माझ्या कर्माची फळं भोगायला तयार होते. इनामदारीच जर तुमची, तर मी खूनच केलाय ना?” आई बोलली आणि काकींचा भाऊ काकींकडे चमकून बघू लागला. मग मात्र काकी लगबगीने उठल्या. भावाला म्हणाल्या चल. व ते निघून गेले. मी आई कडे पहातच बसलो. तिच्या डोळ्यात विचित्र भाव होते. ती असंबद्ध बडबडतेय असे हळू हळू मला वाटू लागले.

आई जवळ बसून मी एवढेच म्हणालो “आई तू आम्हाला हवी आहेस. देवाची इच्छा समज तू सुटलीस. परत कोणाकडे असे बोलू नकोस.”

आई मंद हसली आणि परत आपल्या मौनात गेली.

*****

## १९

### रुक्मिणी-

आई आज तुझी फार आठवण येतेय. तू माझे सर्वस्व होतीस. माया करणे तुझ्याकडून शिकले. शिस्त तू लावलीस. विचारांची ठेवण तुझ्याकडून आली. तारतम्य वापरणे तुझ्याकडून शिकले. कुटुंबाची माया करायला तू शिकवलीस. व्यवहारिक वागणे तुझ्या कडून आले. कुणालाही बोलून दुखवू नये, हे वळण तूच लावलेस. गोड बोलणे हा तर तुझा स्वभाव माझ्यात उतरवलास.

तू माझी जन्मदाती नव्हतीस तरी मला मायेने घडवलेस. तू तर माझी गुरू, माता, देव, माझं सर्वस्वच होतीस. मी तुझे संस्कार जसेच्या तसे पाळत होते. पूर्ण श्रद्धा होती ग तुझ्यावर. मग माझ्या हातून हा गुन्हा कसा घडला? सर्व घडून गेले आणि आठवलीस ती तू. तुझा उपदेश "तुला जे परत देता येणार नाही ते दुसऱ्यापासून हिरावून घेवू नये. असे केले तर ती डाच आयुष्यभर सहन करावी लागते. आणि त्यालाच नरक यातनेचे रूप येते. जीव खाऊन टाकते गो ती डाच." किती खरे आहे हे. मी स्वतःला कशी माफ करू? मी जीव घेतलाय गे, कसा परत करणार? कुणाचा जीव परत करता येणार नाही हे त्यावेळी भानात नव्हते म्हणून समजलेच नाही गे. आज वाटतेय तुझ्या कुशीत शिरावे. भरपूर रडावे. पण तूच नाहीस. कुठे जाऊ?

घाबरले होते की अतोनात राग आला होता मलाच माहीत नाही. हे गेले, राघव गेला आता माधवलाही तसेच झाले तर? या एकाच विचाराने पछाडले होते ग. रात्री केव्हाही घाला घालतील म्हणून झोपतच नव्हते. विश्वासच बसत नव्हता, कोणी सापाना एवढे कसे तयार करू शकेल? मनाला पटत नव्हते पण पडताळा तर आला होता. मी दोघांना मुकले होते. आता माधवला जर काही झाले तर? हे मी होऊ देणार नाही हाच विचार करीत बसे.

उज्ज्वला म्हणते, “तुम्ही दोषी नाहीत. तुम्ही फक्त कारण झालात. दुष्ट माणसाला शिक्षा करण्यात पाप कसले? त्यांनी तुमच्या घरातील दोघाना मारले. अगदी योजून मारले. मग तुम्ही दोषी कशा? श्रीकृष्णाने सांगीतले आहे आपल्या धर्मात. तुम्ही धर्म पाळलात.”

ती असा धर्माचा आधार देते. केव्हा मन मानते पण दुसऱ्या क्षणी तू आठवतेस. जे पश्चातापानंतर परत करता येत नसेल ते कुणा कडून हिरावू नये, हे तुझे बोल आठवतात. कसा परत करणार मी त्यांचा जीव? मी केले ते बरोबर की चूक हेच समजत नाही. तू असतीस तर विचारले असते.

उज्ज्वलाला मी मदत केली ती कर्तव्य म्हणून. तिची सहानुभूती मिळवायसाठी कधीच नव्हती. तिचा संसार काही सरळ चालला नव्हता. मी तिला मदत केली ती भाऊबंदकी कमी करायला. पण ती कधीच कमी झाली नाही. कधीतरी वाटते, मी तर विष पेरले नाही ना त्या दोघात? भाऊबंदकीने आंधळ्या झालेल्या भाऊसाहेबाना माझे तिचे सख्य रुचलेच नसेल. त्यामुळेही त्यांचे वाद वाढले असतील. पण मी तर सगळे चांगल्या मनाने केले गे, मग चुकली कुठे? आई हे तुझ्या शिवाय कोण सांगेल मला?

कितीक गोष्टी केल्या मी. माहेरची तुझी माया विसरून इनामदारांचे घर सांभाळत बसले. सगळी घडी नीट बसवली. काय काय पहावे लागले. भागेली मान देत. नोकर शब्द पडू देत नसत. काम करणाऱ्या बाया जीवाभावाच्या झाल्या. “सगळीच माणसे गो आपण, मायेची भुकेली असतो. माया लावली की सगळी कामे आपसूक होतात. हाताखालच्यांना पोटभर अन्न व खूप माया लावायची गो.” म्हणायचीस तू. तेच केले मी. मग मला का हे नशीबी आले? का ससाराला दृष्ट लागली माझ्या? “भले राहलो तर आपलेही भलेच करतो देव.” म्हणयचीस तू. मी तर माझे वाईट करतात म्हणून जीव घेतला गे भाऊसाहेबांचा. त्याची शिक्षा अगोदरच का दिली देवाने? का माज्या संसारावर अगोदरच घाला घातला?

आजोबा म्हणायचे “इनामदारांच्या फुफाट्यांत कशाला लोटताय रुक्मेला”. तेव्हा काय समजलं नव्हतं. तूही नाराज होतीस बाबावर, इनामदार शोधलान म्हणून. पण खरं सांगू कामाचं हाड गे माझं. इनामदारकी सांभाळताना नाही थकले. थकले ती आता, कुणाचा तरी जीव घेतलाय गे मी. मी माझ्याशीच अबोला धरायला बघतेय. बोलायचीच बंद झालेय. पण स्वतःशी अबोला म्हणजे विचार सुद्धा येता नयेत. त्यांच्या तर लाटावर लाटा कोसळतायत मनात.

इनामदार सगळेच असे कसे. गडगंज संपत्तीमुळे तर निकामी नाही ना झाले? आमचे तर माडीवरच बसत. काय चाले दिवसभर देव जाणे. कामाशिवाय वेळ कसा जाई. मी पहिल्यांदाच समजले. मलाच भार उचलायचाय. सगळे सांभाळले. पण मनात खंत राहायची. इनामदार असले तर काय झाले, स्वतःची मालकी जपायला नको त्यांनी? इनामदार पूर्वी वेळ आली तर लढत म्हणे. फक्त ऐकायची गे एक एक आख्याईका. पण तसला गुण कधी दिसलाच नाही. एकाही भागेल्याला कधी जाण देण्याचे साधे वाक्य यांच्या तोंडातून बाहेर पडलेले ऐकले नाही. ऐकले असते तर समाधान पावले असते गे. गुरूचे हिशोबही धड बघितले नाहीत. त्याला दोष काय द्यायचा? चरायला कुरण सांपडले की कोणीही चरणार. आपण अंकुश नको ठेवायला. ते काम पण नाही केले. केली ती व्यसने. मेहेनतीनी सोडवावी लागली मलाच. जीव मुठीत धरून जगले त्या दिवसात. तेव्हा लक्षात आले, इनामदारांचा फुफाटा म्हणजे काय ते.

सगळ्याना फुकाचे अभिमान. कसले अभिमान जोपासले देव जाणे. इनामदारी वारसाने नाहीतर दत्तक पत्राने मिळालेली. त्यांत कर्तुत्व काय? अभिमान बाळगायला थोडेतरी काही दाखवावे यानी. एकाने इनामदारी दत्तकात मिळाली ती मोडकी तोडकी सांभाळली. दुसऱ्याने भयानक भाऊबंदकी जोपासली. होरपळायला झाले मला.

सगळेच इनामदार, आधीचे काय की नंतरचे काय, बाहेर उद्योग करून ठेवायचेच. मी गांवात वसुलीला जायची, सगळे ओळखायचे म्हणून आमचे धड राहिले असतील. किंवा माझी भिती वाटली असेल. पण घराण्यां बाई ठेवायची प्रथा मानाची वाटे या इनामदारांना. कर्तव्यातून पुरुषार्थ दाखवायच्या ऐवजी शिंदळकीतून दाखवायला आवडायचे यांना. मला त्याचीही भिती पोटात असे. तुझ्या सांगण्याप्रमाणे मी त्यांना पुरी पडत होते. पण तू समजवलेला संबंध नाही गे अनुभवला कधी.

आजही आठवते ती रात्र जेव्हा तू मला घेऊन झोपली होतीस लग्नाचा अर्थ समजावत होतीस. त्याची पवित्रता, नाजुकता, प्रेमाचा ओघ. सगळं ऐकताना किती समधान वाटत होते. मला वाटले होते लग्नानंतर परिकथेच्या जगातच जाणार गे मी. पण अनुभवली ती फकत क्रिया. हपापलेली, आसुसलेली, स्वार्थी. ह्या फुफाट्यातून गेलेय मी. इनामदारीण म्हणून मोठेपणा सगळ्यानी दिला. पण मी मात्र भिकारीच होते. चार मुले झालीत म्हणजे रुक्मी सुखाने न्हातेय असे सगळ्यांनाच वाटायचे गे. पण माझे मलाच माहीत, मी किती मनःस्तापातून जात होते ते.

आई, तू माझी गुरू होतीस. सासरचे माहेरला काही बोलायचे ही तुझी शिकवण. कसे बोलणार हे नाजुक दुःख? तुझ्या शिवाय कोण होते मला हे विचारायला? ह्या आगीत कायम होरपळले पण दुःख कधीच कोणाला दाखवले नाही. तुझी तशीच शिकवण. काय माहीत, तू देखील असे काही सहन करीतच दिवस काढले असशील. मी हे सगळे तुला विचारणार आहे. माझ्या अंता नंतर भेटूच ना आपण? तूच म्हणायचीस “रुक्मे प्रेमाचे बंध जन्मोजन्मीचे असतात. फक्त नवराच नाही मिळत जन्मोजन्मी. खरी माया आपणालाही आणेल एकत्र.” मी मग विचारीनच तुला भेटलीस की. मी तुझ्यावर जेवढी भक्ती केली तेवढी कुणावरच केली नाही गे.

देवावर भक्ती करायला शिकवलीस, पण मागायचे काहीच नाही म्हणालीस. देव जन्म व मरणा शिवाय काहीच देत नाही. आपण आपल्या वागण्याने सर्व मिळवायचे सांगीतलेस. मी काय मिळवले? इनामदारकी? खुनी इनामदारकी? कुणालाच माहीत नाही मी भाऊसाहेब इनामदाराना मारले. माहीत ते फक्त आम्हा तिघांना. मी, माधव व उज्ज्वला. ते दोघे कधीच बोलणार नाहीत पण मी कोणी विचारले तर मौन मोडून पण सांगेन मी गोळी घतली म्हणून. मी केलेय तर मला मान्य नको करायला? माझ्या कुटुंबावर हल्ला करणाऱ्या माणसाला प्रेम द्यायचा प्रयत्न केला. भाऊबंदकी मिटवायचा प्रयत्न केला. पण तो नेहमी वैरातच वागला. यांचा व माझ्या राघवचा बळी घेतला त्याने. मला उज्ज्वला सांगे. गारुडी झालेत भाऊसाहेब. दोन साप तयार केलेत. ते त्यांचे ऐकतात. कसे करतात ते माहीत नाही. पण दोन कुत्र्यांवर सोडला एकाला. त्याने एकाच्या नाकावर जोरात फुंकले व परत सरसरत येवून आपल्या पिंजऱ्यात शिरला. कुत्रा तिथल्या तिथे मेला. दुसऱ्या कुत्र्याकडे त्याने पाहिले पण नाही. भाऊसाहेब सांगतील त्यालाच तो फुंकायचा. माझा असल्या भाकड कथांवर विश्वास नव्हता. मला वाटायचे या उडवलेल्या कथा आम्हाला घाबरवायला आहेत. पण यांचा मृत्यु सरळ वाटला नाही. विषप्रयोग झाला असं वैद्यबुवा म्हणाले. पण घरात आम्ही दोघेच होतो. मला पोलीसांचा ससेमीरा नको म्हणून सगळे आटोपते घेतले.

आरोप केला असता तरी काहीच सिद्ध झाले नसते. आज पहिल्यांदा मला समजत होते ही लढाई फार अवघड आणि भयानक आहे. कोणावर पुढची पाळी येणार हे लक्ष देऊन पाहावे लागणार. पण हे समजणे अवघड होते. सापाला बरोबर माणूस हुडकता कसा येईल? सगळेच अगम्य होते. मला संशय होता. ते माझा जीव घेतील व माझ्या मुलाना

त्रास देणे सुरू करतील. किंवा मुलांच्या मागे लागतील. आई! मी फार संभ्रमांत पडले होते. कसे सावरू? कसे वाचवू माझे कुटुंब?

एक वाटे ही इनामदारीच त्यांना देवून टाकावी. मला कुठे मोह होता. पण तशी त्यांनी ती घेतलीच नसती. मागे तोच अनुभव आला होता. त्यांना ती आम्हाला संपवून मिळवायची होती. सांगत फिरत, मीच खरा इनामदार आहे म्हणून. मलाही कित्येक वेळी पटे. यांनी तर आयुष्य माडीवरच घालवले. आळशी, ऐदी पणा शिवाय काहीच केले नाही. इस्टेट सांभाळणेही नाही. आई! तू म्हणाली होतीस पती म्हणजे सर्वस्व. मोठे काका, तुझे पती केवढे करायचे कुटुंबासाठी. सगळेच मान देत त्यांना. तुलाही ते समाधान होते. इथे तर सर्व माझ्याच माथी. तरी सर्व सांभाळले. आनंदाने, सर्वांना खूष करीत सांभाळले. भाऊबंदकी संपवण्याचा अटोकाट प्रयत्न केला. पण संपवली ती अशी. शेवटच्या इनामदाराला संपवून. हो खरे तर तेच शेवटचे इनामदार. आमच्याशी पुरे वैर. पण ते देखील त्यांनी इनामदारासारखे जागते ठेवले. यांनी सामोपचाराची भाषा करीत आपले दुबळेपण लपवले. अन्याय होत होता तर तापून उठायला पहीजे होते, खऱ्या खुऱ्या इनामदारा सारखे. मालिनी म्हणायची ते पटले. इनामदारांसारखे वागा म्हणायची. हे तर स्वतःचा जीव पण वाचवू शकले नाहीत. मग अशा योगायोगाने झालेल्या इनामदारांची बायको म्हणून मी इनामदारीण कशी? फक्त गोळी घालून जीव घेतला म्हणून?

महाभारत परत परत घडतच असते का ग? माझाही राघव गेला. का? काय मिळवले इनामदारीण बनून? आता माधवचा नंबर हे निश्चित होते. मला इनामदारकी नसली तरी चालली असती. पण माधव गेलेला चालला नसता. रात्रीची झोपच उडाली होती. बंदूक घेऊन सतत पहारा करीत बसत होते. एका रात्री भाऊसाहेब मधल्या चौकाच्या खिडकीत उभे असलेले दिसले. थोड्याच वेळात एक साप त्याच खिडकीतून बाहेर येवून आमच्या दिशेने येवू लागला. त्याचा रोख माझ्या दिशेने होता. बंदूक हातातच होती. उचलून नेम लावताना झटकन विचार आला "सापाला कशाला? मालकालाच पहिले संपवले पाहिजे. तोच मूळ कारण आहे." विचार आला न आला तोच बंदूक वर झाली. आणि गोळी सुटली. एक किंचाळी मारत भाऊसाहेब कोसळताना दिसले. साप आवाज ऐकून घाबरला असावा. तो मागे फिरला खिडकीपर्यंत पोचला. तोच परत बंदुकीचा नेम धरला गेला. दुसऱ्या आवाजाबरोबरच साप लोळा गोळा होऊन खिडकी खालीच पडला. मी दगडा सारखी होऊन गेले होते.

उज्ज्वला आली. दोन काडतुसे घेऊन गेली. का, कशाला काहीच विचार आला नाही. स्तब्ध बसून होते. कोणी विचारले असते तर कबूल करायचे ठरवलेच होते. पण काहीच कोणी विचारले नाही. माधव बोलत होता. ऐकलेले पोचतच नव्हते. दोन दिवसानी हळू हळू समजले. उज्ज्वलाने त्याला अपघाताचे रूप देऊन मला वाचवले होते. तिच्या नवऱ्याला मी मारले तरी तिने मला वाचवले? आई तू म्हणायचीस पती म्हणजे परमेश्वर समजायचा. इनामदारांकडे दोनही बाजूला पतीला परमेश्वरासमान मानताना आम्ही दोघेही दिसत नव्हतो. का? आम्ही दोघेही पापी आहोत का ग? उज्ज्वलाला मारातून वाचवल्याची एवढी मोठी परतफेड? मी बोलायचेच सोडून दिलेय. मला माझाच राग आलाय. माझंच वर्तन मला नाही आवडलंय. मी माझ्याशीच बोलणं बंद करायला बघतेय. पण हे विचार कसे बंद करू? विचार करणं म्हणजे स्वतःशीच बोलणं. कसं थांबवू?

इनामदार संपले. मी संपवले. आता मी इनामदारीण नाही. तरी बाया येतात तसाच मान देतात. भागेली येतात तेही ताईसाहेब इनामदारीण म्हणतात. आई, कसली मी इनामदारीण.

वाटतंय तुझ्या कुशीत शिरून झोपावं अगदी तसंच, जशी तिसऱ्या रात्री तू झोपली होतीस. मला मुलांना संस्कार कसे करावेत शिकवीत होतीस. खूप काही श्लोक म्हणून दाखवत होतीस. केसातून हात फिरवत मायेने भिजवत होतीस. पण अपुरे काय पडले? मी असा कसा जीव घेतला कुणाचा?

आई, मी तुझ्या सांगण्या विरूद्ध वागले. मनाच्या आहारी गेले. नाही आवरू शकले स्वतःला. म्हणूनच तुझ्याकडे यायचे आहे. तुझी क्षमा मागायची आहे. तुझ्या कुशीत शिरायचे आहे. पण कशी येऊ तुझ्याकडे?

आपल्याला काही पटले नाही, कुणाचे काही रुचले नाही, तर वाद घालू नये. अबोला धरावा. मी माझ्या बरोबरच कसा अबोला धरू? बोलणे सोडलेच आहे. पण ते इतर सर्वांबरोबर. माझ्याबरोबरच अबोला कसा धरता येईल? हे विचार तर एका मागोमाग एक येतच रहातात. त्यांना कसे बंद करायचे हे नाही शिकवलेस. मन सैरभैर होतेय. तुझ्या कुशीत शिरावेसे वाटतेय.

दिवस जात चाललेत. माधवने खूप भुणभुण लावली आहे. त्याला शहराचा शौक फार. दुकान परत चालू करतो म्हणतोय. मग भागेल्यांचं कोण बघणार? हसणारी खेळणारी मितू आता गप्पच असते. सगळ्या प्रसंगांनी तिला फार घाबरवून सोडलेय वाटते.

वडीलांचा मृत्यु. पाठोपाठ राघवदादाचा मृत्यु तोही तसाच. तिचा हसता खळखळाट बंदच झाला. इनामदारीचा हा फटका फार दुःख देतो गे. मितु माझ्या सारखीच निर्मळ होती. ती कोमेजताना पहावत नाही.

तिच्या लग्नासाठी जीव ओढाळतो गे मागे. म्हणून अबोल तर अबोल जगायला लागतेय गे. दुसरे मन तुझ्याकडे धावते.

जगले तर हे दुःख घेऊनच जगावे लागणार. एक मुखवटा पांघरलेली.

"इनामदारीण."

*****

अरुणा कुळकर्णी

Back page

# इनामदारीण

**श्री .अरुण गणेश कुलकर्णी** यांचा जन्म कणकवलीचा ,कोकणातला मूळ गाव दिगवळे .प्राथमिक व माध्यमिक शिक्षण कणकवली येथेच झाले .नंतर कॉलेज शिक्षण राजाराम कॉलेज कोल्हापूर ,इंजिनियरिंग-वॉलचंद कॉलेज सांगली व नंतर एस्.पी.कॉलेज मुंबई येथे झाले.

पाच वर्षे मुंबईत नोकरी केल्यावर स्वतःचे काहीतरी करावे या ओढीने कारखाना काढायचे ठरविले .१९७३ला गुजरात सरकारने घोषीत केलेल्या टेक्निशियनस्कीम चा लाभ घेऊन बडोदा येथे स्वतःचा कारखाना चालू केला.

लहानपणा पासून वाचनाची अतिशय आवड लोकाना जाणण्याचा एक आगळा वेगळा छंद त्यामुळे मैत्री देखील शोधक व रुचकर लोकांशी झाली. लिहीण्याचे फार मनात येई . मग एक दिवशी बहिणीच्या आग्रहामुळे लिहायचे ठरविले .एकटेपणा सत्कारणी लागण्याचा हा मार्ग इच्छापुर्तीचाच ठरला.

कोकणात अनेक वतनदारांच्या इनामदारांच्या घराची वाताहात होताना बघितली . स्वातंत्र्य नुकतेच मिळाले होते .नवे कायदे जन्म घेत होते .जहागीरदारी ,सुभेदारी ,इनामदारी , वतनदारी एकामागोमाग कोसळत चालली होती .त्यामुळे कुटुंबातच इस्टेटी वरून भाऊबंदकी वाढत होती .अशाच एका इनामदारीणीची ही जीवनगाथा .“इनामदारीण” आपल्याला सांगताना आनंद होत आहे.

पहिला कथा संग्रह “एकटे जीव” व एक कादंबरी “रंग जीवनाचे” हे लिहून पुरे झाले . त्या कथा वाचल्या कित्येक रसिक मित्राना पाठवल्या .त्यांच्या कडून फारच सुंदर अभिप्राय मिळाले..एकटेजीव कथासंग्रह ,रंगजीवनाचे नंतर इनामदारीण ही कादंबरी आपल्याला सादर करताना फार प्रसन्नता वाटत आहे.

मराठी रसीक वाचकानी हे लेखन कसे वाटले ते जरूर कळवावे .ईमेल ,फोन नंबर पुस्तकात दिले आहेत .

सुहास खोपकर